श्री

# अयंदशप्रकरणग्रंथः

कोटग्रामस्थ केणीत्युपाव्ह नारायण सूनु
लक्ष्मणेन श्रुति स्मृति पुराणेति हासा-
दिमान्यग्रंथोक्त वचनै

विरच्य

वेदशास्त्रसंपद्विराजमानमलकीकरो पाभिधभीमा-
चार्याणां घगवेत्युपाव्ह परशुरामशास्त्रिणां-
च सहायतया संशोध्य.



मुंबय्याम्.
निनंदाद्रिभूमितेशाके १७९३ पौषकृष्णाष्टम्यां निर्णयसागरा-
भिधाने मुद्रायंत्रेंकित:

---



---

किमत रुपये १॥

॥ श्री ॥

# दशप्रकरणं.

हा ग्रंथ

## कोट लक्ष्मण नारायण केणी शास्त्री

यांनीं

अनेक मान्य ग्रंथांच्या आधारानें

रचून

वे० शा० रा० रा० भीमाचार्य झळकीकर

व

परशुराम शास्त्री घगवे

यांच्या

साह्यतेनें शुद्ध करून

मुंबईमध्यें,

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिला.

शके १७९३ सन १८७२

किंमत रु० १॥

श्री

# अयंग्रंथः

श्री-

मत्परम-

हंस परिव्रा-

जकाचार्य कुलति-

लक यमाद्यष्टांग योगसंप

न्न पदवाक्यप्रमाण पारावार

पारंगत सर्वतंत्रस्वतंत्र श्रीमद्वैष्ण-

वसिद्धांत प्रतिष्ठापनाचार्य श्रीमद्व्यासर

घुपतिदेवदिव्य श्रीपादपद्माराधक श्री-

मद्विबुधेंद्रतीर्थ श्रीपादकरकम-

लसंजात श्रीमत्सुमतींद्र-

तीर्थ श्रीपादवरकुमार-

क श्रीमद्भुवनें-

द्रतीर्थ श्री-

पाद

पादकमलयोर्मयातिनम्रतया प्रीत्युत्कर्षेणच

समर्पि तोस्ति.

# प्रस्तावना.

---

भरतखण्डे तावद्गूणजनानां 'राज्यप्राप्तौ तेषामत्रागमनेनभरत खंडस्थजनाना मनेक विद्या, कला, कौशल्यादिषु बुद्धिरधिकतरासीत्. तत्रापि; वार्तापत्रप्रकटनंत्वायमपरोमहान् लाभः यस्मात्, पूर्वतावद्विप्रतिपन्नस्य विषयस्य निर्णयार्थं सभायां पंडितानां मुखतो वादविवादा अप्रचलन्, तथापि; तादृशवादविवादैर्नैकोपिविषयो निर्णेतुं शक्येत. यतः प्रायशः पूर्वं पक्षिणां जनानां बाहुल्यं सत्पक्षिणां (सिद्धांतिनां) त्वल्पीयस्त्व लोकेदृष्टमिति पूर्वपक्षिणोमनुसरेण सभायां लेख्यवादाभावात्तवाक्यमपन्हुवानाः संतः स्वपक्षानेव साधयितु यतते. इदानीं. तावद्वार्तापत्रैश्च स्वकीयशंकाकलंकितविषयाणां लेखने भयमापन्नाः संतः स्वपक्षान्निष्कासयितुं लिखितुंयानशक्नुवंतीति वार्तापत्रस्य बहूपयोगइति; प्रकृतेतु कोंकणस्थानां गौडसारस्वतकुलोत्पन्नानां व्यवहारे शाण्णवीति प्रसिद्धानां जनानां ब्राह्मणत्वे विप्रतिपन्नाः केचनजना बहुकालतद्विषये महाकोलाहलचक्रुः' परंतु; इसवीसन् १८६९ दिनमारभ्यायोग्यं तादृशं कोलाहलं बहुवारं श्रुत्वा दुःखाश्चर्यसागरनिमग्नः सन्नहमत्सरिणांतादृशजनानां द्वेषदुष्टाचारं साधुश्रोतृजनेभ्यो निवेदनाय श्रुतिस्मृत्यादि प्रमाण सहकृतं "दशप्रकरणाख्यमिमं" ग्रंथं रचितवानस्मि. अतएतत्ग्रंथावलोकनपरिश्रमेण कृतकृत्यमांकुर्वंतुदयाल्वोविद्वांसइत्याशासे.

# प्रस्तावना.

हिंदुस्थानामध्यें इग्लिशलोकास राज्यप्राप्तझाल्यापासून सर्व रयतेस विद्या, कला, कौशल्य, इत्यादिक अनेकप्रकारचे फायदे झाले आहेत. त्यात वर्तमान पत्र प्रसिद्ध होणें हा एक मोठाच फायदा समजला पाहिजे, कारण कोणतेही गोष्टीचा निर्णय करणें झाल्यास सभाकरून त्यासभेंत वादविवादकरण्याची चाल पूर्वीपासून चालत आहे. परतु, त्यासभेंतील वादापासून कोणतेही विषयाचा निर्णय होतो असें ह्मणवत नाहीं. कारण पूर्व पक्षाकडील दुराग्रह मंडळी फार असून, विरुद्धपक्षाकडील (सिद्धांत पक्षाकडील) मंडळी थोडी असली ह्मणजे त्याचें बोलणें यद्यपी खरें आसलें तथापि तें सिद्धीस नजाता दुराग्रह मंडळीचाच पक्ष सिद्ध होतो. याचें कारण; बहुधा त्या सभेंत लेखीवाद नसल्याकारणानें मीं अमूक तऱ्हेनें बोललों नाहीं असें नाकारण्यास संधी सापडती. परंतु वर्तमान पत्रावरून नाकारण्यास संधी सापडत नसून त्याचा पक्ष नबळा असतो त्यास लेखणी आटोपावीच लागते. आता या सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी ब्राह्मणाविषयीं कित्येक लोक बहुकालपर्यंत बरीच याटायाट करीत असत. परतु, इसवी सन १८६९सालापासून जी बिनाघडून आली ती पाहून फार आश्चर्य वाटल्याकारणानें अप्रशस्त मार्गानें बोलणाऱ्या निंदक लोकांची जी द्वेषबुद्धी ती सर्व माझ्या विद्वज्जन प्रीय [illegible] [illegible] समोर सादर केलें आहे तर यात हस्तदोषानें राहिलेल्या न्यूनाधिक दोषावर लक्ष न देता केवळ सत्यतेवर मात्र लक्षदेऊन सर्व वाचकानीं आपापल्या निस्पृहतानुरूप मनेंकरून एकवार परिश्रम घेऊन आद्यत वाचून पाहिलें असता केलेल्या श्रमाची साफल्यता होऊन दुर्भापणाच्या योगानें उत्पन्न झालेल्या तुफानरूप लहरींची शांती करितील अशी आशा करितों.

श्री

# दशप्रकरण.

## प्रकरण पहिलें.

ॐश्रीगणेशायनमः॥पीतांबरधरंविष्णुंमेघवर्णंचतुर्भुजं॥
प्रसन्नवदनंध्यायेसर्वविघ्नोपशांतये ॥ १ ॥

अर्थ—पीतांबर धारण करणारा, चतुर्भुज, प्रसन्न आहे मुख ज्याचें असा जो भगवान् विष्णु त्याप्रत सर्वविघ्नांची शांति होऊन प्रारंभितकार्याची सिद्धी व्हावी एतदर्थ ध्यान करितों ॥ १ ॥

⊛ यत्पादपद्मंशरणागतानांसंसारसिंधोस्तरणैकपोतं
कामाक्षिदेवींकुलस्वामिनंचश्रीरामनाथंशिरसानमामि.

अर्थ—आणि ज्यांचे चरणकमल शरणागत जनास संसारसमुद्रापासून तडीस नेण्याविषयीं नौकारूप आहे अशी जी कामाक्षिदेवी व कुलस्वामी जो रामनाथ त्यांच्या चरणाप्रत नमस्कार करितों ॥ २ ॥

⊛ वेदव्याकृतिसाहित्यतर्कशास्त्रादिपारगं ॥
॥ श्रीमदानंदतीर्थार्यगुरुंतंप्रणमाम्यहं ॥ ३ ॥

अर्थ—आणि वेद, व्याकर्ण, अलंकार, तर्क (न्याय) इत्यादि शास्त्रें जाणणारे असे जे गुरु *श्रीमदानंदतीर्थ भगवत्पादाचार्य* त्यांप्रत नमस्कार करितों ॥ ४ ॥

---

☞ ⊛ हें चिन्ह ज्या श्लोकांवर असेल ते श्लोक ग्रंथकर्त्याचे आहेत असें समजावें.

श्रीमत्सारस्वतार्यद्विजकुलजननःश्रीमदानंदतीर्थ
स्वाम्यंघ्र्याब्जातमोदस्तदविरतरतोवत्सगोत्रोद्भवो
यः ॥श्रीमदृग्वेदवेत्ताखिलगणकगणाग्रेसरःश्रौ
तार्विद्याब्धयाभट्टाभिधानोहरिभजनरतोभूच्चकेणी
त्युपाव्हः ॥ ४ ॥

अर्थ—श्रीमत्सारस्वताच्या कुलामध्यें उत्पन्न झालेला, व श्रीमदानंदतीर्थ स्वामी यांच्या चरणकमलापासून प्राप्त झाला आहे आनंद ज्यास अशा प्रकारचा, व निरंतर त्या आनंदांतच मग्न होणारा, वत्सगोत्री, ऋग्वेदातें जाणणारा, सर्व ज्योतिषी जनांमध्यें श्रेष्ठ, श्रौतस्मार्तादि कर्मे जाणणारा असून हरिभजनामध्यें निरंतर रमणारा, असा केणी उपनामक आब्धय्याभट्ट नावांचा ब्राह्मण असता झाला.

तत्सुतोधर्मशास्त्रज्ञोनारायणइतीरितः ॥
श्रीकोटग्रामवास्यासीत्कृष्णभक्तिरतःसदा ॥ ५॥

अर्थ—आणि त्या आब्धय्या भट्टाचा पुत्र धर्म शास्त्रांत निपुण असून निरंतर श्रीकृष्ण चिंतन करण्यांत तत्पर कोटग्रामांत वासकरणारा असा नारायणभट्ट या नामें करून प्रसिध्द असता झाला ॥ ५ ॥

तत्पुत्रःश्रीमदानंदतीर्थपादाब्जषट्पदः ॥
पंचप्रवरयुग्वत्सगोत्रजोलक्ष्मणस्त्वहं ॥ ६ ॥
रामग्रहाद्रिकुशकेशुचिकृष्णपक्षेपष्ठ्यांति
थौगुरुदिनेकिलमोहमय्यां ॥ ग्रंथंकरोमिसततंगु
रुपादयुग्मंनत्वादशप्रकरणंवहुसत्प्रमाणैः ॥ ७ ॥

अर्थ—आणि त्या नारायण भट्टाचा पुत्र, पंचप्रवरान्वित वत्स-

गोत्रामध्ये उत्पन्न, श्रीमदानंदतीर्थ स्वामी, यांच्या चरण क्रमल्यामृत भ्रमराप्रमाणें मग्न होणारा, असा मी लक्ष्मण नामक शके १७९३ ज्येष्ठ कृष्णपष्ठी गुरुवारीं निरंतर श्रीगुरुचरणांप्रत नमस्कार करून विद्वज्जनें करून पूरित अशा या मुंबापुरांमध्यें राहत होत्सातां, उत्तम प्रकारच्या प्रमाणानीं युक्त असा दशप्रकरणनामक ग्रंथ करितों ॥ ७ ॥

❁ दशधाब्राह्मणाःप्रोक्ताव्यासाद्यैस्तुमहर्षिभिः ॥
❁ प्रथमेचप्रकरणेतेषामुत्पत्तिरीरिता ॥ ८ ॥
❁ कोंकणब्राह्मणानांयद्विप्रत्वेह्यनुमानकं ॥
❁ द्वितीयेतुप्रकरणेप्रोक्तंशास्त्रप्रमाणतः ॥ ९ ॥

अर्थ–आतां या १० प्रकरणांत जे विषय आले आहेत ते संक्षेपें करून या अनुक्रमणिकेंत दाखवितों. ते असे कीं; व्यासादिक ऋषींनीं दशप्रकारचे जे ब्राह्मण सांगितले त्यांची उत्पत्ती या प्रथम प्रकरणांत सांगून सारस्वतांच्या विप्रत्वाविषयीं द्वितीयप्रकरणांत शास्त्रोक्त प्रमाणांच्या आधारानें षोडश हेतूंनीं अनुमान केलें आहे.

❁ ब्राह्मणत्वेयदुक्तंहिप्रमाणैरनुमानकं ॥
❁ तृतीयेतुप्रकरणेस्थापनातस्यचोदिता ॥ १० ॥
❁ चतुर्णामपिवर्णानांवृत्तिभेदाःपृथक्पृथक् ॥
❁ चतुर्थेतुप्रकरणेसंक्षेपेणप्रदर्शिताः ॥ ११ ॥

अर्थ–आतां द्वितीय प्रकरणांत अनुमान केलें ह्मणून जें सांगितलें, त्या अनुमानास पंचावयव प्रयोग लावून त्याच षोडश हेतूंनीं व अन्य शास्त्राधारानें तृतीयप्रकरणांत त्याअनुमानाची स्थापना करून ब्रह्म, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, यांचारवर्णांचे पृथक् पृथक् जे वृत्तिभेद ते संक्षेपेंकरून चतुर्थ प्रकरणांत कथन केले आहेत.

॰ पंचमेव्यवहारश्चदर्शितःसप्रमाणकः ॥

॰ षष्ठेतुमाधवोक्तस्यखंडनंचप्रकल्पितं ॥ ११ ॥

अर्थ—आणि पांचव्यात सप्रमाण व्यवहार दाखवून साहाव्यांत माधवलतिकेचें निराकरण केलें आहे.

॰ सप्तमेचित्तपूतानामुत्पत्तिश्चप्रदर्शिता ॥

॰ उत्पत्तिःकरहाटानासंप्रोक्काचतथाष्टमे ॥ १३ ॥

॰ देवरुक्षब्राह्मणानांनवमेजनिरीरिता ॥

॰ एवंविप्रत्रिभेदानामुत्पत्तिश्चप्रदर्शिता ॥ १४ ॥

अर्थ—आणि सातव्यात चित्तपावनांची अठव्यात कऱ्हाड्यांची आणि नवव्यात देवरुख्यांची मिळून तीन्हीं विप्र भेदाची उत्पत्ति या तीन प्रकरणांत कथन केली आहे.

॰ दशमेतुप्रकरणेविप्रःसारस्वतोगुरुः ॥

॰ चित्तपूतब्राह्मणानामित्युक्तंतुप्रदर्शितं ॥ १५ ॥

अर्थ—आणि दशमप्रकरणांत चित्तपावनादिकांचा गुरू सारस्वत हें सिद्धकरून दाखविलें आहे.

॰ एतैःप्रकरणैर्युक्तोग्रंथोहिक्रियतेमया ॥

॰ न्यूनाधिकममुष्मिन्यत्क्षम्यतातद्विसूरिभिः॥१६॥

अर्थ—याप्रकारेंकरून वरील दाहाप्रकरणानींयुक्त असा दशप्रकरणनामक ग्रंथ करितों आहें तर या ग्रंथामध्यें हस्तदोषानें किंवा नजरचुकीनें न्यूनाधिक जें काहीं होईल त्याची सुज्ञपंडितानीं क्षमा करावी.

॰ आशंकापरिहारादिदिङ्मात्रमिहदर्शितं ॥

॰ अन्यत्सर्वंतुद्धिवलादूहनीयंविचक्षणैः ॥ १७ ॥

❀ अथचप्रतिपाद्यैवदोयतांविदुषोत्तरं ॥
❀ एकप्रदर्शितोन्यायोयःसोन्यत्रापिनीयतां ॥ १८ ॥
❀ दशप्रकरणग्रंथस्यैतस्यतुविलोकनात् ॥
❀ सम्यग्बोधोवाचकानामुत्पद्येतनसंशयः ॥ १९ ॥

अर्थ—आतां या ग्रंथांत शंका समाधानें योज्यात दाखविली आहेत. यां शिवाय अन्य विषय सुज्ञानीं आपापल्या बुद्धिबळें, करून जाणावे. प्रदर्शित विषयाचें प्रतिपादन करून नंतर शिष्टानीं जें उत्तर देणें असेल तें द्यावें. आणि एका ठिकाणीं-प्रदर्शित केलेला जो न्याय तो अन्य ठिकाणींही-न्यावा. याप्रकारें करून या दश-प्रकरण नामक ग्रंथाचें विचारपूर्वक अवलोकन केलें असता वाच-कास उत्तम प्रकारचा बोध होईल यांत संशय नाहीं.

❀ श्रीमत्कोंकणविप्राणांत्रातारंभार्गवंविभुं ॥
❀ नमस्कृत्वाप्रकरणंप्रथमंप्रकरोम्यहं ॥ २० ॥
❀ तत्रकोंकणविप्राणांनषट्कर्माधिकारिता ॥
❀ विप्रत्वमपिनास्तीतिवदंत्येवंयथेप्सितं ॥ २१ ॥
❀ अतःसह्याद्रिखंडोक्तवचनैःसप्रमाणकैः ॥
❀ गौडविप्रत्वसिद्धिंचकोंकणेषुप्रदर्श्यते ॥ २२ ॥

अर्थ—आतां सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी ब्राह्मणाचें संरक्षणक-रणारा असा जो प्रभु परशुराम त्यास नमस्कार करून प्रथम प्रक-रणाची रचना करितों. त्यामध्यें प्रथमतः सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी यास षट्कर्माचा अधिकार नाहीं व ते ब्राह्मण ही नव्हे या प्रकारें करून काहीं निंदकलोक आपापल्या मना प्रमाणें यथेच्छ भाष ण करितात परंतु त्या निंदक लोकांच्या मनापासून उत्पन्न झालेल्या

भ्रमाची शांति व्हावी या कारणास्तव " स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रिखंडाच्या" आधारावरून यासारखेच कोंकणेऊर्फ शाणवी लोकांच्या ठिकाणींगौड विप्रत्वसिद्धकरून दाखवितो.

⊛ सह्याद्रिखंडंस्कांदेनपुराणेवर्ततेपिच ॥
⊛ इतियच्छंक्यतेलोकैस्तच्छंकायानिवृत्तये ॥ २३ ॥
⊛ स्कांदोक्तवचनान्येवप्रदर्श्यंतेत्रकानिचित् ॥
⊛ तेषांविलोकनाच्छंकानिवृत्तिर्वैभवेद्ध्रुवं ॥ २४ ॥

अर्थ—आतां सह्याद्रिखंड हें स्कंद पुराणांतर्गत मुळींच नाहीं अशी कांहीं लोक शंका घेतात त्या शंकेच्या समाधानार्थ प्रथमतः स्कंद पुराणोक्तच कांहीं प्रमाणें दाखवितों तीं पाहिलीं म्हणजे शंकानिवृत्ति होईल यांत संशय नाहीं.

हरिर्व्यासस्वरूपेणवेदान्संगृह्ययत्नतः ॥ शिथिलेभ्यश्चवेदेभ्यस्स्वयांनुद्धृत्यबुद्धितः ॥ २५ ॥ अष्टादशपुराणानांकर्तासत्यवतीसुतः ॥ तानिमह्यमदात्प्रीत्यागुरुःकारुण्यसागरः ॥ २६ ॥ अष्टादशप्रभेदानिसारभूतानिकृत्स्नशः ॥ तेषांनामानिवक्ष्येहं शृणुध्वंमुनिपुंगवाः ॥ २७ ॥ ब्राह्मंपाद्मंवैष्णवंच शैवंभागवतंतथा ॥ भविष्यन्नारदीयंचमार्कंडेयं शुभावहं ॥ २८ ॥ आग्नेयंब्रह्मवैवर्तंलैंगंवाराहमेवच ॥ स्कांदंचवामनंचैवमात्स्यंकौर्मंचगारुडं ॥ २९ ॥ ब्रह्मांडंचेतिसंप्रोक्तमष्टादशंमुनीश्वराः ॥ नानाख्यानानिपुण्यानिश्रवणान्मोक्षदानिच ॥ ३० ॥

श्रद्धेयानिचवैतानिचित्तशुद्धिमभीप्सुभिः ॥ स्कं
दउवाच ॥ योगींद्रशृणुभक्त्यात्वंप्रख्यातंममसंज्ञ
या ॥३१॥ तत्रसंतिकथादिव्यानानाख्यानयुताः
पराः॥सह्याचलकथातत्रवर्ततेक्वापिसत्तम ॥ ३२ ॥
तत्पुराणंवदाम्यद्यस्कांदंवेदार्थबृंहितं ॥ श्रोतृक
र्णामृतकरंपंचाशत्खंडमंडितं ॥ ३३ ॥ पट्संहि
तायुतंशुद्धंशिवतत्वप्रबोधकं ॥ आद्यासनत्कुमा
रीयाद्वितीयासूतसंहिता ॥ ३४ ॥ पराब्राह्मीच
संप्रोक्तातुरीयावैष्णवीशुभा ॥ पंचमीशांकरीवत्स
पष्ठीसौरीसमीरिता ॥ ३५ ॥ आद्यातुपंचपंचाश
त्सहस्रश्लोकसंयुता ॥ द्वितीयोपनिपत्साराष
ट्सहस्रैरथोज्ज्वला ॥ ३६ ॥ त्रिसहस्रयुताब्राह्मी
पंचाभिर्वैष्णवीमता ॥ त्रिंशद्भिःशांकरीप्रोक्तासह
स्रादित्यसंहिता ॥ ३७ ॥ लक्षग्रंथयुतंस्कांदंपं
चाशत्खंडमंडितं ॥ तत्रादौसंप्रवक्ष्यामिह्याद्यां
शिवकथान्वितां ॥ खंडैःपंचदशैर्युक्तांसर्वोपनिष
दात्मिकां ॥ ३८ ॥ सह्याद्रिखंडःप्रथमोद्वितीयो
वीरसंज्ञिकः ॥ तृतीयोभैरवाख्यःस्याच्चतोगौरमु
खाव्हयः ॥ ३९ ॥ अथहैमवतीखंडोगोकर्णः
पष्ठईरितः ॥ सप्तमोवरदाखंडःकाशीखंडस्तथाष्ट

मः ॥ ४० ॥ नवमःसेतुखंडश्चतुंगभद्राव्हयः परः ॥ ततःखट्वांगिखंडश्चमुनिखंडस्ततःपरः ॥ ४१ ॥ ततःपरशुरामाख्यस्त्र्यंबकाख्यश्चतुर्दशः॥ कैलासखंडोयोगीशत्वंतिमःपुण्यदायकः ॥ ४२ ॥ एवंपंचदशैर्युक्तासंहिताद्याशिवात्मिका ॥ ❀ इतिस्कंदपुराणेहिंगणितंभैरवाभिधे ॥ ❀ एतेनवादिनांबोधोजायेतखलुवाचकाः ॥ ४३ ॥

अर्थ—तें असें कीं सूतशौनकादि ऋषींप्रत कथन करितात कीं; हरी नारायण भगवान हा व्यास रूपानें शिथिल झालेल्या वेदार्तें गृहण करून त्यांपासून आपल्या बुद्धिबलानें तात्पर्यार्थ काढून त्या वेदार्थानें युक्त अशीं अष्टादश पुराणें करिता~झाला. नंतर तीं वेदसारभूत अष्टादश पुराणें कृपासमुद्र जो व्यास गुरू त्याणें प्रीतीनें मजकारणें दिलीं त्यांचीं नामें सांगतों तीं तुह्मीं श्रवण करावीं. ब्रह्मपुराण, पद्मपुराण, विष्णुपुराण, शिवपुराण, श्रीमद्भागवत, भविष्यपुराण, नारदपुराण, मार्कंडेयपुराण, अग्निपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, लिंगपुराण, वराहपुराण, स्कंदपुराण, वामनपुराण, मत्स्यपुराण, कूर्मपुराण, गरुडपुराण, आणि ब्रह्मांडपुराण याप्रमाणें अष्टादश पुराणें आहेत. या अष्टादश पुराणांत पुण्यकारक व श्रवणमात्रेंकरून मोक्षदेणारीं अशीं नानाप्रकारचीं आख्यानें आहेत आणि हीं ज्यांला चित्तशुद्धीकरून घेण्याची इच्छा असेल त्याणीं भक्तिपूर्वक श्रवण पठण करण्यास योग्य आहेत व हीं मोक्षदेणारीं आहेत. (यामकारेंकरून सूतानीं ऋषींप्रत सांगून पुढे स्कंद नारद संवाद सांगतात.) स्कंदनारदाप्रतसांगतो, हे योगींद्रा नारदा! माझें पुराण ह्मणजे माझें नाव धारण करणारें जें स्कंद पुराण तें भक्तीकरून श्रवण कर.आणि या स्कंद

पुराणामध्ये नानाप्रकारच्या आख्यानानीं युक्त अशा सुंदर सुंदर कथा आहेत. तशीच सह्याद्रि संबंधी कथा आहे तस्मात् या सुंदर कथांनीं युक्त असें जें स्कंद पुराण त्यांत वेदार्थ बहुत असून हें श्रवण करणाऱ्या जनास आनंददायक आहे. आणि यांत पन्नासखंडे व साहा संहिता आहेत व हें शुद्ध असून यानें शिवतत्वाचा बोध होतो. आतां ज्या साहा संहिता ह्मणून सांगितल्या त्यांचीं नावें. पहिली सनत्कुमारसंहिता, दुसरी सूतसंहिता. तिसरी ब्रह्मसंहिता, चवथी विष्णुसंहिता, पांचवी शंकरसंहिता, साहावी सूर्यसंहिता, याप्रमाणें साहा संहिता आहेत, यांची ग्रंथ संख्या अशी कीं; जी पहिली सनत्कुमार संहिता ती ५५ हजार आहे, दुसरी सूत संहिता ६ हजार, तिसरी ब्रह्म संहिता ३ हजार, चवथी विष्णु संहिता ५ हजार, पांचवी शंकर संहिता ३०-हजार, आणि साहावी सूर्य संहिता १ हजार आहे. याप्रमाणें ही सर्व संख्या मिळून एकंदर स्कंद पुराणाचा लक्ष ग्रंथ आहे. आणि या स्कंद पुराणास, पन्नास खंडें आहेत त्यांतून प्रथमतः पंधरा खंडानीं युक्त जी पहिली संहिता त्यांतील खंडांचीं नावें सांगतों. -पहिलें सह्याद्रिखंड, २ रें वीरखंड, ३ रें भैरवखंड, ४ थें गौरमुखखंड, ५ वें हैमवती, ६ वें गोकर्ण, ७ वें वरदाखंड, ८ वें काशी खंड ९ वें सेतुखंड, १० वें तुंगभद्राखंड, ११ वें सह्यांगीखंड, १२ वें मुनिखंड, १३ वें परशुराम, १४ वें त्र्यंबक, आणि १५ वें कैलासखंड, याप्रमाणें पंधरा खंडांनींयुक्त अशी स्कंदपुराणांतर्गत पहिली सनत्कुमार संहिता आहे. याप्रमाणें स्कंदपुराणांतर्गत भैरव खंडामध्यें हा विस्तार सांगितला आहे याचें अवलोकन केल्यानें सह्याद्रिखंड नूतन असें ह्मणणारांस उत्तम प्रकारचा बोध होऊन उत्पन्न झालेल्या भ्रमाचा नाशही होईल यांत संशय नाहीं.

आता या सह्याद्रीखंडांत जे दशविध ब्राह्मण सांगितले त्यांची उत्पत्ति सांगतों.

॥ स्कंदउ० ॥ब्राह्मणादशधाःप्रोक्ताःपंचगौडाश्चद्राविडाः॥ तेषांसर्वेषांचोत्पत्तिंकथयस्वसविस्तरं॥ ४ ४॥

॥ महादेवउ० ॥ द्राविडाश्चैवतैलंगाकर्नाटामध्यदेशगाः॥गुर्जराश्चैवपंचैतेद्राविडाःपंचकथ्यते॥ ४ ५॥

अर्थ—तो असा कीं; स्कंद शंकरास म्हणतो, दहाप्रकारचे ब्राह्मण ( पंचगौड आणि पंचद्राविड ) मिळून दशविध ब्राह्मण म्हणून जे सांगितले त्यांची सविस्तरें करून उत्पत्तिसांग. याप्रकारें करून स्कंदाचें भाषण ऐकिल्यावर शंकर म्हणतो द्राविड, तैलंग, कर्नाटक, मध्यदेशस्थ, ( देशस्थ ) आणि गुर्जर, मिळून हे पांच प्रकारचे द्राविड सांगितले आहेत.

✓ सारस्वताःकान्यकुब्जाउत्कलामैथिलाश्चये ॥ गौडाश्चपंचधाश्चैवदशविप्राःप्रकीर्तिताः ॥ ४ ६ ॥

अर्थ—आणि सारस्वत, कान्यकुब्ज, उत्कल, मैथिल, आणि गौड, हे पांच गौड मिळून दहाप्रकारचे ब्राह्मण सांगितले आहेत.

ब्राह्मणादशधाश्चैवमहर्षीणांकुलोद्भवाः ॥
देशेदेशविधाचाराह्येतैर्विस्तारितामही ॥ ४ ७ ॥

---

त्रिहोत्राह्यग्निवैश्याश्चकान्यकुब्जा कनोजपाः ॥
मैत्रायणा.पंचविधाएतेगौडा प्रकीर्तिताः ॥

१ याप्रमाणें या गौडांत अणखी भेद आहेत, परंतु मुख्य पंचगौड आणि पंचद्राविड मिळून हे दशविधच ब्राह्मण सांगितले आहेत म्हणून सर्व भेद दाखविले नाहींत.

सर्वेषाब्रह्मगायत्रीवेदकर्मयथाविधि ॥
षट्कर्मविधियुक्ताश्चनात्रकार्याविचारणा ॥ ४८ ॥
भोज्याश्चभोजनीयाश्चसर्वदेशेषुब्राह्मणाः ॥
योनिसंबंधकस्संचस्वशाखासूत्रसंज्ञया ॥ ४९ ॥
चर्मांबुगुर्जरेचैवदेशदोषःप्रकल्प्यते ॥
दक्षिणेदासीगमनंदोषश्चैवमहाकृतः ॥ ५० ॥
नदंतधौतंकर्नाटेकाश्मीरेभट्टमारिजाः ॥
तैलंगेगोवाहनंचप्रातरन्नंतुद्राविडे ॥ ५१ ॥
एवंदेशेचदोषश्चस्वदेशेचप्रकल्प्यते ॥
गुर्जरीकच्छहीनातुविधवाचसकंचुकी ॥ ५२ ॥

अर्थ—याप्रकारें करून ऋषिकुलोत्पन्न मुख्य हे दहाब्राह्मण आहेत. आणि ते ज्याज्या देशात राहात आहेत, ते तत्तद्देशीय आचार आचरण करितात याप्रमाणें सर्व पृथ्वीवर ते ब्राह्मण राहातात. परंतु देशाचार भिन्नभिन्न याच्या योगानें यद्यपि ते भिन्नभिन्न आहेत तथापि वेदोक्त यथाविधि ब्रह्मगायत्री असून षट्कर्माचा अधिकार आहे याविषयीं विचार करणेच नको. कारण ब्राह्मण षट्कर्माचे अधिकारी असून सर्व देशामध्ये देवतोद्देशानें भोजनीय आहेत. आता यादशविध ब्राह्मणामध्ये देशपरत्वेकरून निरनिराळे दोषही आहेत ते असे कीं, गुर्जरदेशातील ब्राह्मणाचा दोष चर्मोदक प्राशन करणें. दक्षिण देशस्थांचा दोष दासीगमन करणें, कर्नाटकस्थांचा दोष दंतधावन नकरणें (दात न घासणे) काश्मीरदेशस्थाचा दोष भट्टमारीज (दोषविशेष) तैलंग देशस्थाचा दोष बैलावर बसणें, द्राविडाचा प्रात:काळीं शिळेंअन्न (काल्चें) भक्षण करणें, आणि गुर्जरात दुरा-

ादोष असा आहे की कच्छहीन असून विधवा स्त्रियांनीं चोळी घालणें.

त्रिहोत्राश्वकनोजाश्चमत्स्यभुङ्मांसभोजनाः ॥
कान्यकुब्जोभ्रातृगामीदेशदोषाःप्रकीर्तिताः ५३ ।
यथादेशस्तथादोषःस्वस्वदोषेणकल्प्यते ॥
परदेशेकृतंकर्मबाध्यतेचैवपातकं ॥ ५४ ॥
एवंऋषिकुलंश्रेष्ठंब्राह्मण्यंचैवविस्तरं ॥
सर्वकर्मसुशुद्धंचनात्रतस्यविचारणा ॥ ५५ ॥
❀ इत्थंसह्याद्रिखंडोक्तवचनंहिविचार्यतां ॥

अर्थ–त्रिहोत्र देशस्थांचा आणि कनोज्यांचादोष मत्स्यमांसातें सेवन करणें, कान्यकुब्जांचा दोष भावाच्या स्त्रीपाशीं गमन करणें, याप्रकारेंकरून देशपरत्वें दोष सांगितले आहेत. त्याज्या रीतीनें देशपरत्वें करून दोष आहेत ह्मणून जे सांगितले ते दोष त्या देशस्थळीकांस पातकोत्पादक होत नाहींत. परंतु, आपला देशासोडून अन्यदेशामध्यें गेले असतां ते स्वदोष पातकोत्पादक होतात. याप्रकारेंकरून ऋषिकुल हें यद्यपि अनेक अपवादयुक्त आहे तथापि तें श्रेष्ठच आहे याविषयीं कांहीं विचार करू नये. याप्रमाणें "सह्याद्रिखंडांत" सांगितलें आहे त्याचा विचार करावा.

॥पुरूरवाउवाच ॥ कुतश्चिद्ब्राह्मणोजातोवर्णाश्चापिकुतश्चये ॥ कस्माच्चभवतिश्रेष्ठस्तन्मेव्याख्यातुमर्हसि । ५६ । ब्राह्मणोमुखतःसृष्टोब्रह्मणोराजसत्तम ॥
वाहुभ्यांक्षत्रियःसृष्टऊरूभ्यांवैश्यएवच ॥
वर्णानांपरिचर्यार्थंत्रयाणांभरतर्षभ ॥ ५७ ॥
वर्णश्चतुर्थःसंभूतःपद्भ्यांशूद्रोविनिर्मितः ॥

❀ इत्थंचभारतेमोक्षधर्मेप्यस्तिविलोक्यतां ॥५८॥

ब्राह्मणोस्यमुखमासीद्बाहूराजन्यःकृतः ॥

ऊरूतदस्ययद्वैश्यःपद्भ्यांशूद्रोअजायत ॥

❀ इत्थंपुरुषसूक्तेपिवर्ततेतद्विचार्यतां ॥ ५९ ॥

अर्थ—असे हे ब्राह्मण कोठून उत्पन्न झाले तर त्याविषयींचा शास्त्रार्थ असा आहे कीं, पुरूरवा युधिष्ठिराप्रत विचारितो, ब्राह्मणाची उत्पत्ती कोठून झाली ? व क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र हे कोठून उत्पन्न झाले? आणि ब्राह्मण हे सर्व वर्णांत श्रेष्ठ कसे झाले ! हें सर्व मजकारणें सांग; या प्रकारें करून पुरूरवाचें तें भाषण श्रवण केल्यावर युधिष्ठिर ह्मणतो, ईश्वराच्या मुखापासून ब्राह्मण उत्पन्न झाले भुज्यापासून क्षत्रिय, ऊरू पासून (मांड्यांपासून) वैश्य, आणि या तीन वर्णांच्या सेवेकरितां चवथे वर्णस्थ जे शूद्र ते पायांपासून; याप्रकारेंकरून हे चारवर्ण ईश्वराच्या चार स्थानापासून उत्पन्न झाले. याप्रमाणें " महाभारतांतील मोक्षधर्मात, " व " पुरुषसूक्तांत " सांगितले आहे. त्याचा विचार करावा.

॥ भरद्वाजउवाच ॥ ब्राह्मणःकेनभवतिक्षत्रियोवाद्वि

जोत्तम ॥ वैश्यःशूद्रश्चविप्रर्षेतद्ब्रूहिवदतांवर॥ ६०॥

॥ भृगुरुवाच ॥ जातकर्मादिभिर्यस्तुसंस्कारैःसंस्कृतः

शुचिः ॥ वेदाध्ययनसंपन्नःषट्सुकर्मस्ववस्थितः॥६१॥

शौचाचाररतःसम्यक्विघसाशीगुरुप्रियः॥

नित्यंव्रतीसत्यपरःसवैब्राह्मणउच्यते ॥

❀ इत्थंहिभारतेमोक्षधर्मेप्यस्तिविलोक्यतां ॥६२ ॥

अर्थ—भरद्वाज भृगुऋषीस विचारितो कीं, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, हे जे चार वर्ण ईश्वराच्या मुखापासून उत्पन्न झाले, त्यास ब्राह्मणत्व कसें प्राप्त झालें तें सांग. याप्रमाणें विचारितें असता भृगुऋषी ह्मणतो, जात कर्मादि षोडश संस्कारानीं, पवित्रपणानें, वेदाध्ययनानें, षट्कर्मानें, शुद्ध आचारानें, (सर्वमान्य) गुरुस्वर मिती ठेवण्यानें, नित्ययज्ञानें (प्रतिग्रहानें) आणि सत्य भाषणानें ब्राह्मणत्व येतें ह्मणजे इतके गुणानीं जो पुरुषयुक्त, त्याला ब्राह्मण असें ह्मणावें याप्रमाणें "वेदाभ्यपमोक्त वचन आहे" तें पाहावें. तस्मात हे सर्व गुण वरील दशविधात असल्या कारणानें यांचे विप्रत्व अनादिसिद्ध असून निःसंशय आहे आतां सारस्वतांस येतदेशात आणण्याचें कारण काय? ह्मणून कोणी शंका घेतील तर त्या शंकेच्या समाधानाविषयीं किंचित कथाभाग सांगतों

ततस्त्रेतायुगेजातेकार्तवीर्यादिभिर्नृपैः ॥
बलवांद्भिर्धृताभूमिर्विप्राणामुद्धतैःशठैः ॥ ६३ ॥
ततोभवत्सभगवान्विप्रैश्चकश्यपादिभिः ॥
प्रार्थितोरेणुकायांसजामदग्न्योमहाजवः ॥ ६४ ॥
भार्गवोरामइतितमूचुःसर्वेसमाहिताः ॥
कैलासाद्रौगिरिस्थानेतुष्टेनतपसातदा ॥ ६५ ॥
दत्तःस्वपरशुस्तस्माद्रामःपरशुपूर्वकः ॥
कस्मिंश्चिदथकालेचपितृप्रोक्तःस्वमातरं ॥ ६६ ॥
जघानतेनतुष्टोभूद्वृणीष्वमनसेप्सितं ॥
इत्युक्तस्तुतदामाताजीवत्त्वेवसहोदराः ॥ ६७ ॥
सजीवाश्चभवन्त्वेतेसजीवास्तेभवन्तदा ॥

**अर्थ**—तो असा की, त्रेतायुग प्राप्त झाले असता, मोठे, उद्धट, असे कार्तवीर्यादिक जे राजे; त्यांणीं ही भूमी धारण केली ( हस्तगत करून घेतली ) तेव्हां कश्यपादिऋषी भगवताची प्रार्थना करिते झाले. त्यासमयीं रेणुकेच्याठायीं जमदग्नी पासून भगवत अवतार'रूपानें उत्पन्न होता झाला. त्यासमयीं त्याचें नाव भार्गव असें ठेविलें. नंतर शिवस्थान येणें करून युक्त जो कैलासपर्वत त्या पर्वताच्याठायीं भार्गवरामानें तपश्चर्या करून शंकर प्रसन्न करून घेतला. त्याकाली शंकरानें वरदेऊन एक परशु दिला; त्या दिवसापासून त्या 'जमदग्नि पुत्राला ) परशुराम हे नाव प्राप्त झालें. नंतर कोणीं एके समयीं काहीं कारणामुळे पित्याच्या आज्ञेवरून आपली माता जी रेणुका तीस तो मारिता झाला., त्याकालीं ही आपली कठोर आज्ञा असून पुत्रानें मान्य केली असें जाणुन संतोषयुक्त चित्तेंकरून परशुरामास सांगितलें कीं हेपुत्रा! वर माग. याप्रमाणें पित्याचें वचन ऐकील्यावर परशुराम वर मागता झाला तो असा कीं, ही मृत झालेली माता व हे मरणाप्रत पावलेले बंधू जीवंत व्हावे, याप्रकारें करून वरदान त्या परशुरामानें मागताच त्याची ती मरणाप्रत पावलेली माता व बंधूही जीवंत झाले.

ततोरामोगतस्तीर्थयात्रांकर्तुंमहीतले ॥ ६८ ॥
पश्चान्मुनेराश्रमंसजगामकृतवीर्यजः ॥
अस्तुनाभूतिनाम्नोचयया्चेधेनुमुत्तमां ॥ ६९ ॥
नददौसतदातावैबलाज्जग्राहक्षत्रियः ॥
हतेतस्मिंसमारोषाज्जघानक्षत्रियानबहून् ॥ ७० ॥
एकविंशतिवारंसशोषयित्वापुनःपुनः ॥
पृथ्वींनिःक्षत्रियांचक्रेतर्पयामासतान्पितृन् ॥ ७१ ॥

ब्राह्मणानांततोपृथ्वीदानंदत्वायथाविधि ॥
नवीनंनिर्मितंक्षेत्रंशूर्पाकारंतदुत्तमं ॥ ७२ ॥
वैतरण्यादक्षिणेतुसुब्रह्मण्यास्तथोत्तरे ॥
सह्यात्सागरपर्यंतंशूर्पारकंव्यवस्थितं ॥ ७३ ॥
शतयोजनदीर्घंचविस्तृतंत्रीणियोजनं ॥
भार्गवंमीलितापृथ्वीसमुद्रात्सुखहेतुना ॥ ७४ ॥
क्षेत्रंजवाधिकंचासीत्सर्वतीर्थान्वितंतदा ॥

अर्थ—नंतर कांहीं काल गेल्यावर परशुराम तीर्थयात्रा करण्याकरितां निघून गेला. आणि परशुरामानें निघून गेल्यावर त्या जमदग्नि ऋषीच्या आश्रमामध्यें "कार्तवीर्य सहस्रार्जुन" राजा प्राप्त होता झाला. तेव्हां त्या जमदग्नीऋषीनें कामधेनूच्या वरप्रसादानें भोजनादिक उपचारेंकरून त्याराजाचें उत्तमप्रकारें आतिथ्य वगैरे केलें. त्याकाळीं त्यास ( राजास ) असें वाटलें कीं, ही कामधेनू आमच्यासारख्या राजांपाशीं असावी व तेणें करून फार उपयोग होईल. असें त्याराजानें आपल्या मनांत आणून तीधेनू त्याऋषीप्रत मागीतली. परंतु ती तो ऋषीदेईना, असें समजल्यावर बलात्कारेंकरून तीधेनू घेऊन गेला. नंतर हा सर्व वृत्तांत परशुरामास समजतांच कार्तवीर्य राजाप्रत येऊन त्यास मारिला. आणि क्षत्रिय हे अती मदोन्मत्त होऊन सर्वांस पीडूं लागले असें जाणून पुनः पुनः क्षत्रिय मारावे असा निश्चयकरून सर्व पृथ्वीवर २१ वीस आवृत्ती केल्या. याप्रकारें करून पृथ्वीवरील सर्व क्षत्रियमारून निःक्षत्रिय पृथ्वीकरून पितर तृप्त केले. आणि क्षत्रिय मारून हस्तगत झालेली जी सर्व पृथ्वी ती ब्राह्मणास यथाविधि दान दिली, नंतर आपण दानदिलेल्या

पृथ्वीवर कसें राहावें असें मनांत आणून "वैतरणीनदीच्या" दक्षिणभागीं, आणि सुब्रह्मण्याच्या उत्तरभागीं शूर्पाकार (सुपासारखें) असून सुंदर एक क्षेत्र उत्पन्न केलें. तें असें कीं, सह्याद्रीपासून समुद्रापर्यंत बाराकोस रुंद, आणि चारसेंकोस लांब, सूर्पाकार याप्रकारें करून भार्गवास (परशुरामास) समुद्रापासून भूमी मिळाली. आणि ती भूमी काशीक्षेत्रापेक्षां अधिकपवीत्र झाली कारण त्याभूमीवर (परशुरामक्षेत्रांत) परशुरामानें सर्व तीर्थें आणून स्थापिलीं.

विमलंनिर्मलंचैवखादिरंतीर्थमुत्तमं ॥ ७५ ॥
हरिहरेश्वरंतीर्थंमुक्तेश्वरस्तथैवच ॥
वाल्कुकेशोमहाश्रेष्ठोवाणगंगासरस्वती ॥ ७६ ॥
तस्यास्तुदक्षिणेभागेकुशस्थलिरुदाहृता ॥
मठग्रामंतथाचान्येगोमाद्रिश्चाप्युदाहृतः॥ ७७ ॥
तत्रैवस्थापितंतीर्थंगोरक्षंचकुमारिजं ॥
रामकुंडंकुड्मलंचप्राचीसिद्धगुणोपमं ॥ ७८ ॥
एवंक्षेत्रंमहादेविभार्गवेणविनिर्मितं ॥
तन्मध्येतुकृतोवासःपर्वतेचतुरंगके ॥ ७९ ॥
[१]श्राद्धार्थेचैवयज्ञार्थंमंत्रिताःसर्वब्राह्मणाः ॥
नागताऋषयःसर्वेक्रुद्धोभूद्भार्गवस्तदा ॥ ८० ॥

अर्थ—तीं असी कीं, विमल, निर्मल, खदिरतीर्थ, हरिहरेश्वर, (वाणकोटाजवळ) मुक्तेश्वर, कलुकेश, (वाल्केश्वर)

१ हा श्लोक झाल्यावर परशुरामानें नूतन द्विज केल्याविषयीं कथा आहे. तस्मात तें नूतन असून या दशविधांत नसल्या कारणानें येथें त्यांची योजना केली नाहीं.

वागगगा, सरस्वती, आणि तीच्या दक्षिणभागीं, कुशस्थली (कुठाळ ज्यास ह्मणतात तें) मठग्राम (सांप्रत माडभावं असें ह्म णतात) गोमाचल, (गोमांतक) त्या गोमंतकी गोरक्षनामकनीर्थ रायकुंड, कुदूमलादिक तीर्थांची स्थापना केली. शाकरपार्वतीस ह्मणतो हे पार्वती! याप्रकारें करून सर्व देव व सर्व तीर्थे यांहीं करून युक्त असें तें शूर्पाकारक्षेत्र परशुरामानें निर्माण करून त्या क्षेत्रात पर्वताच्या ठिकाणीं वास करिता झाला. नंतर कांहीं दिवस गेल्यानंतर, श्राद्धयज्ञ करिता तेथील सर्व ब्राह्मणास आमंत्रण केलें. परंतु सर्व ब्राह्मण आले नाहींत या कारणानें भार्गव जो परशुराम तो कोपायमान होता झाला *

पश्चात्परशुरामेणह्यानीतामुनयोदश ॥
त्रिहोत्रवासिनश्चैवपंचगौडांतरास्तथा ॥ ८१ ॥
गोमाचलेस्थापितास्तेपंचक्रोशीकुस्थली ॥
भारद्वाजःकौशिकश्चवत्सःकौडिण्यकश्यपो॥८२॥
वसिष्ठोजामदग्निश्चविश्वामित्रश्चगौतमः ॥
अत्रिश्चदशऋषयस्थापितास्तत्रएवहि ॥ ८३ ॥
श्राद्धार्थंचैवयज्ञार्थंभोजनार्थंतथेवच ॥
मठग्रामेकुशस्थल्यांकर्दलीनाम्नितत्पुरे ॥ ८४ ॥
आनिताभार्गवेणेतेगोमांताख्येचपर्वते ॥
मांगिरीशोमहादेवोमहालक्ष्मीश्चह्मालसा ॥८५॥

* कोपायमान होऊन नंतर त्या परशुरामानें कैवर्तकास द्विजत्व दिलें असी कथा आहे

- शातादुर्गाचनागेशःसप्तकोटेश्वरंशुभं ॥
तथाचवहुलादेवाःपरशुरामेणचानिताः॥ ८६ ॥
स्थापिताभक्तकार्यार्थंतत्रैवचशुभस्थले ॥
तेदेवावीर्यवंताश्चभक्ताभीष्टप्रदायकाः ॥ ८७ ॥
स्मरणात्वरतेतेषापापसत्यवदाम्यहं ॥

**अर्थ**–कोपायमान होऊन श्राद्धयज्ञार्थ ब्राह्मण पाहिजेत तेव्हा त्या परशुरामानें पंचगौडांतर्गत त्रिहोत्रपुर नामक देशात वासकरणारे १० ब्राह्मण आणून गोमाचलामध्यें (गोमानका त) पचक्रोशी, कुशस्थली, इत्यादिकक्षेत्रात त्याची (१० ब्राह्मणाची स्थापनाकेली ते दाहा ब्राह्मण येणें प्रमाणें ; भारद्वाज कौशिक, वत्स, कौंडिण्य, कश्यप, वसिष्ठ, जमदग्नि, विश्वामित्र, गौतम, आणि अत्रि, मिळून यादाहा ब्राह्मणास श्राद्धयज्ञार्थ, व भोजनार्थ उपयोग व्हावा ह्मणोन त्रिहोत्र देशस्थ पंचगौडातर्गत सारस्वत ब्राह्मणाची, मठग्रामात (मडगावात) कुशस्थलीत (कुठ्ठाळ) फर्द्रोत (केळोशी) गोमाचल इत्यादि क्षेत्राच्या ठिकाणीं स्थापन केले आणि त्या परशुरामानें हे ब्राह्मण त्रिहोत्र पुराहून गोमातकास आणितेवेळीं त्यांचे कुलदेव, ह्मणजे मंगेश, महादेव, महालक्ष्मी, म्हालसा, शातादुर्गा, नागेश, सप्तकोटेश्वरादिक श्रेष्ठ असे जे देव तेही त्या परशुरामानें आणून भक्त कार्य सिध्यर्थ त्या गोमांतकादि उत्तमक्षेत्रात स्थापिले आणि ते सर्व देव मोठे जाग्रतअसून जो चलवतेनें भक्ताचे मनोरथ पूर्णकर णारे आहेत. आणि त्यासर्वदेवाचें स्मरण केल्यानें संचितार्थ करून ठेविल्लें जीं पापें तीं सर्व नाशाप्रत पावतात यात काहीं संशय नाहीं ' याप्रकारेकरून शंकरानें कार्तिकस्वामीस सांगितल्यावर कार्तिकस्वामी ह्मणतो की,

विश्वेश्वरजगन्नाथत्रैलोक्यादिमहेश्वर ॥ ८८ ॥
भूतंभव्यंभविष्यन्तर्गस्थित्यंतकारक ॥
कथासर्वाजगन्नाथश्रुताचत्वत्प्रसादतः ॥ ८९ ॥
दशगोत्रकाविप्रास्त्रिहोत्रपुरवासिनः ॥
आनीताःपरशुरामेणस्वकार्यार्थरपसित्यये ॥९०॥
हेशंभोतस्यविस्तारंकथयस्वसमासतः ॥
ईश्वरउवाच।शृणुपुत्रसाधुपृष्टंकियोगंचकथंस्थितिः ९१
ब्राह्मणादशगोत्राश्चकुलंपट्पष्टिकंस्मृतं ॥
कुशस्थल्यांकर्दल्यांचगोत्राणिस्थापितानिहि ९२
कौत्संवत्संचकौंडिण्यगोत्रंदशकुलान्वितं ॥
एतेत्रिगोत्रजाविप्राउत्तमाराजपूजिताः ॥ ९३ ॥
सुदर्शनाःसदाचाराश्चतुराःसर्वकर्मसु ॥
मठग्रामोवरेण्यंचलोटलीचकुशस्थली ॥ ९४ ॥
पट्पडेतेपुग्रामेषुकुलानिस्थापितानिवै ॥

अर्थ—हेविश्वेश्वरा! जगन्नाथा! त्रैलोक्याच्या आदिमूता! महेश्वरा! भूत, भविष्य, सर्ग, स्थिति, प्रलयकरणाऱ्या परमेश्वरा होणी सर्व कथा तुम्ही मलासांगितली तीमी श्रवण ही केली; परंतु "परशुरामानें" स्वकार्य सिध्यर्थ दाहागोत्रें यांहीं करून युक्त असेजे त्रिहोत्रपुरस्थ पंचगौडांतर्गत दाहा ब्राह्मण आणिले ह्मणून जे ह्मटलें तर त्यांची सांवनकथा मलासांग. याप्रकारें करून "शंकराप्रत स्कंदानें" प्रश्नकेल्या असतां तो श्रवण करीत होतसाता शंकरत्यास्कंदाप्रत ह्मणतो कीं, हेपुत्रा स्कंदा! चांगला प्रश्नकेल्यास तर त्या सर्व

ब्राह्मणाच्या स्थितियोगानुप्रत सांगतों तें श्रवणकर. तें असेंकीं, दाहाब्राह्मण जे आणिले त्यांचीं सासष्ठकुलें होतीं त्यापैकी कुशस्थळी, केळोसी, यादोनक्षेत्रांत कौत्स, वत्स, आणि कौंडिण्य, यातीनगोत्रस्थ ब्राह्मणाचीं दाहा, दाहा, कुलें स्थापितकेलीं. आणि हे तीनगोत्रांचेब्राह्मण राजादिक याहीं करून पूज्य असे होत. आणि ते सर्व कर्मांत चतुर आसून उत्तम आचार याणीं करूनयु उक्त आहेत. आणि मठग्राम, वरेण्य, (नारवें) अंत्रुजी, आणि लोटली, मिळून याचारग्रामांत ६—६ कुलें स्थापिलीं.

चूडामणिमहाक्षेत्रेकुलानिदशएवहि ॥ ९३ ॥
स्थापिताश्चत्रयोदेवाभार्गवेनतुयत्नतः ॥
दीपवत्यांकुलंचाष्टंस्थापितंचयथाविधि ॥ ९४ ॥
गोमाचलेमध्यभागेकुलंद्वादशस्थापितं ॥
एवंषट्षष्टिकाविप्राःस्थापिताचपरस्परं ॥ ९५ ॥
प्रादायतेपरामेणकुशस्थलिनिवासिनां ॥
सासष्टिद्विजमुख्यानामधिकारंददौतदा ॥ ९६ ॥
⊛ इत्थंसह्याद्रिखंडेपिभेदःस्वपरिकीर्तितः ॥
⊛ तेनपूर्वोक्तविप्राणांसाष्टीकरइतीरितं ॥ ९७ ॥

**अर्थ**—आणि चूडामणिक्षेत्रांत तीनदेव यांहीकरून युक्त अशीं १० कुलें स्थापिलीं. दिपवतीमध्यें आणी गोमाचलाच्या मध्यभागीं १२ याप्रकारेंकरून परशुरामानें कुलदेवांसहीत तेसर्व ब्राह्मण सासष्ट ग्रामात स्थापिले आणि त्यांच्या उदर पोषणार्थ सासष्ट ग्रामाचा अधिकार दिला. याप्रमाणें " सह्याद्रिखंडांत " यासारस्वत गौडांच्या आगमनानुरूप कुलभेदाचें व-

❀ नविरुद्धंचशब्दानामेषामुपपदेसति ॥ १०७ ॥
❀ अतः सिद्धंशाण्णवित्वंतत्वेनव्यवहारतः ॥
❀ ब्राह्मण्यमपिसित्वेनःसंशयोतोनयुज्यते ॥१०८॥
❀ विप्रत्वेदेशपांड्यानांभवतामपियानिहि ॥
❀ प्रमाणान्यपिचास्माकंतान्येवेत्यवधार्यतां॥१०९॥
❀ अस्माकंविप्रतायांयद्बाधकंप्रवदिष्यते ॥
❀ भवतामपिविप्रत्वेस्यात्तदेवहिबाधकं ॥ ११० ॥

अर्थ—कारण शुद्धशाण्णवी शब्द जो आहे, तो केवळ देशपांडे, देसाई, इत्यादिक शब्दवत् असून वृत्तिवाचक आहे. पाहा वृत्तिभेदें व अधिकारें करून भांग्रे, मपाटे, म्हार, कामाटी, देसाई इत्यादिक शब्द द्राविडांत जसे प्राप्त आहेत की त्याचप्रमाणें (वृत्तिवेंकरून च ) शाण्णवीशब्दही गौड सारस्वतांस प्राप्त झाला आहे. म्हणून त्या नामभेदावरून विप्रत्वास काहीं विरोध येत नाहीं. तस्मात शाण्णवीत्वहें तत्वानें व व्यवहारानें ही यासारस्वतांच्या ठिकाणीं सिद्ध होतें म्हणून त्या विशेषणानें विप्रत्वास काहीं एक बाधक नसून निश्चयें करून ब्राह्मणत्व अनादि सिद्ध होतें यांत काहीं संशयनाहीं. आता त्या शेणवी पदावरून सारस्वत हे ब्राह्मणनव्हे असे जर चित्तपावनादिकांचें मत असेल तर वरील उदाहरणावरून ते सर्व कोण, यांचाविचारकरा. ते ब्राह्मणच आहेत असें जर त्यांचें ( चित्तपावनादिकांचें ) मत असेल तर त्याच न्यायें करून व शास्त्ररीत्या तसेच हे सारस्वत उर्फ शेणवी आहेत असें समजा.

❀ अस्मत्कोंकणनाम्नोहिशंक्यतेयत्तुकेनचित् ॥
❀ कथ्यतेतन्निरासार्थनामरूढिप्रमाणकं ॥ १११ ॥

⊛ देशस्थतौलवादीनांदेशस्यास्तौलवाइति ॥
⊛ वदंतिदेशभेदात्त्वतथैतेकोंकणाः खलु ॥ ११२ ॥

अर्थ—आतां यासारस्वतांच्या कोंकणे नामक या तिसऱ्या भेदावरून कांहीं लोक शंकाउत्पन्नकरितात, ती असी कीं "हे कांहीं दिवस आपण कोंकणे ह्मणवून घेतात व कांहीं दिवस शेणवी ह्मणून घेतात सांप्रत सारस्वत इत्यादिक." तर त्याशंकेच्यानिवारणार्थनामरूढीत्वप्रमाणसांगतों. तें असेंकीं देशावर राहतात ह्मणून देशस्थ, तौल (तुळव) देशांत राहतात ह्मणून तें तुळवे त्याच प्रमाणें तैलंग, द्राविड, कर्नाटकी, गुर्जर इत्यादिकभेद जसे तत्तदेश निवासें करून प्राप्त होऊन रूढीसएतातकीं त्याचप्रमाणें यासारस्वतांस परशुरामानें कुश्लोण देशांत स्थापितकेल्याकारणानें देशपरत्वेंकरून कोंकणे असे ह्मणतात ह्मणून कोंकणे यादेशाविशेषणावरून ते ब्राह्मणनव्हे असें ह्मणतां येणार नाहीं. कारण—

निर्विशेषितसूत्रत्वंब्रह्मसूत्रस्यचाप्यतः ॥ ११३ ॥
यथाप्यासत्वमेकस्यकृष्णस्यान्येविशेषतः ॥
सविशेषणसूत्राणिह्यपराणिविदोविदुः ॥ ११४ ॥
मुख्यस्यनिर्विशेषेणशब्दोन्येषांविशेषतः ॥
इतिवेदविदःप्राहुःशब्दतत्त्वार्थवेदिनः ॥ ११५ ॥

⊛ इतिभाष्योक्तयास्कंदपुराणोक्त्यागरिष्ठया ॥
⊛ निर्विशेषितशब्दस्यमुख्यवाचित्वनिर्णयात् ११६
⊛ वर्णेपुब्राह्मणस्यैवमुख्यत्वेनप्रसिद्धितः ॥
⊛ शुद्धःकोंकणशब्दोयंतौलवादिकशब्दवत्॥११७
⊛ तद्देशवासिविप्राणामेकवाचकईरितः ॥

⊛ नविरुध्दंचशब्दानामेषामुपपदेसति ॥ ॥११८॥
⊛ तद्देशवासिविप्रोन्योन्येषावाचकएवच ॥
⊛ यथाशब्दाकेरलाद्याअपिदेशाभिधायकाः ११९।
⊛ तत्संबंधेनविप्राणांतत्स्थितानांहिवाचकाः ॥
⊛ तथाकोंकणशब्दोयमपिकोंकणदेशिना॥१२०॥
⊛ विप्राणांवाचकस्तेनकोंकणाव्हानमात्रतः ॥
⊛ विप्रत्वमपिसिध्दंनःसंशयोतोनसंभवेत् ॥१२१॥
⊛ शुध्दकोंकणभाषायाह्येतेपुत्सहजत्वतः ॥
⊛ कोंकणाःकोंकणाइत्थंव्यवहारस्यतत्वतः।१२२।
⊛ शंखावल्याद्यग्रहारनिवासस्यविधानतः ॥
⊛ शंखावल्यादिसंज्ञाभिरेतेषांव्यवहारतः ॥ १२३ ॥

**अर्थ**—असें आहे कीं निर्विशेष सूत्राला ब्रह्मसूत्रें विशेषण दिलें ह्मणून निर्विशेषत्वजातनाहीं पहा, व्यासाला कृष्ण हें नांव असून अन्यठीकाणीं विशेषण दिलें ह्मणून व्यासत्व नाहींसें झालें काय? तसेंच सविशेषसूत्रास जैमिनीसूत्रें हें विशेषण दिल्यानें सविशेषणत्व नाहीं असें ह्मणता एयील काय? तस्मात् मुख्यत्वें करून निर्विशेष सूत्र हें सिध्द असून सविशेष हें विशेषण दिलें ह्मणून निर्विशेषणत्व जात नाहीं. याप्रकारें करून "ब्रह्मसूत्रभाष्यांत" व "स्कंदपुराणांत" ही सांगितलें आहे. आतां त्या निर्विशेष सूत्राला सविशेष, किंवा ब्रह्मसूत्र ह्मटल्यानें जसे निर्विशेषत्व जात नाहीं कीं तसे येथें मुख्यत्वें करून सारस्वत हें पद अनादिसिद्ध असून त्यास कोंकणे, शेणवी, त्रिहोत्री, सासष्टी इत्यादिक विशेषणें त्याविषयीं किंवा दिलींत ह्मणून याविशेषणावरून पूर्वोक्त ब्राह्मणच नाहींसे झालें काय? त्यांत कोंकणशब्दहा तौल-

यादिकशब्दांसारखा असून तद्देशीय ब्राह्मणास एकवाचकआहे आणि त्या ब्राह्मण शब्दास अनेक उपपदें ( विशेषणें ) हीआहेत. ह्मणून तीं बाधकरणारीं आहेत असें ह्मणवत् नाहीं तस्मात् तौलवादिक शब्द जसे तौल, व ब्राह्मणास वाचक आहेत कीं त्याच प्रमाणें कोंकण-देशांत राहिल्याकारणानें कोंकणे, हेंनांवप्राप्तझालें. आणि देशपर-त्वे करून नांवें प्राप्त होण्याची रूढी प्राचीनकालापासून चालत आहे. त्यांत शुद्धकोंकणदेशांतील जी कांहीं भाषा ती यासारस्वत-कोंकणे उर्फ शेणवी ब्राह्मणांत प्रत्यक्षदीसत असून शंखावल्यादि अग्रहारांच्याठिकाणीं हे सारस्वत राहतअसल्यामुळें त्याभाषेवरून व त्यानिवासें करून कोंकणे,सांकवलकर, कुडालेकर, कायसुळकर, इत्यादिक ह्मणण्याचा व्यवहार जो प्राप्त झाला तो सांप्रतकालपर्यंत चालत आहे. आणि हा व्यवहार केवळ सारस्वतांसमात्र प्राप्त झाला असें नाहीं तर केरळी, देशस्थ, तैलंग, द्राविड, पंढरपुरकर, पुणेकर, काशीकर, इंदोरकर, वापूरकर, वगैरे ह्मणण्याचा लोक-रूढात्मक व्यवहार ज्या प्रमाणें अन्या प्राप्त होतो व आहे कीं, त्याचप्र-माणें कोंकणदेशावरून व तद्देशीय भाषेवरून कोंकणे, वगैरे ह्मण-ण्याचा व्यवहार यासारस्वतांचाठीकाणीं प्राप्तझाला आहे.

केरलाश्चतुलंगाश्चतथासौराष्ट्रवासिनः ॥

कोंकणाकरहाटाश्चवरालाटाश्चवर्वराः ॥ १२४ ॥

इतिभैरवरखंडेहिकेरलादिपुसप्तसु ॥

देशेपुभिन्नभाषाणांसप्तकंसमुदाहृतं ॥ १२५ ॥

यस्मिन्देशेहियाभाषातस्मिन्देशेनिवासिनां ॥

सर्वेषांब्राह्मणादीनांसवैभाषानचेतरा ॥ १२६ ॥

यथाहिकेरलेदेशेद्विजानांचसतामपि ॥

⊛ एकाकेरलभयैवशूद्राणामपिनेतरा ॥ १२७ ॥
⊛ तथैवकोंकणेदेशेयाभाषाविमतेषुसा ॥
⊛ दृश्यतेसहजातेनसिद्धंकोंकणकेषुच ॥ १२८ ॥
⊛ भाषाकोंकणदेशीयकरहाटद्विजातिषु ॥
⊛ तद्देशादिषुसर्वत्रनतुदृष्टास्वदेशजा ॥ १२९ ॥
⊛ तेषुदृष्टेन्यतस्तेषांनैवकोंकणताभवेत् ॥
⊛ अतःकोंकणविप्रत्वंतेषामपिनशस्यते ॥ १३० ॥
आचारःकुलमाख्यातिदेशमाख्यातिभाषितं ॥
संभ्रमःस्नेहमाख्यातिचपुराख्यातिभोजनं॥१३१॥
⊛ इत्थंमनोरमानीतिःसम्यङ्मनसिनीयतां ॥

**अर्थ**—आणि दुसरें असें आहे कीं, केरळ, ( मलवार ) तुलंग, ( तुळू ) सौराष्ट्र, कोंकण, करहाट, वरालाट, आणि बर्बर, इत्यादिकहे सातदेश "भैरवखंडांत" वर्णिले आहेत. आणि त्या सात देशांत ही देशपरत्वानें भाषाही भिन्न आहेत. आतां ज्यादेशांत जी भाषा असेल ती भाषा ते लोक तद्देशानुसार बोलतात्. त्यामध्यें ब्राह्मण हे भिन्नभाषाबोलतात असें नाहीं. कारण एका केरळ देशांत एकचभाषा असून ब्राह्मणादिक लोक वगैरे तीचभाषा बोलतात परंतु अन्यभाषा मुख्यत्वें करून असी बोलत नाहींत, त्या प्रमाणें कोंकण देशांत जी भाषामुख्य असेल तीच हे सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी ब्राह्मण मुख्यत्वें करून त्या कोंकण देशांत राहत असल्यामुळें तीचभाषा बोलतात तस्मात् या भाषेवरून किंवा कोंकणे ह्मटल्यानें सारस्वत ब्राह्मण नव्हे असें ह्मणवत नाहीं. कारण पाहा कराड इत्यादिक देशांत राहणाऱ्या ब्राह्मणाचे देश यद्यपी भिन्न असून ते जर या कों-

कणांत येऊन राहीले तर पूर्व भाषेची विस्मृति होऊन तेही ही कोंकणीभाषाच बोलूं लागता ह्मणून त्याभाषेच्यायोगानें अधमादेशपरत्वानें, तेविप्र वापासून भ्रष्ट होतात असें नाहीं तर विप्रत्व हे अनादिसिध आहेचआहे आतां दुसरे असें आहे कीं आचारावरून कुळाचा निर्णय केला जातो ह्मणजे हापुरुष कोणत्याकुळांत उत्पन्न झालेला असावा हे समजून घेण्याचे असेल तर त्याच्या आचारावरून जाणतां येते. तसेच भाषेवरून देशाचें ज्ञान होतें. संभ्रमाच्या योगानें स्नेहाचें ज्ञान होतें. आणि शरीरावरून याचें भोजन किती असावेंयाचें ज्ञान होतें. याप्रकारें करून "नीतिशास्त्रोक्त वचन" आहे. आणि या वचनावरून कोंकणे, या शब्दाचा निर्णयही होतो.

आचारेणचविप्रत्वंकोंकणत्वंचभाषया ॥१३२॥
अस्मासुत्वंविनिश्चित्यनिश्चितोभवपंडित ॥
अन्यहेतुस्थापनातुविरूपप्राग्रेभविष्याति ॥१३३॥
अतःसिद्धंकोंकणत्वंतत्वेनव्यवहारतः ॥
ब्राह्मण्यमपिसिद्धंनःसंशयोतोनयुज्यते ॥१३४॥
केरलादिषुदेशेषुब्राह्मणाःकेरलादयः ॥
यथैवकोंकणेतद्वद्ब्राह्मणाःकोंकणावयं ॥१३५॥
विप्रत्वेतौलवादीनांभवतामपियानिहि ॥
प्रमाणान्यपिचास्माकंतान्येवेत्यवधारय ॥१३६॥
अस्माकंविप्रतायांयद्वाधकंप्रवदिष्यते ॥
भवतामपिविप्रत्वेस्यात्तदेवहिवाधकं ॥ १३७ ॥

**अर्थ.**—तस्मात् सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी हे ब्राह्मण नव्हे ह्मणून मनसो इच्छ बोलणारे "कल्याणेच्छादिसम्य चित्तपावनादिक

पंडित हो ! प्रदर्शित केलेल्या नीति शास्त्रोक्त वचनाच्या आधाराने आचारावरून व भाषेवरून सारस्वतांच्या विप्रत्वाविषयीं सिद्धांत करून अतःपर सारस्वतांचा द्वेष करण्याची बुद्धि टाकून निःशंकव्हा. आणि यांच्या विप्रत्वाविषयीं यावांचून अन्य हेतूची स्थापना करणें ती पुढें प्रत्यक्षत्वेंकरून प्रगट होईलच. परंतु आतां या प्रकरणांत प्रदर्शित केलेल्या सर्व व्यवहारावरून कौंकणत्वानुरूप जें विप्रत्व तें सर्व युक्तिनें सिद्ध होतें कारण, तौलवादिक देशांत राहणाऱ्या ब्राह्मणास तौलव, मुळये, केरळी, इत्यादिक संज्ञा जसि योग्य आहे कीं त्याचप्रमाणें कुशस्थळ देशांत राहत असल्याकारणानें कौंकणे हें नांव आमच्या सारस्वतांत योग्यच आहे. आतां तौलवादिक, संज्ञा प्राप्त झाली असून त्या तौलवादिकांस जर विप्रत्व आहे असें जर निंदकाचें मत असेल तर प्रमाणेंकरून व न्यायें करून त्या तौलवादिकांच्या विप्रत्वाप्रमाणेंच सारस्वत कौंकणे ऊर्फ शाणवी लोकांचें विप्रत्वसिद्ध आहे असें समजा. आणि तें नसमजतां केवळ द्वेषानेंच् जर सारस्वताच्या विप्रत्वास दूषण देण्याविषयींची उत्सुकताधराल तर त्या तौलवादिकांच्या विप्रत्वासही बाधक आहे असें समजा. वाचकहो ! आपापले दोष आच्छादून केवळ द्वेषबुद्धिनें कौंकणे, शेणवी, म्हणण्याच्या लोक रूढात्मक व्यवहारावरून - सारस्वत हे ब्राह्मण नव्हे म्हणून उगीच निरापराधि एकाचा द्वेषकरणें हा किती बरें या निंदकांचा मुर्खपणा !!' कारण कोणींच आपल्या पायांकडे पाहत नाहीं हें मोठें आश्चर्य वाटतें ! असो ते (चित्पावन) यद्यपि या- सारस्वत कौंकणे ऊर्फ शाणवी ब्राह्मणाची निंदा करिता तथापि त्यानिंद- कानीं करण्याच्या निंदेकडे लक्ष्यही नदेतां आपापल्या सत्यत्वानुरूप महत्वाकडे पाहून सारस्वत कौंकणे ऊर्फशाणवी लोक हे उलट्या निंदकांवर उपकारच करितात. हावरी एक गुणच समजला पाहिजे. कारण असें आहे कीं,

निर्गुणेष्वपिदीनेषुदयांकुर्वंतिसाधवः ॥
नहिसंहरतेजोत्स्नांचंद्रश्चंडालवेश्मनि ॥ १३८ ॥
महात्मानोनुगृण्हंतिभजमानान्रिपूनपि ॥
सपत्नीःप्रापयंत्यब्धिंसिंधवोनगनिम्नगाः॥१३९॥

अर्थ--दीन प्राणी निर्गुणी असले, तथापि साधू पुरुष त्यांवर दया करितात परंतु;तो निर्गुणी आहे ह्मणून त्याचि उपेक्षा करितनाहींत पाहा! चंद्रहा सज्जना प्रमाणेंच सर्व प्राण्यांवर दयाकरित होत्साता आपल्याकिरणाच्यायोगानें सर्वांचा ताप दूर करून त्यास आनंदित करितो त्यामध्यें चांडाळहे इतके अपवित्र वदुष्ट असून दीन आहेत ह्मणून त्यांच्याघरांत आपलें किरणपाडूनयें वत्यांचातापहदूरकरूं नयें असें तो (चंद्र) आपल्या मनांत न आणिता सर्वांप्रमाणें त्यांचाही ताप दूर करितो. कारण मोठ्यांची दृष्टी सर्वत्र ठिकाणीं सारखीच असती. आणि मोठे लोकांचे स्वभाव दुसरे असे असतातकीं जे पुरुष्य शत्रु असून तेच जर शरण आले किंवा आपली सेवाकरितात तर त्या सेवेच्यायोगानें मोठे लोक त्यांवर उपकारच करितात पाहा! मोठ्या नद्या ह्या समुद्राच्या स्त्रिया आहेत, परंतु; समुद्रामत जावें असें लहान नद्यांनीं आपले मनात आणून समुद्राच्या मुख्य स्त्रिया ज्या मोठ्यानद्या त्याप्रतगेल्या असतां त्यालहाननद्यांस आपल्या पोटीं घेऊन समुद्राचीभेटकरून देतात. परंतु सापत्न्य भाव मनांत आणीत नाहींत. असें त्या आणित नाहींतकीं त्याचमार्गे सज्जनाची महत्व बुधि असती. सारांशकाय ? यद्यपी हेचिंत्पावनादिक सारस्वत कोंकणे उर्फ शाण्णवी ब्राह्मणाची निरापराधर्ले करून केवळ द्वेषानें हरेकप्रकारें करून निंदा व निर्भच्छना जरी वारवार करितात तथापि तें मनात न आणितां उलटत्यांवर हे सारस्वत उपकारच करितात आणि हे गूण मुख्यत्वेंकरून ब्राह्मणांतच असतात. कारण ब्राह्मणाचे हे स्वभावीक गुण आहेत.

⊛ शुत्वकोंकणवर्गीयब्राह्मणेषसकलान्यपि ॥
⊛ संत्प्रमाणानिविद्यंतेप्रत्यक्षंतावदुच्यते ॥ १४० ॥
⊛ नानाविधेषुदेशेषुकाशीरामेश्वरादिषु ॥
⊛ कोंकणेषुसदाविप्रयोग्याचारस्यकर्मणां ॥१४१॥
षण्णांचदर्शनान्मानंप्रत्यक्षंतत्रनिश्चितं ॥
शमोदमःस्तपःशौचंसंतोषःशांतिरार्जवं ॥१४२॥
दानंदयाच्युतात्मानंसत्यंब्रह्मस्यलक्षणं ॥
⊛ इत्थंभागवतोक्तस्यलक्षणस्याग्रजन्मनः ॥१४३॥
⊛ एतत्प्रत्यक्षसिद्धत्वान्मानंप्रत्यक्षमत्रहि ॥

अर्थ—तस्मात् अशा प्रकारच्या सर्व गुणांनीं युक्त हे सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी ब्राह्मण असून यांच्या त्रिमचास अनुकूल भूत सम, मार्णेही आहेत त्यास प्रत्यक्षमान सांगतों तें असें कीं काशीपासून रामेश्वरापर्यंत ब्राह्मणास योग्य यजन, याजन, अध्ययन, अध्यापन-दान, प्रतिग्रह, इत्यादिक जीं साहाकर्में तीं यांच्या ठिकाणीं चालण्याची चाल अनादिकालापासून दिसूनयेते यावरून प्रत्यक्षाचा निश्चय केला जातो- आणि शम, दम, ( इंद्रियें जिंकणें ) तपश्चर्या, शुचिर्भूतपणा, संतोष, शांति, आर्जव, दान, दया, भगवंताकडे एकाग्र चित्त ठेवणें आणि सत्यवक्तृत्व, इत्यादिक हीं जीं सर्व लक्षणें ती ब्राह्मणांचीं आहेत याप्रमाणें "श्रीमद्भागवतांत" सांगितलें आहे, तस्मात या भागवतोक्त लक्षणांची प्रत्यक्षत्वें करून या सारस्वतांच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्ति भासत असल्या कारणानें "हे" प्रत्यक्षमान आहेत असें समजावें- यास दुसरें प्रमाण.

सत्यंदानंतपःशौचमनालस्यंतथाघृणा ॥ १४४ ॥
दृश्यतेयत्रविप्रेंद्रसब्राह्मणइतीरितः ॥
जितेंद्रियोधर्मपरःस्वाध्यायनिरतःशुचिः ॥१४५॥
कामक्रोधाविशेपश्वतंदेवाब्राह्मणंविदुः ॥
योऽध्यापयेदधीतेवायाजयेद्याजयेथवा ॥ १४६ ॥
दद्यादपियथाशक्तितंदेवाब्राह्मणंविदुः ॥
❀ इत्थंहिभारतोक्तानांसर्वधर्माणांससत्वतः ॥१४७॥
❀ दृष्टंकोंकणविप्रेषुमानंप्रत्यक्षमत्रहि ॥

**अर्थ**—हे ब्राह्मण श्रेष्ठा ! सत्यभाषण, दान, तपस्या, शुद्ध-पणा, निरालस्य, आणि दयाळूपणें, हीं लक्षणें ज्या पुरुषांमध्यें राहतात तोच ब्राह्मण, असें सांगितलें आहे. जितेंद्रिय असून आपल्या धर्माप्रमाणें वर्तन करणारा, वेदाध्ययना विषयीं तत्पर, पवित्र, आणि कामक्रोधादिकांचा त्याग करणारा असा जो पुरुष त्यासच ब्राह्मण असें देव बोलतात. आणि जो आपण वेदाध्ययन करून दुसऱ्यांस वेद सांगतो, व स्वता यज्ञ करून, यजमानसबधानें यजन करवितो, आणि यथा शक्ति दान करितो, त्यासच ब्राह्मण असे देव जाणतात. याप्रमाणें "भारतांतीलवचन" आहे. तस्मात या-भारतोक्तींतील जे धर्म ते सर्व या सारस्वत कोंकणे उर्फ शाण्णवी ब्राह्मणामध्यें दिसतात यामुळें "हे" प्रत्यक्षमान ( ब्राह्मणच ) असें सिद्ध होतात. याविषयीं अन्यप्रमाण.

१ हीं सर्व लक्षणें सारस्वत कोंकणे उर्फ शाण्णवी ब्राह्मणाच्याअंगीं निश्चयानें आहेत किंवा नाहीं याचीखात्री करून घेण्यांची इच्छा ज्यांस असेल त्यानीं गदापर्व आणि या पुस्तकाचें १० वें प्रकरणपाहावें.

ह्मणतायेत नाहीं कीं त्याचप्रमाणें या सारस्वतांस अनेक नामाभिधानें प्राप्त झालीं ह्मणून त्या नामावरून **सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी** हे ब्राह्मण नव्हे असें ह्मणता येणार नाहीं. तस्मात-

◎ एवंकोंकणवर्गीयब्राह्मण्येवलवत्तरं ॥ १५७ ॥
◎ अस्तिप्रमाणंप्रत्यक्षंतत्तुसम्यक्प्रदर्शितं ॥
◎ अस्यस्फुटावलोकेनसम्यग्बोधोभविष्यति। १५८

**अर्थ.**—याप्रकारें करून यासारस्वत कोंकणे ऊर्फशाण्णवी लो-काच्या विप्रत्वाविषयीं प्रत्यक्ष मानर्जीं सप्रमाणें होतीं तीं सर्व उत्तम प्रकारारें करून विद्वज्जन वाचकांसमोर दाखविलीं आहेत. आणि या सर्व वचनाचें स्पष्टावलोकन केल्यानें उत्पन्न रूप भ्रमाची शांति होऊन उत्तमबोध जो तो प्राप्त होईल. यांत काहीं संशय नाहीं. "आतां यांच्या" षट्कर्माविषयीं द्वितीय प्रकरणांत षोडश हेतू देऊन अनुमान केलें आहे तें पाहावें ह्मणजे तेणेंकरून सर्व विषय वाचकाच्या ध्यानीं सिधले करून येतील. व तेणें करून उत्पन्न भ्रमाची शाती होऊन सर्वांचीं चित्तें जेथल्यातेथेंच राहून सद्बोध जो तो प्राप्त होईल.

इतिकेण्योपाव्हनारायणसूनुलक्ष्मणविरचिते
श्रीमद्दशप्रकरणेविप्रत्वदर्शनंनामप्रथमप्रकरणं
समाप्तम्. ॥ श्रीकृष्णा यनमः ॥



# प्रकरण दुसरें.

---

अथनत्वावेंकटेशंसर्वविघ्नोपशांतये ॥
अनुमानप्रकरणंद्वितीयंक्रियतेमया ॥ १ ॥

**अर्थ**— आतां सर्व विघ्नांची शांति होऊन, ग्रंथसिद्धि व्हावी एतदर्थ श्रीव्यंकटेशाप्रत नमस्कार करून दुसऱ्या अनुमान प्रकरणास प्रारंभ करितों.

सारस्वतब्राह्मणानानपट्कर्माधिकारिता ॥
इतिकेचिद्वदंतीहकेचिद्राजन्यसंभवाः ॥ १ ॥
केचिद्वैश्याश्चपिचवदंत्येवंयथेप्सितं ॥
एवंसर्वब्राह्मणानांचित्तंदोलायतेसदा ॥ २ ॥
अतोहिवेदशास्त्रोक्तप्रमाणानांप्रदर्शनात् ॥
कृत्वानुमानंसर्वेषांचित्तस्थैर्यंकरोम्यहं ॥ ३ ॥
यदिगौडब्राह्मणानांनपट्कर्माधिकारिता ॥
तर्हिब्राह्मणशब्दोहिकथमेषुप्रवर्तते ॥ ४ ॥
यदीमेब्राह्मणाःसंतितर्हिपट्कर्मशालिता ॥
अस्त्येवनात्रसंदेहोवक्ष्यमाणप्रमाणकैः ॥ ५ ॥
यदीमेक्षत्रियाःसंतिवैश्यावाब्राह्मणाःकथं ॥
अपिचब्राह्मणार्हाणिकर्माणिस्युःकथंत्विह ॥ ६ ॥

॥ अग्रेदर्शितहेतूनांकृत्वासम्यक्प्रदर्शनं ॥
॥ कार्यहिसर्वैर्गौडानांब्राह्मणत्वेनुमानकं ॥ ७ ॥

अर्थ— आतां सारस्वत ब्राह्मणास षट्कर्मांचा अधिकार नाहीं असें कांहीं लोक बोलतात, तसेंच कांहीं लोक, सारस्वत हे क्षत्रिय आहेत असें ह्मणतात, कांहीं लोक सारस्वत हे वैश्य आहेत असेंही बोलतात. याप्रमाणें सारस्वत ब्राह्मणाच्या जातीच्या निश्चयाविषयीं सर्वांचें चित्त शोक घेत आहे; यास्तव वेदशास्त्रातील प्रमाणें दाखवून अनुमानेंकरून सर्वांचीं चित्तें स्थिर करितों.

जर या गौड ब्राह्मणांस साहा कर्मांचा अधिकार नाहीं तर याला ब्राह्मण असा शब्द कसा मिळेल? जर ब्राह्मण हा शब्द याच्या ठिकाणीं वर्ततो, तर षट्कर्मांचा अधिकार नाहीं असें कसें होईल? ब्राह्मण शब्द जेथें आहे तेथें षट्कर्मांचा अधिकार आहेच? यात संशय नाहीं. याविषयीं, पुढें दिलेल्या प्रमाणानीं सिद्ध होईलच. आता जर हे क्षत्रिय अथवा वैश्य आहेत असें ह्मणावें; तर संन्यासादिक जे ब्राह्मणाचेच धर्म ते हजारो वर्षांपासून याच्यामध्यें कसे चालू आहेत? तस्मात् पुढें दाखविलेले जे हेतु त्याचा विचार करून पाहावें, आणि अनुमान करावें. आता या गौडाच्या ब्राह्मणत्वाविषयीं केलेल्या अनुमानास आधारभूत प्रमाणें देवून सिद्ध करून दाखवितों

॥ शुद्धकोंकणविप्राणाविप्रत्वेहेतवोमया ॥
द्वितीयेऽस्मिन्प्रकरणेप्रदर्श्यंतेहिषोडश ॥ १ ॥

अर्थ— आता, या सारस्वत ऊर्फ कोंकणें (शेणवी) हे ब्राह्मण असून ब्राह्मणत्वाचे जे अधिकार ते सर्व यास आहेत याविषयीं या द्वितीय प्रकरणांत सोळा हेतु देऊन सिद्ध करून दाखवितों:

॥ तेषुदानादिषट्कर्मशालित्वंप्रथमोमतः ॥
द्वितीयस्तुभवेत्सित्वःप्रचारानामकर्मणः ॥ २ ॥

**अर्थ—** जे सोळा हेतु म्हणून पूर्व श्लोकांत सांगितले, त्यामध्यें, प्रथम हेतु असा की; ज्याप्रमाणें देशस्थ इत्यादि ब्राह्मणामध्यें षट्कर्मे चालतात, त्याचप्रमाणें यांच्यामध्यें आजपर्यंत चालत आहेत, हा प्रथम हेतु जाणावा. द्वितीय हेतु असा सिद्ध होतो की, ज्याप्रमाणें इतर सर्व ब्राह्मण (द्राविडादिक.) हे शास्त्राधारें नामकरण संस्कार द्वादश दिवशीं करितात त्याचप्रमाणें यांच्यामध्येंही प्रचार चालत आहे, यावरून दुसरा हेतु सिद्ध होतो.

⊛ शर्मेतिब्राह्मणस्योक्तमित्यादिस्मृतिभिरत्वमी ॥
व्यवहारंप्रकुर्वंतिशर्मेत्येषतृतीयकः ॥ ३ ॥

**अर्थ—** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांस जी नामें सांगितलीं आहेत, त्यांत शर्म हें नाम ब्राह्मणासच; उक्त आहे. आता या सारस्वत ऊर्फ शेणवीब्राह्मणांत शर्म याच नामानें पूर्वीपासून व्यवहार चालत आहे, त्यावेक्षा हा तिसरा हेतु सिद्ध होतो.

⊛ व्रतबंधनकालायेब्राह्मणानामुदीरिताः ॥
तैरेवप्रचरंत्येतेसेवहेतुश्चतुर्थकः ॥ ४ ॥

**अर्थ—** ब्राह्मणास व्रतबंध संस्काराविषयीं जे उक्त काल सांगितले आहेत त्याचकालीं हे सारस्वत ब्राह्मण व्रतबंध संस्कार करितात, यावरून चवथा हेतु सिद्ध होतो.

⊛ उक्तंकाषायवस्त्रस्यब्राह्मणस्यैवधारणं ॥
तदेवधार्यतेऽमीभिःपंचमःकथ्यतेह्यतः ॥ ५ ॥

**अर्थ—** काषायवस्त्र (भगवें वस्त्र) हें ब्राह्मण बटूनेंच धारण करावें, याप्रमाणें सांगितलें आहे; त्याचप्रमाणें सारस्वत बटूही हेंच वस्त्र धारण करितात. ही चाल पूर्वीपासून चालत आहे, यावरून पांचवा हेतु सिद्ध होतो.

अजिनंकृष्णसारस्यविप्रस्यैवोदिततुयत् ॥
सारस्वतैर्धार्यतेतत्तस्मात्षष्ठःप्रयुज्यते ॥ ६ ॥

अर्थ– कृष्णाजिन हें ब्राह्मण बटूनींच, धारण करावें म्हणून सांगितलें आहे; आणि हें सारस्वत ब्राह्मण कृष्णाजिनच, धारण करितात, यावरून साहावा हेतु सिद्ध होतो.

उपवीतंतुकार्पासंविप्रस्योक्तंतदेवयत् ॥
सारस्वतैर्धार्यतेऽयमतःसप्तमउच्यते ॥ ७ ॥

अर्थ– तीन वर्णांस (ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य याम) नीं तीन प्रकारचीं यज्ञोपवीतें सांगितलीं आहेत त्यात कापसाचें यज्ञोपवीत ब्राह्मणासच असावें असे आहे; आणि सारस्वत हें कापसाचेंच यज्ञोपवीत धारण करितात, यावरून हा सातवा हेतु सिद्ध होतो –

अष्टमःकथ्यतेमौंजीमेखलाधारणात्तथा ॥ ८ ॥
पालाशदंडग्रहणान्नवमोपहियुज्यते ॥ ९ ॥

अर्थ– ब्राह्मणाप्रमाणें हेणवी हे मोळाचीच मेखला धारण करितात. यावरून आठवा हेतु सिद्ध होतो तीन वर्णांच्या बटूस, ग्रहण करण्याविषयीं जे दंड पृथक् पृथक् सांगितले आहेत, त्यामध्यें पालाश दंड ब्राह्मण बटूनींच ग्रहण करावा म्हणून सांगितलें, त्याच-

पांवा, त्यास हे सारस्वत त्याचप्रमाणें-केशप्रमाण दंड घेतात, यावरून दाहावा हेतु सिद्ध होतो.

॥ सावित्र्याउपदेशस्यविधिर्योब्रह्मगोचरः ॥
तेनव्यवहरंतीमेहेतुरेकादशःस्मृतः ॥ ११ ॥

अर्थ—गायत्रीच्या उपदेशाविषयीं जो विधि ब्राह्मणांस सांगितला आहे, त्याच विधीनें हे सारस्वत ब्राह्मण उपदेश करितात, यावरून हा अकरावा हेतु सारस्वताच्या ब्राह्मण्याविषयीं सिद्ध होतो.

॥ यथाब्रह्मवटूनाहिंकथितोयाचनाविधिः
तथाव्यवहरंत्येतेऽनोहेतुर्द्वादशस्त्वयं ॥ १२ ॥

अर्थ—जो ब्राह्मणबटूंस भिक्षा मागण्याचा विधि सांगितला आहे त्याच विधीनें हे म्हणजे सारस्वत भिक्षा मागतात; यावरून बारावा हेतु सिद्ध होतो.

॥ त्रयोदशोभवेत्सिद्धोनमस्कारविधानतः ॥ १३ ॥
चतुर्दशस्तथासिद्धोगोत्रप्रवरनिर्णयात् ॥ १४ ॥

अर्थ—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र यास जे नमस्कारविधि सांगितले आहेत त्यांतून ब्राह्मणाच्या विधीप्रमाणेंच या सारस्वतामध्ये नमस्कारविधि दिसतो; यावरून तेरावा हेतु सिद्ध होतो. तीन वर्णांचे जे गोत्र व प्रवरनिर्णय सांगितले आहेत, त्यांतून ब्राह्मणाच्या निर्णयाप्रमाणें यांचे गोत्र व प्रवर आहेत. यावरून यांच्या ब्राह्मणत्वाविषयीं संशय नसून हा चौदावा हेतु सिद्ध होतो.

॥ संन्यासोब्राह्मणस्यैवनापिराजन्यवैश्ययोः ॥
अतःपंचदशोहेतुःसोप्यमीषुप्रदृश्यते ॥ १५ ॥

अर्थ—सन्यासाश्रम ग्रहण करण्याचा अधिकार केवळ ब्राह्मण

वर्णासच आहे. 'क्षत्रिय' आणि वैश्य यांस नाहीं असें आहे, आणि तो सन्मान या सारस्वत ऊर्फ कोंकणे ब्राह्मणांत हजारों वर्षांपासून चाळत आहे, यावरून हा पधरावा हेतु सिद्ध होतो.

⊛ ब्राह्मणःकाममश्नीयाच्छ्राद्धेविट्क्षत्रियौनहि ॥
अमीषुश्राद्धभोक्तृत्वंदृश्यतेऽतस्तुषोडशः॥ १६ ॥

अर्थ— ब्राह्मणानें श्राद्धसबधी भोजन करावें; क्षत्रिय आणि वैश्य यांस श्राद्धास बसण्याचा अधिकार नाहीं असें आहे, आणि हे सारस्वत ऊर्फ कोंकणे ( शेणवी ) श्राद्ध भोजन करितात, यावरून हा सोळावा हेतु सिद्ध होतो.

⊛ इत्थंमयाल्पमतिनाहेतवोयेधृताहृदि ॥
तत्सिद्ध्येनमोजस्त्रंतेनश्रीशःप्रसीदतु ॥ १७ ॥

अर्थ— याप्रकारेंकरून जे हे हेतु अल्प बुद्धीनें अंत करणांत धरिले आहेत त्यांची सिद्धि निर्विघ्नपणानें व्हावी याविषयीं निरंतर नमस्कार करितों. तेणेंकरून भगवान् लक्ष्मीपति प्रसन्न होऊ —

⊛ अथदानादिषट्कर्मशालित्वंकथ्यतेमया ॥

अर्थ— आता दानादि षट्कर्मांचा अधिकार या सारस्वत ब्राह्मणास आहे याविषयीं प्रथम हेतु सांगतों.

संस्कारायत्राविच्छिन्नाःसद्विजोऽजोजगादयं ॥
ईज्याध्ययनदानानिविहितानिद्विजन्मना ॥ १ ॥
जन्मकर्मावदातानांक्रियाश्चाश्रमचोदिताः ॥
विप्रस्याध्ययनादीनिषडन्यस्याप्रतिग्रहः ॥ २ ॥
राज्ञोवृत्तिःप्रजागोप्तुरविप्राद्वाकरादिभिः
वैश्यस्तुवार्तावृत्तिश्चनित्यंब्रह्मकुलानुगः ॥ ३ ॥

शूद्रस्यद्विजशुश्रूषावृत्तिश्चस्वामिनोभवेत् ॥
इत्यर्थश्रीमद्भागवतपुराणांकविचार्यतां ॥ ३ ॥

अर्थ–गर्भाधानादि संस्कार ज्या वर्णांमध्ये नष्ट होत नाहींत, त्या वर्णांस द्विज असें ह्मणावें. आतां जर शूद्रांचे संस्कार नष्ट झाले नाहींत तर, शूद्रांसही द्विज ह्मणावें असी कोणी शंका घेतील तर असें आहे कीं; ज्या वर्णांस ब्रह्मदेवानें संस्कार सांगितले आहेत तेच द्विज, शूद्रांस त्याणें मंत्रयुक्त संस्कार सांगितले नाहींत, केवळ विवाह मात्र सांगितला आहे. ( याविषयीं प्रमाण. ) विवाह मात्र संस्कारं शूद्रोऽप्यलभतांसदा ॥ नकेनचित्सृसमसृजच्छंदसांतंप्रजापतिः ॥ इति स्मृतिः.) या स्मृतींत शूद्राविषयीं वर लिहिल्याप्रमाणें प्रकार आहे. कारण शूद्रांस ब्रह्मदेवानें छंदेंकरून उत्पन्न केले नाहींत याविषयीं अन्य प्रमाण. ( गायत्र्या ब्राह्मण मसृजत्, त्रिष्टुभा राजन्यं, जगत्या वैश्यं, नकेनचित्शूद्रमितिश्रुतिः ॥ ) अर्थ– गायत्रीकरून ब्राह्मणांतें, त्रिष्टुभेकरून क्षत्रियांतें, जगतीकरून वैश्यांतें याप्रमाणें हे तीन वर्ण उत्पन्न केले; आणि शूद्रांस मात्र अन्य साधनावांचून उत्पन्न केलें; असें असल्याकारणानें शूद्रांस मुळींच द्विजत्व नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांचीं कर्में, यज्ञ करणें, अध्ययन करणें, दान करणें हीं तीन असून ज्या ज्या वर्णांस जे जे आश्रम सांगितले आहेत; त्या त्या आश्रमामध्यें राहून त्या त्या आश्रमाचीं कर्में करावीं ॥ १ ॥ ब्राह्मणादिक जे चार वर्ण, त्यांचे वृत्तिरूप धर्म सांगतों. ब्राह्मणास अध्ययनादि सहा कर्में आहेत त्यांतून अध्यापन, याजन आणि प्रतिग्रह हीं तीन कर्में उपजीविकार्थ आहेत याविषयीं प्रमाण ( षण्णांतुकर्मणामस्यत्रीणिकर्माणिजीविका ॥ याजनाध्यापनेचैवविशुद्धाच्चप्रतिग्रहः इतिमनुः ) ॥ १ ॥ जो अर्थ वर लिहिला आहे तोच अर्थ ( जाणावा. )

क्षत्रियांस आपत्कालीं अध्यापन, व याजन, या दोन कर्मांनीं

उपजीविका करण्याचा अधिकार आहे आतां सभ्यासनी म्हटेला जो क्षत्रिय, त्याणे ब्राह्मणव्यतिरिक्त प्रजेपासून कर, दंड, इत्यादि घेऊन, उपजीविका करावी. वैश्यानीं कृषि, वाणिज्यादि, ( शेतकी व्यापार, इत्यादि ) कर्मेकरून उपजीविका करावी याप्रमाणे, चारही वर्णांचे, धर्म, व कर्मे श्रीमद्भागवतामध्ये सांगितली आहेत

या भागवतोक्तीवरून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र या चार वर्णांतून, ब्राह्मणास मात्र षट्कर्मांचा अधिकार आहे. आणि याच विषयीं म वादिक प्रमाणे दाखवितो

इज्याध्ययनदानानिसर्वेषाचद्विजन्मना ॥
प्रतिग्रहोऽयापनचब्राह्मणस्यैवयाजन ॥ १ ॥
इतिशाडिल्यः ॥

अर्थ– यज्ञकरणे, अध्ययन करणे, आणि दान करणे, ही तीन कर्मे ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, या तीन वर्णांस उक्त आहेत आणि दान घेणे, शिष्य पढविणे, आणि ऋत्विज होऊन यजमानसबधानें हवनादि कर्मे करणे, ही तीन कर्मे मिळून साहा कर्मे केवळ ब्राह्मणासच सांगितली आहेत, असे शांडिल्य ऋषीचें वचन आहे.

कर्मविप्रस्ययजनदानमध्ययनतथा ॥
प्रतिग्रहोध्यापनच्याजनचेतिवृत्तय. ॥ १ ॥
इतिअत्रिः

अर्थ– यज्ञकरणे, दान करणे आणि अध्ययन करणे ही तीन कर्मे आणि दान घेणे, शिष्य पढविणे आणि यजमानसबधानें होमादि कर्म करणे, या तीन वृत्ति ( जीवनोपाय ) मिळून साहा कर्मे ब्राह्मणाचीच आहेत, याप्रमाणे अत्रीनें सांगितले आहे

षट्कर्माणिनिजान्याहुर्ब्राह्मणस्यमहात्मनः ॥
अध्यापनंचाध्ययनंयाजनंयजनंतथा ॥
दानंप्रतिग्रहश्चेतिषट्कर्माणीतिचोच्यते ॥ १ ॥

अर्थ— दुसऱ्यास वेद पढविणे, स्वतः पढणें, ऋत्विज होऊन यजमानसंबधानें हवनादि कर्म करणे, यज्ञकरणें, दान करणे आणि दान घेणें हीं साहा कर्मे ब्राह्मणाचीं, स्वकर्मे आहेत. याप्रमाणें हा-रीतानें सांगितलें आहे.

यजनंयाजनंदानंतथैवाध्यापनक्रिया ॥
प्रतिग्रहश्चाध्ययनंविप्रकर्माणिनिर्दिशेत् ॥ १ ॥
यजनंयाजनंदानंब्राह्मणस्यप्रतिग्रहः ॥
अध्यापनंचाध्ययनंषट्कर्माणिद्विजोत्तमाः ॥
⊛ इत्थंचभारतेदानधर्मेष्वस्तिमहेशगीः ॥ १ ॥

अर्थ— हे द्विजोत्तमहो, यज्ञकरणें, यजमानसंबधानें हवन करणें, दान घेणें, दान करणें, अध्ययन करणें, आणि दुसऱ्यास अध्ययन सांगणें, या साहा कर्माचा अधिकार ब्राह्मणास आहे. याप्रमाणें भारतांत दान धर्मामध्यें शिवगीतेंत सांगितलें आहे.

स्वाध्यायाध्यापनंचापियजनयाजनंतथा ॥
दानंप्रतिग्रहश्चैवषट्कर्माण्यग्रजन्मनः ॥ १ ॥
इतिबृहस्पतिः ॥

अर्थ— अध्यापनकरणें, वेद पढविणें, यज्ञकरणें, यजमानसंबधानें हवन करणें, दान करणें आणि दान घेणे हीं साहा कर्मे ब्राह्मणानीं करावीं. याप्रमाणें " बृहस्पतीनें " सांगितलें आहे —

⊛ एतैरनेकवचनैर्ब्राह्मणानांयदीरितं ॥

● तथैवपुप्रचारोहिदृश्यतेबलवत्तरः ॥
अतोमीषाब्राह्मणत्वेसंशयोनास्तिकश्चन ॥ १ ॥

**अर्थ**— या अनेक वचनानीं ब्राह्मणाविषयीं जो प्रचार सांगितला, त्याप्रमाणें, या सारस्वत ऊर्फ कोंकणे ब्राह्मणामध्यें प्रचार आहे. यावरून या या ब्राह्मणत्वाविषयीं काहींच संशय नाहीं.—

● द्वितीयःक्रियतेसिद्धःप्रचारोनामकर्मणः ॥

**अर्थ**— आता या सारस्वत ब्राह्मणाविषयीं नामकरणें संस्कारावरून द्वितीय हेतु सिद्ध करून सांगतों.

गर्भाधानमृतौपुंसःसवनंस्पदनात्पुरा ॥
षष्ठेष्टमेवासीमंतोमास्येतेजातकर्मच ॥ १ ॥

**अर्थ**— स्त्रास रजोदर्शन झाल्यापासून सोळा दिवसाच्या आत गर्भाधान संस्कार करावा, व, पुंसवन संस्कार गर्भिणीचा गर्भ चलन होण्याच्या पूर्वी करावा, व सहाव्या अथवा आठव्या महिन्यांत सीमंतोन्नयन संस्कार करावा, आणि स्त्री प्रसूत होतांच प्राण्याचा जातकर्म संस्कार करावा, याप्रमाणें "याज्ञवल्क्यानीं" सांगितलें आहे —

द्वादशेदशमेवापिजन्मतोदिवसेशुभे ॥
षोडशेविंशतोचैवद्वाविंशेवर्णतःक्रमात् ॥ १ ॥

**अर्थ**— प्राणी जन्मल्या दिवसापासून बाराव्या किंवा दहाव्या दिवशीं ब्राह्मणानीं, सोळाव्या दिवशीं क्षत्रियानीं, विसाव्या दिवशीं वैश्यानीं, आणि बेविसाव्या दिवशीं शूद्रानीं, याप्रमाणें चारीही वर्णांनीं अनुक्रमानें नामकरण संस्कार करावा याप्रमाणें "बृहस्पतीनें" सांगितलें आहे —

द्वादशेषोडशेविंशेजन्मतःक्रमतोदिने ॥
नामकर्मद्विजातीनाविप्रस्यदशमेपिवा ॥ १ ॥

**अर्थ—** जन्मदिवसापासून, बाराव्या दिवशीं ब्राह्मणानीं, सोळाव्या दिवशीं क्षत्रियांनीं, विसाव्या दिवशीं वैश्यांनीं, याप्रमाणें नामकरण संस्कार करावा, आणि बाहाव्या दिवशींही करण्याविषयीं "ब्राह्मणास" मात्र गौण पक्ष सांगितला आहे याप्रमाणें "महाभारतामध्यें" सांगितलें आहे.—

⊛ जन्मतोद्वादशेन्हिनामकर्मविधानकं ॥
कुर्वन्त्यतोहिगौडानाब्राह्मणत्वेनसंशयः ॥ १ ॥

**अर्थ—** या गौड सारस्वत ऊर्फ कोंकणे ब्राह्मणामध्यें इतर ब्राह्मणाप्रमाणें बाराव्या दिवशींच नामकरणविधि करण्याची चाल, चालत आहे, यावरून हे ब्राह्मण आहेत यांत संशय नाहीं.

⊛ शर्मेतिब्राह्मणस्योक्तमित्यादिस्मृतिभिर्मया ॥
शर्मेतिव्यवहाराच्चतृतीयःसाध्यतेधुना ॥

**अर्थ—** आतां शर्मे या नामरूढीनें तिसरा हेतु सिद्ध करितों.

शर्मेतिब्राह्मणस्योक्तवर्मेतिक्षत्रजन्मनः ॥
गुप्तदासात्मकनामप्रशस्तंवैश्यशूद्रयोः ॥ १ ॥

⊛ पराशरस्मृतिश्चेत्थंवर्ततेबलवत्तरा ॥

**अर्थ—** चारी वर्णांस नांवें निरनिराळीं सांगितलीं आहेत, तीं अशीं कीं ब्राह्मणास शर्म, क्षत्रियास वर्म, वैश्यास गुप्त, आणि शूद्रास दास, याप्रमाणें पराशरस्मृतींत प्रसिद्ध आहेत—उदाहरणें. देवदत्त शर्मा, इंद्रसेन वर्मा, इंद्रगुप्त आणि नंददासः याप्रमाणें यथानुक्रमें चारी वर्णांचीं उदाहरणें जाणावीं.

शर्मदेवश्चविप्रस्यवर्मत्राताचभूभुजः ॥
भूतिर्दत्तश्चवैश्यस्यदासःशूद्रस्यकारयेत् ॥ १ ॥

**अर्थ**– शर्म अथवा देव, वर्म अथवा त्राता, भूति अथवा दत्त आणि दास हीं नामें चारी वर्णांस ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांस ) अनुक्रमानें सांगितलीं आहेत

तपसाब्रह्मचर्येणदमेनचशमेनच ॥
जगताशर्मदानेनशर्मेतिब्राह्मणोभवेत् ॥ १ ॥

**अर्थ**– तपश्चर्या, ब्रह्मचर्यव्रत, इंद्रियांचें दमनकरणें आणि अंतःकरणांत कामक्रोधादि किंवा संकल्प विकल्पादि ज्या अनेक वृत्ति उठतात, त्याहियेंकरून, अंतःकरणाची वृत्ति स्वस्थकरणें अशा या चार प्रकारानीं जगाचें शर्म ( कल्याण ) करितात ह्मणून, शर्म हें नाम ब्राह्मणासच योग्य. उदाहरण " वसिष्ठशर्मा ब्राह्मण "

तापत्रयाद्भीतिवलाज्जगरसंरक्षणादपि ॥
तस्माद्वर्मसमंवीरंवर्मेतिक्षत्रियोभवेत् ॥ १ ॥

**अर्थ**– तापत्रय ह्मणजे, आधिभौतिक, ( भूतादि पिशाच्यापासून ) आधिदैविक, ( इंद्रादि देवापासून ) आणि आध्यात्मिक ( रागादिकापासून शरीरास दुःख ) या तीन तापापासून ( पीडापासून ) पायानें ( ह्मणजे पिशाच पीडापासून मंत्र यंत्रादि उपचारानीं, इंद्रादि देवकृत पीडापासून यज्ञादि कर्म करण्यानें, रोगापासून औषधादि उपचारानीं ) सर्व जगाचें संरक्षण करितात, ह्मणून क्षत्रियास वर्म हें नाम सांगितलें आहे. उदाहरण " इंद्रध्वजवर्माक्षत्रिय

कालेकालेधनंदत्वासर्वान्गोपायतीतिवत् ॥
तस्माद्वैश्यस्यनामैतद्गुप्तमित्यभिधीयते ॥ १ ॥

**अर्थ**– वारंवार, सर्व लोकांस, द्रव्य देऊन, त्यांचें, गोपन ( संरक्षण ) करितात, ह्मणून वैश्यास, गुप्त असें नाम उक्त आहे. उदाहरण इंद्रगुप्तो,वैश्य ",

द्विजान्शुश्रूषयानित्यंशूद्रस्तोषयतीतिवत् ॥
तस्माच्छूद्रस्यदासेतितत्स्त्रीणांचतथातथा ॥ १ ॥

अर्थ–शूद्र हे ब्राह्मणांची सेवा अथवा दास्यत्व करितात ह्मणून, त्यांस दास असें नाम सांगितलें आहे. उदाहरण; नंददास:शूद्र: याचप्रमाणें चारी वर्णांच्या स्त्रियांचीं अनुक्रमानें नामें जाणावीं.

ॐ इत्थंयमस्यवचनंजागर्तिपृथिवीतले ॥
ॐ अनेनेमेप्रकुर्वंतिव्यवहारंचभूसुराः ॥
ॐ अतोमीषांब्राह्मणत्वंसिद्ध्यतीतिनसंशयः ॥ १ ॥

अर्थ–याप्रमाणें यमाचें वचन सर्व जगांत प्रसिद्ध आहे, आणि यास वचनाप्रमाणें सर्व वर्णांच्या, नामाचा प्रचार चालू आहे. व या "सारस्वत ऊर्फ शेणवी" ब्राह्मणांमध्यें शर्म या नामाची चाल प्राचीन कालापासून चालत आहे. आणि आजपावेतों कोणीच ही चाल दूषित केली नाहीं, यावरून हे निर्विवाद ब्राह्मणच आहेत, यांत संशय नाहीं असें सिद्ध होतें.

ॐ व्रतबंधनकालेनचतुर्थःसाध्यतेऽधुना ॥

अर्थ– व्रतबंधनाच्या कालेंकरून चवथा हेतु सिद्ध करितो.

अथगर्भाष्टमेवर्षेब्राह्मणस्योपनायनं ॥
जन्माष्टमेवाकर्तव्यंतथैवाब्देतुपंचमे ॥ १ ॥
राज्ञामेकादशेकार्यंद्वादशेतुविशांस्मृतं ॥
ॐ एवंवसिष्टवचनंसततंचविचार्यतां ॥ २ ॥

अर्थ– गर्भापासून अथवा जन्मापासून, अष्टम वर्षीं, "ब्राह्मणांनीं," अकराव्या वर्षीं "क्षत्रियांनीं," बाराव्या वर्षीं "वैश्यांनीं," याप्रमाणें तीनही वर्णांनीं उपनयन संस्कार करावा. आतां ब्राह्मणांविषयीं दु-

सरा पक्ष असा आहे कीं, जर कुमारास, अध्ययनाची रुचि असून जर तो कुमार बुद्धिमान् आहे, तर पंचम वर्षीही उपनयन संस्कार करावा. याप्रमाणे वसिष्ठानें सांगितलें आहे, त्याचा विचार करावा.

अष्टमेवर्षेब्राह्मणमुपनयेद्गर्भाष्टमेवैकादशेक्षत्रियंद्वादशे वैश्यमाषोडशाद्ब्राह्मणस्यानतीतःकालआद्वाविंशात्क्षत्रियस्याचतुर्विंशाद्वैश्यस्यातऊर्ध्वंपतितसावित्रीकाभवंति नैनानुपनयेन्नाध्यापयेन्नयाजयेन्नैभिर्व्यवहरेयुरितिश्रुतिः ॥

अर्थ– ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीनी वर्णांनीं उपनयन संस्कार या श्रुतिमताप्रमाणे करावा. ह्म. ब्राह्मणानें गर्भा पासून अथवा जन्मापासून अष्टम वर्षीं, क्षत्रियानीं अकराव्या वर्षीं, आणि वैश्यानीं बाराव्या वर्षीं, याप्रमाणें तीनी वर्णांनीं उपनयन संस्कार करण्यास योग्य काल आहेत आणि हे उक्तकाल जर काहीं आपत्तीमुळें अतिक्रांत झाले तर गौण काल सांगितले आहेत ते असे कीं, अष्टम वर्षांपासून सोळा वर्षांपर्यंत ब्राह्मणास, अकरा वर्षांपासून बेवीस वर्षांपर्यंत क्षत्रियास आणि बारा वर्षांपासून चोवीस वर्षांपर्यंत वैश्यास याप्रमाणे गौण पक्ष आहेत. हेही काल अतिक्रांत झाले ह्मणजे ते तीनी वर्णांतील कुमार पतितसावित्रीक होऊन द्विजत्वापासून भ्रष्ट होतात ह्मणून त्यांचा संस्कार करूं नये. अध्ययन किंवा हवनादि अथवा त्याच्या बरोबर अन्न व्यवहारही करण्यास ते योग्य नाहींत. याप्रमाणें आश्वलायन गृह्यसूत्र आहे.

गर्भाष्टमेऽब्देव्रतबंधनंस्याद्विप्रस्यकुर्यादथवाष्टमेऽब्दे ॥ व्रतक्षयेपंचमषष्ठयोर्वा स्यादितदुक्तंतुकपर्दिमुख्यैः ॥ १ ॥

अर्थ– ब्राह्मणाचा व्रतबंध संस्कार करणें तो, गर्भापासून, अथवा

जन्मापासून, अष्टम वर्षी करावा. जर तो मुलगा बुद्धिमान् असून, त्याच्या अध्ययनाचे दिवस व्यर्थ जातात तर पांचव्या अथवा साहाव्या वर्षी उपनयन संस्कार करावा. याप्रमाणें कपर्दि ऋषिमुख्यानीं सांगितलें आहे.

ब्रह्मवर्चसकामस्यगर्भतोजन्मतोपिवा ॥
सप्तमेवाष्टमेवर्षेब्राह्मणस्योपनायनं ॥
❀ इतिक्षीरनिधावस्तिकश्यपस्यमुनेर्वचः ॥ १ ॥

अर्थ— मोक्षाची इच्छा ज्या ब्राह्मणास आहे त्याचा, जन्मापासून अथवा गर्भापासून अष्टम वर्षी अथवा सप्तम वर्षी उपनयन संस्कार करावा, याप्रमाणें क्षीरनिधि म्हणजे कश्यप ऋषीनें सांगितलें आहे.

वसंतोग्रीष्मशरदोब्रह्मक्षत्रविशांक्रमात् ॥
मौंजीबंधनकालाःस्युःसर्वेषांचोत्तरायणं ॥ १ ॥

अर्थ— ब्राह्मणादिक तीन वर्णांच्या, उपनयन संस्काराविषयीं, वसंत, ग्रीष्म, आणि शरद, हे तीन ऋतु अनुक्रमानें उक्त आहेत. आतां या उपनयन संस्कारास दुसरे काल आहेत ते दाखवितों.

माघादिपंचकालेषुमौंजीपंचसुशस्यते ॥
वसंतर्तुस्तुविप्राणांतत्रश्रेष्ठतमःस्मृतः
❀ इतिवाक्वृद्धगर्गस्यकालादर्शेतुपश्यतां ॥
भवेत्तथैवसिद्धांतोब्राह्मणत्वेविचारणात् ॥ १ ॥

अर्थ— माघादिक ( माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख आणि ज्येष्ठ ) या पांच मासांत उपनयन संस्कार सर्वांनी करावा. त्यांतून, चैत्र व वैशाख हे दोन महिने ब्राह्मणास अति उत्तम आहेत. याप्रमाणें, कालादर्श म्हणजे, वृद्धगर्गानीं सांगीतलें आहे, तें पाहावें म्हणजे

विचारा यंती या सारस्वतांच्या ब्राह्मणत्वा विषयीं पूर्वी सांगितला जो हेतु त्याचा सिद्धांत होईल यांत संशय नाहीं.

अथकाषायवस्त्रेणपंचमःकथ्यतेत्रहि ॥

अर्थ— आतां काषायवस्त्रधारणानें पांचवा हेतु सांगतों.

यदिवासांसिवसीरन्रक्तानिवसीरन्काषायंब्राह्मणो माजिष्टंक्षत्रियोहारिद्रंवैश्यइतिश्रुतिः ॥

अर्थ— जर उपनयन झालेले बटू वस्त्रें धारण करणार तर ब्राह्मणांनीं रक्तवस्त्र अथवा काषाय ( भगवें ) वस्त्र, क्षत्रियांनीं मांजिष्ठ ( मंजिष्ठ रंगाचें ) वस्त्र, वैश्यांनीं, पिवळें वस्त्र याप्रमाणें धारण करावीं. असें आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितलें आहे.

अतःकाषायवासोहिब्राह्मणस्यैवधारणं ॥
मांजिष्टंक्षत्रियस्योक्तंहारिद्रंवैश्यजन्मनः ॥ १ ॥
शुक्लंकाषायवस्त्रंवाब्राह्मणस्यविधीयते ॥
माजिष्टमथवाशुक्लंक्षत्रियस्यविधीयते ॥ २ ॥
हारिद्रंशुक्लमथवावैश्यस्यैवविधीयते ॥
इत्थंहिगौतमेनोक्तंवर्ततेत्रलवत्तरं ॥ ३ ॥

अर्थ— ब्राह्मण बटूस काषाय, ( भगवें ) वस्त्र धारणा विषयीं प्रशस्त, क्षत्रियबटूस मांजिष्ठ ( मंजिष्ठ रंगाचें ) वस्त्र प्रशस्त आणि वैश्यबटूस हारिद्र ( हरिद्रा युक्त, पिवळें )याप्रमाणें तीन वर्णांस, तीन प्रकारचीं वस्त्रें प्रशस्त आहेत; यांच्या अभावीं तीनी वर्णांनीं शुभ्र वस्त्रें धारण करावीं. याप्रमाणें गौतमऋषींचें वचन आहे.

तथावासांसिवक्ष्यामिविप्रादीनामनुक्रमात् ॥

काषायंचैवमांजिष्ठंहारिद्रंचतथैवच ॥ १ ॥

इत्थंवृहन्नारदीयपुराणोक्तंविचिंत्यतां ॥

अर्थ– तशींच ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीनी वर्णांच्या बटूनीं वस्त्रें धारण करणें तीं कोणत्या रीतीचीं असावीं तीं सांगतों. तीन वर्णांस अनुक्रमानें काषाय, मांजिष्ठ आणि हारिद्र हीं धारण करण्याविषयीं प्रशस्त आहेत. याप्रमाणें बृहन्नारदीय पुराणामध्यें सांगितलें आहे त्याचा विचार करावा.

७ इतिकाषायवस्त्रस्यविप्राणामेवधारणं ॥

तदेवधार्यतेऽमीभिरतोविप्रत्वनिश्चयः ॥ १ ॥

याप्रमाणें काषाय वस्त्राचें ग्रहण ब्राह्मणांसच सांगितलें आहे आणि तेंच काषायवस्त्र हे गौड सारस्वत उर्फ शेणवी धारण करितात, यावरून यांच्या ब्राह्मणत्वाचा निर्बाध निश्चय होतो.

८ अजिनग्रहणेनैवषष्टोहेतुरथोच्यते ॥

अर्थ– अजिनग्रहणरूप सहावा हेतु सांगतों.

ऐणेयेनवाजिनेनब्राह्मणंरौरवेण

क्षत्रियमाजेनवैश्यमितिश्रुतिः ॥

अर्थ– ब्राह्मणास, ऐणेय ( हरिणाचें चर्म ) व क्षत्रियांस रुरूचें चर्म, वैश्यांस, मेंढ्याचें चर्म, याप्रमाणें तीन वर्णांस तीन प्रकारचीं, चर्में धारण करण्याविषयीं उक्त आहेत.

उत्तरीयतयाकृष्णाजिनंविप्रस्यकीर्तितं ॥

सारंगस्याजिनराज्ञोविशोवस्ताजिनंयतः ॥ १ ॥

अर्थ– ब्राह्मण बटूस कृष्णाजिन, क्षत्रिय बटूस सारंगाचें अजिन ( चर्म, ) वैश्य बटूस बस्ताचें ( मेंढ्याचें ) अजिन ( चर्म, ) या-

प्रमाणें तीन वर्णांस तीन चर्मे उत्तरीय देऊन ( उपवस्त्र करिता ) सांगितलीं आहेत.

कृष्णसारंगवस्तानामजिनंक्रमशःस्मृतं ॥
विप्रक्षत्रियवैश्यानांवटूनांधारणायच ॥ १ ॥

अर्थ— कृष्णसार ( मृग ) सारंग ( मृग ) वस्त ( मेंढा ) यांचीं, चर्मे, यथानुक्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य, या तीन वर्णांच्या, बटूस, धारण करण्याविषयीं, योग्य सांगितलें आहेत.—

● इत्थमेणेयाजिनस्यधारणंब्रह्मगोचरं ॥
अस्यैवरूढिर्गौडेषुदृश्यतेत्रलवत्तरा ॥
अतोमीषांब्राह्मणत्वंसिध्यतीनिनसंशयः ॥ १ ॥

अर्थ— याप्रमाणें कृष्णाजिन धारण करणें हें केवळ ब्राह्मणांसच सांगितलें आहे. आणि हें कृष्णाजिन धारण करण्याची रूढी या गौड सारस्वत उर्फ कोंकणे ब्राह्मणामध्यें अनादि काला पासून चालली आहे, यावरून यांचें ब्राह्मणत्व सिद्ध होतें यामध्यें संशय नाहीं.

● धारणादुपवीतस्यसप्तमोहेतुरुच्यते ॥

अर्थ— आतां उपवीतधारणभेदानें सातव्या हेतूचें कथन करितों.

कार्पासमुपवीतंस्याद्विप्रस्योर्ध्ववृतंत्रिवृत् ॥
शणसूत्रमयंराज्ञोवैश्यस्याविकसूत्रकं ॥ १ ॥

अर्थ— ब्राह्मणास यज्ञोपवीत कापसाचें असून नवततु आणि ग्रथियुक्त असावें, क्षत्रियांस सणाचें, आणि वैश्यास मेंढ्याच्या लोकरीचें, याप्रमाणें तीन वर्णांस, अनुक्रमानें, यज्ञोपवीतें सांगितलीं आहेत, याप्रमाणें " मनूनें " सांगितलें आहे.

● कार्पासस्योपवीतस्यधारणंब्रह्मगोचरं ॥

● तदेवधार्यतेऽमीभिरतोब्रह्मत्वनिश्चयः ॥

अर्थ— कार्पास यज्ञोपवीत ब्राह्मणासच उक्त असून तेच यज्ञोपवीत हे गौड सारस्वत उर्फ कोंकणे शेणवी धारण करितात, यावरून यांच्या विप्रत्वाविषयीं निश्चय होतो.

● अष्टमःकथ्यतेमौंजीमेखलाधारणात्तथा ॥ ८ ॥

अर्थ— आतां मौंजीच्या मेखलाधारणानें आठवा हेतु सांगतो.

तेषांमेखलामौंजीब्राह्मणस्यधनुर्ज्याक्षत्रियस्या वीवैश्यस्यइतिश्रुतिः ॥

अर्थ— ब्राह्मणास मौंजाची, क्षत्रियास धनुष्याच्या दोरीची, आणि वैश्यास मेंढ्याच्या लोंकरीची, याप्रमाणें तीन वर्णांस, तीन प्रकारच्या मेखला ( *कमरेस बांधण्याच्या मुंजी* ) असाव्या.

● एवंमौंजीमेखलायाधारणंब्रह्मगोचरं ॥

●, तस्यैवधारणादेषांब्राह्मणत्वंहिसिध्यति ॥ ९ ॥

अर्थ— याप्रमाणें ब्राह्मणांनीं मौंजी मेखलेचें धारण करावें म्हणून सांगितलें, त्याचप्रमाणें हे गौड मौंजी मेखला धारण करितात यावरून यांचें ब्राह्मणत्व सिद्ध होतें.

● कथ्यतेदंडमानाभ्यांनवमोदशमस्तथा ॥ ९ ॥ १० ॥

अर्थ— पालाशदंडानें व त्याच्या मानानें नववा आणि दाहावा असे दोन हेतु सांगतों.

तेषादंडाःपालाशोब्राह्मणस्यौदुंबरःक्षत्रियस्यवै ल्वोवैश्यस्यकेशसंमितोब्राह्मणस्यललाटसंमि तःक्षत्रियस्यप्राणसंमितोवैश्यस्य इतिश्रुतिः ॥

अर्थ— ब्राह्मणास पळसाचा, क्षत्रियास उदुंबराचा आणि वैश्या-

स वेगाचा, याप्रमाणें, तीन वर्णांच्या बटूंस दंड उक्त आहेत. ते तीनही दंड केवढे असावे त्याचीं प्रमाणें सांगतों. ब्राह्मणांचा दंड केशसमित (केशप्रमाण,) क्षत्रियाचा ललाटापर्यंत, आणि वैश्याचा नासाग्र पर्यंत याप्रमाणें असावे. यास सद्बूरें प्रमाण.

पालाशोब्राह्मणस्योक्तोनृपस्यौदुंवरस्तथा ॥
वैल्वोवैश्यस्यविज्ञेयःप्रमाणंशृणुतद्द्विजाः ॥ १ ॥

अर्थ– ते असें कीं ब्राह्मणास पळसाचा, क्षत्रियास उदुंबराचा, आणि वैश्यास वेगाचा, याप्रमाणें तीन वर्णांच्या बटूंस तीन दंड सांगितले आहेत. आतां ते दंड केवढे असावे त्यांचीं प्रमाणें सांगतों.

विप्रस्यकेशमानंस्यादाललाटंनृपस्यतु ॥
नासाग्रसंमितंदंडवैश्यस्याहुर्विपश्चितः ॥ १ ॥

अर्थ– ब्राह्मणास केशसमित (केशापर्यंत), क्षत्रियास ललाटापर्यंत आणि वैश्यास नासिकाग्रापर्यंत याप्रमाणें तीन वर्णांस तीन प्रमाणें सांगितलीं आहेत.

विप्रस्यदंडःपालाशोवैल्वोवाधर्मतःस्मृतः ॥
आश्वत्थःक्षत्रियस्याथखादिरोवापिधर्मतः ॥ १ ॥
औदुंवरोथवैश्यस्यप्लाक्षोवादंडउच्यते ॥
एतेषामप्यभावेचसर्वेषामेवयज्ञियाः ॥ २ ॥

अर्थ– ब्राह्मणास मुख्यत्वेंकरून पळसाचा दंड असावा, परंतु प्रसंगीं त्याच्या अभावीं वेगाचा दंड उक्त आहे. याचप्रमाणें पूर्वी उक्त वर्णास जे दंड सांगितले त्याच्या अभावपक्षीं दंड घ्यावे ते असे कीं, क्षत्रियानीं पिंपळाचा अथवा खैराचा आणि वैश्यानीं उदुंबराचा अथवा वडाचा, याप्रमाणें आहेत परंतु याचाही अभाव असल्यास

सर्व वर्णांनीं यज्ञिय ( ह्मणजे ) यज्ञास जीं उक्त काष्ठें त्यांचा धारावा. याप्रमाणें " ब्रम्हपुराणांत " सांगितलें आहे.

॥ पालाशदंडग्रहणंकुर्वतीमिहिसर्वदा ॥

॥ तस्माद्देपांब्राम्हणत्वंसिध्यतीतिनिर्संशयः ॥ १ ॥

अर्थ— पालाश दंडाचें ग्रहण ब्राम्हणासच उक्त आहे, याप्रमाणें वरील प्रमाणावरून सिद्ध होतें, याप्रमाणेंच हे गौडब्राह्मण पालाश दंड ग्रहण करितात, यावरून यांचें ब्राम्हण त्व सिद्ध होतें यांत संशय नाहीं.

॥ अथभिक्षाविधानेनैकादशःकथ्यतेधुना ॥ ११ ॥

अर्थ— आतां भिक्षा विधानेंकरून अकरावा हेतु सांगतों.

भवत्पूर्वंचरेद्भैक्ष्यमुपनीतोद्विजोत्तमः ॥

भवन्मध्यंतुराजन्योवैश्यस्तुभवदुत्तरं ॥ १ ॥

अर्थ— उपनयन झाल्या नंतर बटूनीं भिक्षा मागावी तिच्या मंत्राची रीती. ब्राम्हणबटूनीं भिक्षादेहि यामंत्रास भवति असें पूर्वीं लावून भवतिभिक्षांदेहि, असा मंत्रोच्चार करावा. क्षत्रियांनीं भवति मध्यें लावून भिक्षांभवतिदेहि असें ह्मणावें, वैश्यांनीं शेवटीं भवति शब्द लावून भिक्षांदेहिभवति असें ह्मणावें, याप्रमाणें तीनीही वर्णांनीं मंत्रोच्चार करून भिक्षा मागावी. याप्रमाणें मनुस्मृतींत व कूर्मपुराणांत सांगितलें आहे.

ब्राम्हणेषुचरेद्भैक्षमनिंद्येष्वात्मवृत्तये ॥

आदिमध्यावसानेषुभवच्छब्दोपलक्षितं ॥

ब्राम्हणक्षत्रियविशांभिक्षचर्यायथाक्रमं ॥ १ ॥

अर्थ— मागील श्लोकांत लिहिल्याप्रमाणें तीनी वर्णांनीं अनुक्र-

मानें मंत्राचा उच्चार करून, पूज्य ब्राह्मणाच्या घरीं, भिक्षा मागावी. याप्रमाणें " याज्ञवल्क्यानें " सांगितलें आहे.

■ एवंभिक्षायाचनमंत्रमुक्त्वाभैक्ष्ययाचनाविधिःकथ्यते.

अर्थ– याप्रमाणें भिक्षा मागण्याचा मंत्र सांगितला; आतां भिक्षा मागण्याचा विधि सांगतो.

गृहीतविधिनोपेतःपरिवृतोत्तरीयकः ॥
दंडपात्रंसमादायनमस्कृत्यगुरुंरविं ॥ १ ॥
भिक्षार्थंतुततोमौनीद्विजोवेश्मततोव्रजेत् ॥
ब्राह्मणानामदुष्टानांनचेत्क्षत्रियवैश्ययोः ॥ २ ॥

अर्थ–ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांणीं यथाशास्त्र उपनयन संस्कार करून नंतर, उपवस्त्र धारण करून हस्तामध्यें दंड आणि पात्र घ्यावें नंतर, गुरु व रवि, यांस नमस्कार करून भिक्षा मागण्यासाठीं चांगल्या साधु दुष्ट नव्हे अशा ब्राह्मणाच्या घरीं जावें, दुष्ट ब्राह्मणाकडे जाऊं नये. जर या ग्रामांत सद्ब्राह्मण नाहीं तर सत्क्षत्रिय अथवा सद्वैश्याकडे भिक्षा मागावी असें "व्यासानीं" सांगितलें आहे.

❁ भवतिभिक्षांदेहीतिप्रचारोदृश्यतेखलु ॥
❁ गौडेष्वतोब्राह्मणत्वंसिध्यतीतिनसंशयः ॥

अर्थ– या गौडब्राह्मणांत भवतिभिक्षांदेहि याप्रमाणें भिक्षामंत्र बोलण्याचा प्रचार प्राचीन काळापासून चालत आहे. यावरून याचें ब्राह्मणत्व सिद्ध होतें, यांत संशय नाहीं.

❁ गायत्र्याउपदेशस्यविप्रस्यैवाधिकारिता ॥
❁ राजन्यवैश्ययोर्नास्तीत्येतदाहमुनिर्मनुः ॥

❀ एवमेवमुनीनांचबहूनांवर्ततेमतं ॥

अर्थ– पुत्राला, गायत्रीचा उपदेश करण्याचा अधिकार ब्रा. ह्मणासच आहे. क्षत्रिय आणि वैश्य यास उपदेश करण्याचा अधिकार नाहीं. क्षत्रिय, आणि वैश्य यांच्या मुलास उपदेश करणें तें त्यांच्या उपाध्यायानें करावा; कारण पूर्वी जीं यजनादि षट्कर्में सांगितलीं, त्यांत अध्यापन हे, एक कर्म असून त्याचा अधिकार ब्राह्मणालाच आहे. क्षत्रिय आणि वैश्य यांस नाहीं. आणि अध्यापन व उपदेश यामध्ये भेद नसल्याकारणानें उपदेशाचाही अधिकार क्षत्रिय, व वैश्य याना नाहीं, हें सिद्ध होतें. याप्रमाणे, "मन्वादिक ऋषींचें" मत आहे. यास दुसरें प्रमाण.

पितैवोपनयेत्पुत्रंतदभावेपितुःपिता ॥
तदभावेपितुर्भ्रातातदभावेपिसोदरः ॥
❀ इत्थंप्रयोगरत्नेस्तिपितैवास्तिब्रह्मगोचरं ॥
● अधीतेपूपदेशोहिपितुरेवप्रदश्यते ॥
❀ तस्मादेषांब्राह्मणत्वेसंशयोनास्तिकश्चन ॥

अर्थ– पुत्राचें उपनयन करणें तें, पित्यानें करावें. जर पिता नसेल तर पित्याच्या पित्यानें (म्ह. आजानें) करावें. त्याच्या अभावीं पितुर्भ्राता, (म्ह. चुलत्यानें) करावें. त्याच्याही अभावीं सोदरानें (म्ह. बंधूनें) करावें. याप्रमाणें उत्तरोत्तर कनिष्ठ पक्ष आहेत. हा सर्व शास्त्राधार ब्राह्मणाविषयींच आहे. असें प्रयोग रत्नांत; सांगितलें आहे आतां या सारस्वत ऊर्फ शेणवी ब्राह्मणामध्यें देशस्थादिक ब्राह्मण जवळ असले तथापि पित्यानेंच उपदेश करण्याचा प्रचार सर्वत्र दिसतो. यावरून यांचे ब्राह्मणाविषयीं कांहींच संशय नाहीं.

अथत्रयोदशोहेतुःप्रणामविधिनोच्यते ॥

अर्थ– आतां नमस्कार विधीनें तेरावा हेतु सांगतों.

अभिवादेश्रोत्रसमेनिजहस्तप्रसारणम् ॥
विप्रमात्रस्यगदितमन्येषामन्यादिष्यते ॥
स्वश्रोत्रपूर्वमारभ्यपाणिभ्यांजानुनोह्यधः ॥
स्वगुरुंब्राह्मणःश्रोत्रसमहस्तंप्रसारयेत् ॥
उदरस्यतुराजन्योवैश्यामध्यसमंततः ॥
नीचैःशूद्रस्ततोन्योपितंप्रत्यभिवदेन्मुदा ॥
◎ इत्यर्थस्मृत्यर्णवग्रंथवाक्यमाकर्ण्यतामिदं ॥
◎ योग्याभिवादनेश्रोत्रसमहस्तप्रसारणात् ॥
◎ शाण्ड्यानोब्राह्मणत्वेसंशयोनास्तिकश्चन ॥

**अर्थ**– ब्राह्मणांनीं नमस्कार करणें तो कानाबरोबर हात नेऊन करावा. क्षत्रियांनीं पोटास हात लावून करावा. वैश्यांनीं कंबरेस हात लावून करावा. आणि शूद्रांनीं गुडघ्यांच्या खालीं हात नेऊन करावा, याप्रमाणें " स्मृत्यर्णव ग्रंथांत " तात्पर्य आहे. आणि त्याप्रमाणें हे गौड सारस्वत ऊर्फ शाणवी हे योग्याभिवादनाविषयीं श्रोत्रसम हस्त करून नमस्कार करितात. यावरून यांच्या विप्रत्वाविषयीं काहींच संशय नाहीं.

◎ चतुर्दशःकथ्यतेथगोत्रप्रवरनिर्णयात् ॥

**अर्थ**–आतां गोत्रप्रवर निर्णयेंकरून चवदावा हेतु सिद्ध करितों.

अनन्यपूर्विकांकांतामसपिंडांयवीयसीं ॥

**अर्थ**–अनन्यपूर्विका ज्या स्त्रिया त्यांसेरीज, (पुनर्विवाहाची, वाग्दान झालेली, मनानें दिलेली, सप्तपदी झालेली, गर्भिणी आणि प्रसूत झालेली या सातप्रकारच्या स्त्रियां सेरीज ), वराच्या दृष्टीस व मनास आनंद करणारी, सापिंडामध्ये जन्मलेली नव्हे, वयानें व

शरीरानें वरापेक्षां ल्हान.

अरोगिणींभ्रातृमतीमसमानार्षगोत्रजां ॥

इतियाज्ञवल्क्यः

**अर्थ**— आणि निरोगी, जीस बंधु आहेत ती, समान गोत्रांतील, व समान प्रवरांतील, नव्हे अशा प्रकारच्या मुली बरोबर विवाह करावा. **समान** गोत्रें व समान प्रवर हे ब्राह्मणांत प्रसिद्धच आहेत परंतु क्षत्रिय व वैश्यांचीं गोत्रें व प्रवर सांगतों.

स्मृतौपुरोधसोगोत्रप्रवरौक्षत्रवैश्ययोः ॥

इत्थंहिसर्वसिद्धांतइत्याहकमलाकरः ॥ १ ॥

**अर्थ**— क्षत्रिय आणि वैश्य यानां गोत्र व प्रवर हे पुरोहितांकडून त्यांच्या उपाध्यायांचेच धरावे याप्रमाणें, "संस्कारकौस्तुभ" इत्यादि ग्रंथकारांचा सिद्धांत आहे त्याचप्रमाणें "कमलाकरही निर्णय सिंधूत" सांगतो ह्मणून येथें दर्शविलें आहे.—

प्रवरोयंमानवैलपौरूरवसनामकः ॥

क्षत्रियाणांचसर्वेषामिकएवनचेतरः ॥ १ ॥

एकमेवतथागोत्रंसर्वेषांमनुनामकं ॥

भालंदलोवात्सप्रसांकितेतिप्रवरस्त्वयं ॥ २ ॥

तथाभालंदलंगोत्रंवैश्यानामेकमेवहि ॥

अथवाक्षत्रियविशांगोत्रंप्रवरएवच ॥ ३ ॥

पुरोधसस्तुभवतिविवाहघटनापटुः ॥

प्राहुरेवंतुमन्वाद्यागोत्रप्रवरनिर्णयं॥ ४ ॥

श्रुतिस्मृतिभिरुक्तोयोगोत्रप्रवरनिर्णयः ॥

एषांजातौतत्प्रवृत्तिःकुत्रापिदृश्यतेनहि ॥ ५ ॥

ॐ अपिचब्राह्मणानायेगोत्रप्रवरनिर्णयाः ॥
ॐ तेपामेपुप्ररूढिश्चदृश्यतेत्रलवत्तरा ॥ ६ ॥
ॐ अतःकोंकणविप्राणाममुनागोत्रहेतुना ॥
ॐ मुख्यविप्रत्वसंसिद्धिर्भवतीतिनसंशयः ॥ ७ ॥

अर्थ—( मानवेल पोरस्वस ) याप्रमाणें सर्व क्षत्रियास एकच प्रवर सांगितला आहे; दुसरा प्रवर क्षत्रियास नाहीं. तसेंच गोत्र ( मनु ) हें सर्व क्षत्रियास एकच आहे, दुसरें नाहीं. वैश्याचा प्रवर ( भालंदवत्सास प्रसांकिल ) असा आहे व गोत्र ( भाल्दल ) हें गोत्र व प्रवर सर्व वैश्यांस एकच आहेत. अथवा क्षत्रिय आणि वैश्य यांला गोत्र प्रवर हे, आपल्या उपाध्यायाचे जे असतील तेच धरावे असे मन्वादि ऋषीनीं सांगितलें आहे. आणि याचप्रमाणें हल्लीं या दोन वर्णांत उपाध्यायाच्याच गोत्र प्रवरानीं विवाहादिक कार्ये होत असतात. आता हे जे दोन वर्णांचे गोत्र प्रवराचे निर्णय सांगितले त्यातून या सारस्वत कोंकणे ( शेणवी ) ब्राह्मणात कोणतीच प्रवृत्ति चालू दिसत नाहीं आणि, जीं ब्राह्मणाचीं काश्यपादि गोत्रें, व प्रवर सांगितले आहेत तेच गोत्र व प्रवर हे या सारस्वतामध्ये अनादि कालापासून चालू आहेत. आणि या रूढीस आजपर्यंत कोणीच दूषित करून तिचा निषेध केला नाहीं. यावरून असें अनुमान होतें कीं, हीं गोत्रे व प्रवर हे त्यांचे पूर्वीपासून सिद्धच आहेत, तेव्हा या गोत्र प्रवर रूढीच्या हेतूनें कोंकणे ब्राह्मणाच्या ब्राह्मणत्वाची सिद्धि होऊन हे सर्व कर्माधिकारी जसे देशस्थादि ब्राह्मण त्याप्रमाणेंच हे आहेत यात संशय नाहीं.—

ॐ अथाश्रमाधिकारिणेहेतुःपंचदशोमतः ॥

अर्थ—आतां आश्रमाधिकारानें हा पधरावा हेतु सागतों.

चत्वारोब्राह्मणस्योक्ताआश्रमाःश्रुतिचोदिताः ॥
क्षत्रियस्यत्रयःप्रोक्ताद्वावेकोवैश्यशूद्रयोः ॥ १ ॥
ॐ इत्थंहिविद्यतेवृद्धयाज्ञवल्क्यसरस्वती ॥

अर्थ—ब्राह्मणास वेदानें सांगितले जे चार आश्रम (ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, आणि संन्यासाश्रम) हे चार ग्रहण करण्याचा अधिकार ब्राह्मणास मात्र आहे. संन्यासाश्रम हा खेरीज करून बाकीच्या तीन आश्रमाचा मात्र अधिकार क्षत्रियांस आहे. व ब्रह्मचर्य आणि गृहस्थाश्रम या दोहोंचा मात्र अधिकार वैश्यांस आहे. आणि गृहस्थाश्रमाचा मात्र अधिकार शूद्रांस आहे. या खेरीज दुसऱ्या आश्रमाचा अधिकार शूद्रास नाहीं याप्रमाणें वृद्ध "याज्ञवल्क्यानीं" सांगितले आहे.

गार्हस्थ्यंब्रह्मचर्यंवानप्रस्थत्रयआश्रमाः ॥
क्षत्रियस्यापिकथितायआचाराद्द्विजस्यहि ॥१॥
वैखानसत्वंगार्हस्थ्यमाश्रमद्वितयंविशः ॥
गार्हस्थ्याचरितंत्वेकंशूद्रस्यक्षणदाचर ॥ २ ॥
ॐ इत्थंहिवामनेवाक्यंपुराणेप्रसमीक्ष्यतां ॥

अर्थ— गृहस्थाश्रम, ब्रह्मचर्याश्रम, वानप्रस्थ, या तीन आश्रमांचा अधिकार क्षत्रियांस आहे. ब्रह्मचर्याश्रम आणि गृहस्थाश्रम या दोहोंचा अधिकार वैश्यांस आहे. आणि गृहस्थाश्रमाचा मात्र अधिकार शूद्रांस आहे. याप्रमाणें "वामनपुराणामध्यें" सांगितलें आहे तें पाहावें.

चतुर्विधाभिक्षवस्तुविख्याताब्रह्मणोमुखात्
कुटीचकोबहूदश्चहंसश्चैवतृतीयकः ॥

चतुर्थःपरमोहंसःसंज्ञाभेदैःप्रकीर्तिताः ॥
⊙ इत्थंपितामहःप्राहचातुर्विध्यंहिभिक्षुणां ॥

अर्थ– संन्यासाश्रम चार प्रकारचा आहे; कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस. याप्रमाणें हे चार भेद "ब्रह्मदेवानें" सांगितले आहेत.

कुटीचकस्तुसंन्यस्यस्वकेसद्मनिनित्यशः ॥
भिक्षामादायभुंजीतसपिंडानांगृहेथवा ॥ १ ॥
शिखायज्ञोपवीतीस्यात्त्रिदंडीसकमंडलुः ॥
बहूदकश्चसंन्यस्यबंधुपुत्रादिवर्जितः ॥ २ ॥
सप्तागारंचरेद्भैक्षंवेषःपूर्वोक्तएवहि ॥
शिखायज्ञोपवीतीस्याद्धंसःसकमंडलुः ॥ ३ ॥
एकंतुवैणवंदंडंधारयेन्नित्यमादरात् ॥
परहंसस्त्रिदंडंचरज्जुंगोवालनिर्मितां ॥ ४ ॥
शिखांयज्ञोपवीतंचनित्यंकर्मपरित्यजेत् ॥
कौपीनाच्छादनवस्त्रंकंथांशीतनिवारिणीं ॥ ५ ॥
अक्षमालांचगृण्हीयाद्वैणवंदंडमव्रणं ॥
⊙ इत्थंस्कंदपुराणाद्यैश्चतुर्णायतिनामपि ॥ ६ ॥
⊙ सम्यग्विविच्यकृत्यादिविशेषोल्पःप्रदर्शितः ॥७॥

अर्थ– आतां जे संन्यासाश्रमाचे चार भेद सांगितले त्यांचे अनुक्रमानें पृथक् पृथक् धर्म दाखवितों. पहिला भेद जो कुटीचक त्याणें संन्यास ग्रहण करून आपल्या आपल्या गांवामध्यें अथवा सपिंड बंधूंच्या गृहामध्यें भिक्षा मागून वास करावा, आणि शिखा, यज्ञो-

परीस, तीन दंड व कमंडलु हे धारण करावे. बहूदकानें पूर्वोक्त वेष ( म्हणजे कुटीचकास जो सांगितला तो वेष ) धारण करून वस्तु पुत्रादिकांचा त्याग करून सात घरीं भिक्षा मागून राहावें. तिसरा भेद जो हंस त्यास कुटीचकाच्याच वेषाप्रमाणें वेष धारण करण्याचा अधिकार आहे, परंतु दंड मात्र एक धारण करावा. चवथा भेद जो परमहंस यांत पूर्वोक्त्या त्रिभेद कर्मांचा त्याग करून कौपीन, आच्छादनार्थ वस्त्र, सीत निवारणार्थ कथा, जपमाळा आणि कमंडलु हे धारण करून मधुकरी मागून राहावें. याप्रमाणें संन्यास धर्म "स्कंदपुराणादि ग्रंथांत" विस्तारानें सांगितले आहेत. विचार करून विस्तार भयास्तव येथें अल्प दाखविले आहेत.

सर्वसंगनिवृत्तस्यध्यानयोगरतस्यच ॥
नतस्यदहनंकार्यंनाशौचंनोदकक्रिया ॥ १ ॥
कुटीचकंतुप्रदहेत्पूरयेच्चबहूदकं ॥
हंसंजलेतुनिःक्षिपेत्परहंसंप्रपूरयेत् ॥ २ ॥
इतिस्मृत्यर्थसारेच्चचतुर्णामपिभिक्षुणां ॥
विभिन्नास्तनुसंस्काराःसंप्रोक्ताःप्रविचार्यतां ॥३॥
संन्यासग्रहणेनैपात्रब्राह्मणत्वंहिसिध्यति ॥ ४ ॥

अर्थ—सर्व संग परित्याग करून ध्यान योगामध्यें रममाण होणारा जो यती त्याचा अंत झाल्या नंतर त्याच्या शरीराचें दहन करूं नये, व पुत्रादिकानीं आशौच धरूं नये आणि तिलतर्पणादि नित्य क्रिया करूं नयेत. कुटीचक संन्याशाच्या देहाचें दहन करावें, बहूदकाचा देह भूमींत पुरावा, हंसाचा देह उदकांत बुडवावा. आणि परमहंसाचा देह भूमीमध्यें पुरावा. याप्रमाणें सन्याशांचे जे चार भेद सांगितले त्या त्या भेदेंकरून त्यांच्या देहांचा संस्कार

करावा. असें "स्मृ यर्थसार" ग्रथामध्यें सांगितलें आहे. याचा विचार करून पाहावें आता या गौड सारस्वत कोंकणे ( शेणवी ) यांच्यामध्यें सन्यास ग्रहणाची रूढी हजारों वर्षांपासून चालत असल्या कारणानें यांचें ब्राह्मणत्व सिद्ध होतें, यांत संशय नाहीं.

◎ अथेपाश्राद्धभोक्तृत्वात्षोडशोहेतुरीर्यते ॥

अर्थ–आतां श्राद्धभोक्तृत्वाधिकारेंकरून सोळावा हेतु सांगतों.

ब्रह्मचर्यस्थितोनैकमन्नमद्यादनापदि ॥
ब्राह्मणःकाममश्नीयाच्छ्राद्धेव्रतमपीडयन् ॥ १ ॥

अर्थ– ब्रह्मचर्य व्रताचा आश्रय करून शरीरास व्याध्यादिक आपत्ति जर नाहीं तर भिक्षेवांचून एकाकडील अन्न भक्षण करूं नये. परंतु जर श्राद्ध भोजना विषयीं त्या ब्रह्मचाऱ्यास आमंत्रण केलें आहे तर केवळ ब्राह्मणवर्णस्थ ब्रह्मचाऱ्यानें मात्र श्राद्ध भोजन करावें. परंतु मधु मांस भक्षण करूं नये. कारण कीं, या भक्षणानें ब्रह्मचर्य व्रताचा भंग होतो. आतां या स्मृतींत ब्राह्मण पदाचें ग्रहण केलें आहे म्हणून क्षत्रिय आणि वैश्य हे दोन वर्णांचे ब्रह्मचारी श्राद्धांत भोजनार्ह नाहींत. आणि ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यास एकान्न दोष श्राद्धभोजनाविषयीं नाहीं असें " या याज्ञवल्क्य " स्मृतीवरून सिद्ध होतें.

भैक्षेणवर्तयेन्नित्यंनैकान्नादीभवेद्व्रती ॥
भैक्षेणव्रतिनोवृत्तिरुपवाससमास्मृता ॥ १ ॥

अर्थ– ब्रह्मचाऱ्यानें व्रतस्थ राहून भिक्षामागून उदरनिर्वाह करून राहावें. केवळ एकान्न भक्षण करूं नये; कारण एकान्न भक्षण केलें असतां दोषी होऊन व्रतभंग होतो. आणि उपवासा पासून जें फल प्राप्त होतें तें भिक्षान्न भक्षण केल्याचें फल समान आहे.

व्रतवद्देवदैवत्येपित्र्येकर्मण्यथर्षिवत् ॥
काममभ्यर्थितोश्नीयाद्व्रतमस्यनलुप्यते ॥ २ ॥

**अर्थ**— देवकार्य किंवा पितृ कर्म याच्या भोजनाविषयीं ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याला आमंत्रित केलें असता त्याणें मधु मांस भक्षणा वांचून अन्य पदार्थ यथेच्छ भक्षण करावें. याप्रमाणें श्राद्धादि सवरी भोजन केलें असता ब्राह्मण ब्रह्मचर्य व्रताचा भंग होत नाहीं.

ब्राह्मणस्यैवकर्मैतदुपदिष्टंमनीषिभिः ॥
राजन्यवैश्ययोस्त्वेवनैतत्कर्मविधीयते ॥ ३ ॥

**अर्थ**— ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीनी वर्णांस भिक्षा' चरण हें उक्त असून एकान्न श्राद्धभोजन हें केवळ ब्राह्मणा वाचून अन्य वर्णांस ( ह्मणजे क्षत्रिय आणि वैश्य या दोन वर्णांस) निषिद्ध आहे. याप्रमाणें 'मन्वादिक ऋषींनीं " सांगितलें आहे.

कर्मनिष्ठास्तपोनिष्ठाःपंचाग्निब्रह्मचारिणः ॥
पितृमातृपराश्चैवब्राह्मणाःश्राद्धसंपदे ॥ १ ॥

**अर्थ**— जे ब्रह्मचर्याला कर्मे सांगितलीं आहेत त्यावर निष्ठा ठेव णारे, तपस्या करणारे, पंचाग्नि धारण करणारे ( ह्मणजे सभ्य, आवसथ्य, गार्हपत्य, आहवनीय आणि दक्षिण—हे जे पांच अग्नि यांते धारण करणारे ) मातापितराची पूजा करणारे असे ब्रह्मचर्य व्रतस्थ जे ब्राह्मण ते श्राद्धभोजनाविषयीं योजावे ह्मणजे श्राद्ध सवरी असय फलप्राप्ति प्राप्त होते. यद्यपि क्षत्रिय, आणि वैश्य हे पूर्वोक्त कर्मनिष्ठ असून ब्रह्मचर्यव्रतस्थ असले, तथापि श्राद्ध-भोजनास योग्य नाहींत.—

⊛ इत्थंपराशरस्मृतौटीकायांमाधवस्यच ॥
⊛ तथामनुस्मृतावस्तियाज्ञवल्क्यस्मृतावपि ॥ १ ॥

**अर्थ**—याप्रमाणें पराशरादि ऋषींनीं सांगितलें आहे.

⊛ इथंहिसर्वहेतूनांविचारेणविलोकनात् ॥

⊛ सारस्वतब्राह्मणानांब्राह्मणत्वंहिसिध्यति ॥२॥

अर्थ– याप्रमाणें जे हेतु सांगितले यांचा विचार करून पाहिलें असतां या सारस्वत ब्राह्मणांच्या ब्राह्मणत्वाची निःसंशय सिद्धि होते.

⊛ इत्थंदशप्रकरणेशानवींविप्रसिद्धिकृत् ॥

अनुमानप्रकरणंसमाप्तिमगमत्खलु ॥ १ ॥

अर्थ– याप्रमाणें दशप्रकरण ग्रथांतील सारस्वत ऊर्फ शेणवी यांच्या ब्राह्मणत्वसिद्ध्यर्थ अनुमान प्रकरण लिहिलें हें समाप्त झालें.

इतिकेण्योपाह्वनारायणसूनुलक्ष्मणेनविरचितेश्री मद्दशप्रकरणेअनुमाननामाद्वितीयप्रकरणंसमाप्तं॥



# प्रकरण तिसरें.

---

॥ नत्वाश्रीवेंकटेशंसकलत्रिजगतःशर्मदंशांत मूर्तिं यस्यास्याद्ब्राह्मणोभूत्तमथचसकलाराधितंपूर्णकामं ॥शाण्यब्राह्मणानांप्रकरणमधुनासिद्धयेविमतायाःपूर्वोक्तैर्हेतुभिश्चस्फुटमपिक्रियतेस्थापनाख्यंतृतीयं ॥ १ ॥ पूर्वप्रकरणेप्रोक्ताःषोडशाहेतवोमया ॥ ॥ पंचावयववाक्यैस्तेस्थाप्यंतेऽस्मिन् तृतीयके ॥ २ ॥

**अर्थ**—आतां सर्व त्रिजगताचें कल्याण करणारा, शांतमूर्ति, ज्याची सर्व लोक आराधना करितात; व ज्यापासून सर्वांच्या मनोरथ कामना पूर्ण होतात, आणि ज्याच्या मुखापासून ब्राह्मण वर्ण उत्पन्न झाला, असा जो वेंकटेश भगवान् त्यास नमस्कार करून सांप्रत, सारस्वत कोंकणे (शेणवी) यांच्या ब्राह्मणत्वाच्या सिद्धीस्तव; पूर्वप्रकरणांत (द्वितीय प्रकरणांत) जे सोळा हेतु सांगितले; त्या हेतूंनीं स्पष्ट रीतीनें स्थापन करून वादींच्या मनाची शांतता करण्याविषयीं; हें स्थापन नामक, तृतीय प्रकरण करितो. आता पूर्वप्रकरणामध्यें, जे सोळा हेतु ह्मणून सांगितले तेच हेतु या तृतीय प्रकरणांत पंचावयववाक्यांनीं स्थापितों. ते पंचावयव असे कीं.

विमताःषट्कर्मार्हाः॥ब्राह्मणत्वात् ॥ याज्ञवल्कीयशाखीयब्राह्मणवत् ॥ अत्रपंचावयवाः ॥ विम

ताःषट्कर्मार्हाःइतिप्रतिज्ञावाक्यं॥ ब्राह्मणत्वादितिहेतुवाक्यं ॥ येब्राह्मणास्तेषट्कर्मार्हाःयथायाज्ञवल्कीयशाखीयब्राह्मणाइतिदृष्टांतघटितोदाहरणवाक्यं ॥ षट्कर्मार्हत्वव्याप्यब्राह्मणत्ववंतश्चेमेइत्युपनयवाक्यं ॥ ब्राह्मणत्वज्ञानज्ञाप्यषट्कर्मार्हत्ववंतश्चेमेइतिनिगमनमिति ॥

अर्थ—षट्कर्मार्हत्व व षट्कर्मानर्हत्व या दोन्ही विषयांच्या वादांमध्ये विशिष्ट जे सारस्वत कोंकणे (शेणवी) ते षट्कर्मार्ह (षट्कर्मास योग्य.) आहेत, कां, तर ब्राह्मण ह्मणून. जसे याज्ञवल्की. य शाखेचे ब्राह्मण, तसे. याविषयीं पंचावयव प्रयोग सांगतों. येथें विमत (सारस्वत कोंकणे) (शेणवी) जे आहेत, ते षट्कर्मास अर्ह (योग्य आहेत) हें प्रतिज्ञावाक्य ह्मणावें. ब्राह्मण असल्यामुळें हें हेतुवाक्य ह्मणावें. जे ब्राह्मण आहेत, ते षट्कर्मार्हच आहेत. (षट्कर्मास योग्य) जसे याज्ञवल्कीय शाखेचे ब्राह्मण. हें दृष्टांतघटित उदाहरण वाक्य ह्मणावें. षट्कर्मार्हत्व ज्यापेक्षां व्याप्य जें ब्राह्मणत्व तें ब्राह्मणत्व यांच्या ठिकाणीं (सारस्वत कोंकणे (शेणवी) यांच्या ठिकाणीं आहे. या वाक्यास उपनय ह्मणावें. ब्राह्मणज्ञानानें ज्ञापित (बोधित) असें जें, षट्कर्मार्हत्व, तें, या कोंकणे उर्फ शेणवी यांच्या ठिकाणीं आहे. या वाक्यास निगमन ह्मणावें. या वर दर्शित केलेल्या, पंचावयव वाक्यांवरून मी असे सिद्ध करितों कीं, विमत जे आहेत ते षट्कर्मार्ह निश्चयें करूनच आहेत. यांत कांहीं संशय नाहीं. हे पुढें लिहिलेले षोडश हेतुरूप जे शास्त्राधार त्यावरून चरणीय कर्मांच्या बोधानें सर्व विद्वज्जनांचे मनास न्यायान्याय प्रत्यक्षत्वानें दिसून येतीलच; यांत संशय नाहीं. याविषयीं प्रमाणें सांगतों.

इज्याध्ययनदानानिसर्वेषांचद्विजन्मनां ॥
प्रतिग्रहोध्यापनंचब्राह्मणस्यैवयाजनं ॥
© इत्थंश्रीमद्भागवतपुराणोक्तंविचार्यतां ॥ ३ ॥

अर्थ—तीं असीं कीं यज्ञकरणें, अध्ययनकरणें, दानकरणें या तीन कर्मांचा अधिकार ब्राम्हण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांस आहे. आणिदानघेणें, अध्ययन सांगणें, यजमान सवधाने अश्विज्ञ होऊन हवनादि कर्म करणें या तीन कर्मांचा अधिकार केवळ ब्राम्हणास मात्र आहे. एकदर या साहा कर्मांचा अधिकार ब्राम्हणा वाचून अन्य वर्णांस नाहीं. याप्रमाणें "श्रीमद्भागवतांत" सांगितले आहे. त्याचें अवलोकन करावें. यास दुसरें प्रमाण.

कर्मविप्रस्ययजनंदानमध्ययनंतथा ॥
प्रतिग्रहोध्यापनंचयाजनंचेतिवृत्तयः ॥ ४ ॥

अर्थ—यज्ञकरणें, दानकरणें, अध्ययनकरणें हीं तीन कर्में, व याजन, अध्यापन, आणि प्रतिग्रह हीं तीन कर्में, वृत्तीसाठीं (म० जीवनार्थ) आहेत; मिळून साहा कर्मांचा अधिकार ब्राम्हणासच आहे. याविषयीं अन्य प्रमाणें;

यजनंयाजनंदानंतथैवाध्यापनक्रिया ॥
प्रतिग्रहश्चाध्ययनंविप्रकर्माणिनिर्दिशेत् ॥
© इत्थंहिकर्मसिद्धांतेशंखेनोक्तंविचिंत्यतां ॥ ५ ॥

अर्थ—यज्ञकरणें, यजमान सवधानें अश्विज होऊन हवनादि कर्म करणें, अध्ययन करणें, दुसऱ्यास अध्ययन सांगणे, दान करणें आणि दान घेणें, हीं साहा कर्में ब्राम्हणाचीं आहेत. याप्रमाणें कर्मसिद्धांतग्रथामध्यें शंखाचें वचन आहे; त्याचा विचार करावा.

अध्यापनमध्ययनयजनंयाजनंतथा ॥
दानंप्रतिग्रहश्चैवब्राह्मणानामकल्पयत् ॥ ६ ॥
प्रजानांरक्षणंदानमिज्याध्ययनमेवच ॥
विषयेष्वप्रसक्तिश्चक्षत्रियस्यसमासतः ॥ ७ ॥
पशूनांरक्षणंदानमिज्याध्ययनमेवच ॥
वणिक्पथंकुसीदंचवैश्यस्यकृषिमेवच ॥ ८ ॥
एकमेवतुशूद्रस्यप्रभुःकर्मसमादिशत् ॥
एतेषामेववर्णानांशुश्रूषामनसूयया ॥
इत्थंमनुवचःसम्यक्पंडितैर्हृदिचिंत्यतां ॥ ९ ॥

अर्थ—दान, प्रतिग्रह, यजन, याजन, अध्ययन आणि अध्यापन हीं, साहा कर्मे ब्राह्मणास सांगितलीं आहेत. अध्ययन, दान, यजन, प्रजाचें संरक्षण, विषयांच्याठायीं निरिच्छपणा हीं पांच कर्मे क्षत्रियास सांगितलीं आहेत. दान, अध्ययन, यजन, पशूचें संरक्षण, व्यापार, शेतकी, व्याज बट्टा करणें मिळून हीं सात कर्मे वैश्यास सांगितलीं आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांची शुश्रूषा म० सेवाकरणें हें एकच कर्म शूद्रास सांगितलें आहे. याप्रमाणें चारीवर्णांचीं कर्मे अनुक्रमानें मनुस्मृतींत मनूनें सांगितलीं आहेत, याचा पंडितांनीं विचार करावा.

स्वाध्यायोध्यापनंचापियजनंयाजनंतथा ॥
दानप्रतिग्रहश्चापिषट्कर्माण्यग्रजन्मनः ॥ १० ॥
इज्याध्ययनदानानिप्रजानांपरिपालनं ॥
शस्त्रास्त्रधारणंचैवकर्माणिक्षत्रियस्यच ॥ ११ ॥
स्वाध्यायोयाजनंदानंपशूनांपालनंतथा॥

कुसीदकृषिवाणिज्यंवैश्यकर्माणिसत्तवै ॥
शौचंब्राह्मणशुश्रूषासत्यमक्रोधएवच ॥ १२ ॥
शूद्रकर्मतथामंत्रोनमस्कारोपिचोदितः ॥
⊛ इत्थंबृहस्पतिःप्राहचातुर्वर्ण्यस्यलक्षणं ॥ १३ ॥

अर्थ— अध्ययन, यजन, याजन, दान आणि प्रतिग्रह, हीं साहा कर्मे ब्राह्मणांचीं आहेत. यजन, दान, अध्ययन, प्रजांचें रक्षण करणें, शस्त्रास्त्रधारण करणें मिळून हीं पांच कर्मे क्षत्रियांचीं आहेत. अध्ययन, दान, यजन, पशूंचें पालन करणें, व्याज बट्टा करणें, शेतकी करणें आणि वाणिज्य (ह्म०) व्यापार करणें मिळून हीं, सात कर्मे वैश्यांचीं आहेत. आणि शुद्धपणा, ब्राह्मणाची सेवा, क्रोधत्याग, सत्यवक्तृत्व आणि अमंत्रक नमस्कार मिळून हीं कर्मे शूद्रांचीं आहेत. याप्रमाणें चारी वर्णांचीं लक्षणें व कर्मे हीं " बृहस्पतीनें " सांगितलीं आहेत.

यजनंयाजनंदानंब्राह्मणस्यप्रतिग्रहः ॥
अध्यापनंचाध्ययनंषटकर्माणिद्विजोत्तमाः॥१४॥
दानमध्ययनंयज्ञोधर्मःक्षत्रियवैश्ययोः ॥
दंडोयुद्धंक्षत्रियस्यकृषिर्वैश्यस्यशास्यते ॥
⊛ इत्थंकर्मसंहितायांब्रह्मणास्तिप्रकीर्तितं ॥ १५॥

अर्थ— यजन, याजन, दान, प्रतिग्रह आणि अध्यापन हीं साहा कर्मे ब्राह्मणांचीं आहेत. दान, अध्ययन आणि यजन या तीन कर्मांचा अधिकार क्षत्रियांस व वैश्यांस असून शिवाय दंड व युद्ध हीं दोन कर्मे क्षत्रियास आहेत. आणि कृषी ( ह्म. ) शेतकी, ही वैश्यास आहे. याप्रमाणें "कर्मसंहितेमध्यें ब्रह्मदेवानें" सांगितलें आहे.

दानंदद्याद्यजेद्देवान्यज्ञैःस्वाध्यायतत्परः ॥
नित्योदकोभवेद्विप्रःकुर्याच्चाग्निपरिग्रहं ॥ १६ ॥
वृत्त्यर्थंयाजयेच्चान्यानन्यानध्यापयेत्तथा ॥
कुर्यात्प्रतिग्रहंदानंशुक्लार्थंन्यायतोद्विजः ॥ १७॥
सर्वलोकहितंकुर्यान्नाहितंकस्यचिद्द्विजः ॥
मैत्रीकर्मसमस्तेषुब्राह्मणस्योत्तमंधनं ॥
इतिविष्णुपुराणोक्तंवचनंप्रविचार्यतां ॥ १८ ॥

अर्थ— दान घेणें, देवाप्रत यजन करणें, वेद पठण करण्याविषयीं तत्पर असणें, नित्य स्नान संध्या तर्पणादि कर्म करणें, यथाधिकार गार्हपत्यादि अग्नीचें ग्रहण करणें, व उदर पोषणार्थ याजन, अध्यापनादिक करणें व सर्व लोकांच्या हिताची इच्छा करणें, आणि सर्वां बरोबर मैत्री ठेवणें हेंच ब्राह्मणादिकाचें उत्तम धन होय. याप्रमाणें "विष्णुपुराणांत" सांगितलें आहे. त्याचें चिंतन करून पहावें.

इज्याध्ययनदानानिवैश्यस्यक्षत्रियस्यच ॥
प्रतिग्रहोधिकोविप्रेयाजनाध्यापनेतथा ॥ १९ ॥
प्रधानंक्षत्रियेकर्मप्रजानांपरिपालनं ॥
कुसीदंकृषिवाणिज्यंपाशुपाल्यंविशःस्मृतं॥ २०॥
शूद्रस्यद्विजशुश्रूषातयाजीवन्वणिक्भवेत् ॥
याज्ञवल्क्यर्षिणाचेत्थंभाषितंतद्विचिंत्यतां॥२१॥

अर्थ— यजन, दान आणि अध्ययन या तीन कर्मांचा अधिकार ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांस आहे. याजन, अध्यापन आणि प्रतिग्रह व वरील तीन मिळून या साहा कर्मांचा अधि-

कार ब्राह्मणासच आहे, त्याच क्षत्रियास यजनादिक तीन कर्म आणि प्रजापालन हीं मुख्य आहेत तसेच वरील तीन कर्मे आणि व्यापार, व्याजवट्टा आणि कृषी (येतकी) हीं मुख्य वैश्यास आहेत. आणि या तीनी वर्णांची शुश्रूषा (सेवा करणें) हें कर्म शूद्रास मुख्य असून जीवनोपाय आहे जर या कर्मानें जीवन होत नसल तर व्यापारादिकेंकरून जीवन करावें. असे चारी वर्णांचे अधिकाररूप जे धर्म ते "याज्ञवल्क्यऋषीनें" सांगितले आहेत त्याचा विचार करावा

अध्यापनचाध्ययनयजनंयाजनतथा ॥
दानंप्रतिग्रहश्चेत्थंकर्मषट्कमुदाहृतं ॥
इत्याहिश्रूयतांधर्मसंहितायामुदीरितं ॥ २२ ॥

अर्थ— अध्यापन, अध्ययन, यजन, याजन, दान, आणि प्रतिग्रह, या साहा कर्माचा अधिकार ब्राह्मणास मात्र आहे. याप्रमाणें "धर्मसंहितेमध्ये" सांगितले आहे, आता या सर्व शास्त्राधारावरून त्रिकर्मी कोण याविषयी किंचित् बोध झालाच असेल, कदाचित् नझाल्यास स्पष्ट दाखवितों तें पाहा

तेषांतुब्राह्मणाएवषट्कर्मसुनियोजिताः ॥
त्रिकर्माणोक्षत्रविशावेकस्मिन्छूद्रयोनिजः ॥
इतिहारीतवचनंविस्पष्टमवलोक्यतां ॥ २३ ॥

अर्थ— यजनादि साहा कर्मांचा अधिकार केवळ ब्राह्मणासच आहे. आणि यजन, अध्ययन आणि दान या तीन कर्मांचा मात्र अधिकार क्षत्रिय आणि वैश्य या दोन वर्णांस आहे आणि या तीनी वर्णांची सेवा करणें या एक कर्माचा अधिकार शूद्रास आहे याप्रमाणें "हारीतऋषीचें" वचन आहे तें पाहावें म्हणजे त्रिकर्मी कोण याचा साक्षात बोध होईल याच त्रिकर्मा विषयीं अन्य प्रमाण.

पट्कर्मनिरताविप्राःक्षत्रियाश्चत्रिकर्मजाः ॥
वेश्यशूद्रास्तात्रिकाश्चसर्वशास्त्रेषुनिर्णिताः ॥
⊛ इत्थस्कदपुराणेपिस्कंदेनपरिभाषित ॥ २४ ॥

अर्थ— तें असें कीं, यजनादि साहा कर्मे ब्राम्हणाचीच आहेत. क्षत्रिय आणि वैश्य या दोन वर्णांचा तीन कर्मे आहेत. शूद्रास तांत्रिक म्हणजे केवळ तीन वर्णांची शुश्रूषा ( सेवा ) ही मात्र करण्याचा अधिकार आहे. याप्रमाणे "स्कंदपुराणांत स्कंदानें" सांगितलें आहे.

⊛ तस्मात्पट्कर्मशालित्वादेपासित्व्यतिविप्रता ॥
⊛ अतोमीषांब्राह्मणत्वेसंशयोनास्तिकश्चन ॥२५॥

अर्थ— तस्मात् या प्रदर्शित केलेल्या सर्व शास्त्राधारावरून इतकेंच सिध्द होतें,कीं, पट्कर्मांचा अधिकार केवळ ब्राम्हणावाचून अन्यवर्णांस ( क्ष० ) क्षत्रिय वैश्यास नाहीं अतां या सारस्वत कोंकणे (शेणवी) ब्राह्मणामध्यें अध्यापनादिक जीं साहा कर्मे सांगितलीं, तीं अनादि काला पासून सांप्रत कालापर्यंत प्रत्यक्ष निर्बाधत्वेंकरून चालतात. यावरून यांचें ब्राह्मणत्व अनादि कालीन, असून हे यजनादि पट्कर्मवंत आहेत असें सिद्ध होतें यांत कांहींच संशय नाहीं. आतां ब्राह्मणत्वास मुख्य अनुकूलत्व जे षोडश हेतु त्यांतील हा पट्कर्मांहे व प्रथम हेतूचा सिध्दांत जाणावा.

⊛ जन्मतोद्वादशेचान्हिनामकर्मद्वितीयकः ॥
● द्वादशेन्हिनामकर्मविप्रस्यैवोदितयतः ॥ २६ ॥

अर्थ— जन्मदिवसापासून बाराव्या दिवशीं ब्राह्मणानीं नामकरण संस्कार करावा याविषयीं शास्त्राधार देऊन, या दुसऱ्या हेतूची स्थापना करितों.

गर्भाधानमृतौपुंसःसवनंस्पंदनात्पुरा ॥
षष्ठेऽष्टमेवासीमंतोमास्येतेजातकर्मच ॥२७ ॥
अहन्येकादशेनामचतुर्थेमासिनिष्क्रमः ॥
षष्ठेऽन्नप्राशनंमासिचूडाकार्यायथाकुलं ॥ २८ ॥
⊛ याज्ञवल्क्यर्षिणाचेत्थंभाषितंहृदिचिंत्यता ॥

अर्थ— ति असी कीं, स्त्रीस रजोदर्शन झाल्यापासून सोळा दिवसांच्या आंत गर्भाधान संस्कार करावा. व गर्भिणीचा गर्भ चलन होण्याच्या पूर्वी, पुंसवन संस्कार करावा. साहाव्या अथवा आठव्या महिन्यांत सीमंतोन्नयन संस्कार करावा. आणि स्त्री प्रसूत होताच प्राणाचा जातकर्म संस्कार करावा. तो असा कीं, जन्म दिवसापासून अकराव्या दिवशीं नामकरण संस्कार करणें चवथ्या महिन्यांत मुलास घरांतून बाहेर नेणें; साहाव्या मासीं, अन्नप्राशन याप्रमाणें हे संस्कार द्विजानीं करावे. व कुलाचारा प्रमाणें चूडाकर्म संस्कार करावा, याप्रमाणें "याज्ञवल्क्यऋषीनें" सांगितलें आहे तें पाहावें.

⊛ इत्थंश्रीयाज्ञवल्क्योक्त्यासिद्धस्यैकार्थतास्यहि ॥२९॥

अर्थ— याप्रमाणें याज्ञवल्क्यानीं सांगितलें; खरें परंतु या वचनावरून एकार्थता सिद्ध होते. ह्मणजे; ब्राह्मणाचें लक्षण त्रैवर्णिकावर गेलें. ब्राह्मणास जातकर्म करण्याविषयीं जो उक्त काल सांगितला, त्यांत भिन्नता नसून त्रैवर्णिकासही तो काल अनुकूल होऊन आहे, ह्मणून येथें कोणी शंका घेईल तर त्या भिन्नतेविषयीं प्रमाण सांगतों तेणेंकरून एकार्थतेचा परिहार होईल.

एकादशेऽह्निविप्राणांक्षत्रियाणांत्रयोदशे ॥
वैश्यानांषोडशेकार्यंमासांतेशूद्रजन्मनां ॥ ३० ॥

अर्थ—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांनीं नामकरण संस्कार करणें तो या स्मृतिमताप्रमाणें करावा. ( श्लो० ) जन्मदिवसापासून अकराव्या दिवशीं ब्राह्मणानीं, तेराव्या दिवशीं क्षत्रियानीं, सोळाव्या दिवशीं वैश्यानीं आणि एकविसाव्या दिवशीं शूद्रानीं याप्रमाणे नामकरण संस्कार करावा. यास दुसरें प्रमाण.

द्वादशेदशमेवापिजन्मतोपित्रयोदशे ॥
षोडशेविंशतौचैवद्वाविंशेवणतःक्रमात् ॥
इत्थंप्रयोगरत्नेरितंबृहस्पतिवचःस्फुटं ॥३१॥

अर्थ—तें असें कीं, जन्मदिवसापासून बाराव्या अथवा दाहाव्या दिवशीं ब्राह्मणानीं नामकरण संस्कार करावा, साळाव्या दिवशीं क्षत्रियानीं, आणि विसाव्या दिवशीं वैश्यानीं, बावसाव्या दिवशीं शूद्रानीं याप्रमाणें अनुक्रमानें नामकरण संस्कार करावा. याप्रमाणे ' प्रयोगरत्न ग्रंथांत बृहस्पतीचें ' वचन स्पष्ट आहे.

जन्मतोदशमेवापिद्वादशेवापितत्पुनः ॥
विप्राणानामकर्मस्यादाशौचातेपुशेषयोः॥३२

अर्थ—बाराव्या अथवा दाहाव्या दिवशीं ब्राह्मणानीं नामकरण संस्कार करावा आणि बाकी तिघांनीं सुवेर संपल्या नंतर करावा.

जन्महात्द्वादशाहेवादशाहेवापिशेषतः ॥
कुर्याद्विनामकरणविप्रस्यैवेतिवैश्रुतिः ॥३३॥

अर्थ—जन्मदिवसापासून दाहाव्या अथवा बाराव्या दिवशीं ब्राह्मणानीं नामकरण संस्कार करावा याप्रमाणें श्रुतिवचन आहे.

द्वादशेषोडशेविंशेजन्मतःक्रमतोदिने ॥
नामकर्मद्विजातीनाविप्रस्यदशमेपिवा ॥३४॥

◉ इतिभारतवाक्यार्थाद्विप्रस्यद्वादशेहनि ॥
◉ नामकर्मनचान्येषामित्येतात्सिद्धमंजसा ॥३५॥

अर्थ– जन्मापासून बाराव्या किंवा दाहाव्या दिवशीं ब्राह्मणांनी नामकरण संस्कार करावा. सोळाव्या दिवशीं क्षत्रियांनीं, विसाव्यादिवशीं वैश्यांनीं याप्रमाणें अनुक्रमानें नामकरण संस्कार करावा, याप्रमाणें "भारतांत" सांगितलें आहे. या सर्व वचनावरून इतकेंच सिद्ध होतें कीं बाराव्या दिवशीं नामकरण संस्कार ब्राह्मणा वाचून, अन्य वर्णांस (क्ष०) क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या तीन वर्णांस करण्याचा अधिकार नाहीं, आणि हे सारस्वत ओकूणें म्हणजे शाणवी हे बाराव्याच दिवशीं नामकरण संस्कार करितात, यावरून यांचे ब्राह्मणत्वानुरूप जें षट्कर्माधिकारत्व तें निर्ध्यभिचारत्वेंकरून सिद्ध होतें.

◉ मांगल्यंशर्मवन्नामशर्मातंचतृतीयकः ॥
◉ मांगल्यंशर्मवन्नामनामधेयमपिस्मृतं ॥
◉ विप्रमात्रस्यगदितमन्येषामन्यदिष्यते ॥ ३६ ॥

अर्थ– मंगलकारक जें शर्मनाम, तेणेंकरून या तिसऱ्या हेतूची स्थापना करितों. तो असा कीं, शर्मनाम, हें ब्राह्मणासच आहे अन्य (क्षत्रियादि त्रिवर्गांस) नाहीं त्यास दुसरीं नामें आहेत. या विषयीं प्रमाणें सांगतों.

शर्मवद्ब्राह्मणस्योक्तंवर्मेतिक्षत्रजन्मनः ॥
गुप्तदासात्मकंनामप्रशस्तंवैश्यशूद्रयोः ॥
◉ इतिविष्णुपुराणोक्तवचनंहृदिचिंत्यतां ॥ ३७ ॥

अर्थ– ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांचीं नामें तीं असीं कीं, ब्राह्मणास शर्म, क्षत्रियास वर्म, वैश्यास गुप्त आणि शूद्रास, दास याप्रमाणें अनुक्रमानें नांवें जाणावीं. याप्रमाणें 'विष्णु

रागास " व "व्यासानींही ' सांगितलीं आहेत. त्याचा विचार करावा. यास दुसरें प्रमाण.

शर्मेतिब्राह्मणस्योक्तवर्मातिक्षत्रियस्यतु ॥
गुप्तातचैववैश्यस्यदासांतशूद्रजन्मनः ॥
⊛ इतिबोधायनमुनेराकर्णयसरस्वतीं ॥॥३८ ॥
शर्मदेवश्चविप्रस्यवर्मत्राताचभूभुजः ॥
भूतिर्दत्तश्चवैश्यस्यदासःशूद्रस्यकारयेत् ॥
⊛ इत्थयमस्यवचनांविस्पष्टमवलोक्यतां ॥ ३९ ॥

अर्थ— शर्म किंवा देव हीं दोन नामें ब्राह्मणास उक्त सांगितलीं आहेत वर्म किंवा त्राता हीं क्षत्रियास, भूति किंवा दत्त हीं वैश्यास आणि दास हें शूद्रास, याप्रमाणें नामें आहेत असें "यमाचें व बोधायनऋषीचें" वचन आहे तें पाहावें

शर्मातान्नाह्मणस्योक्तावर्मातात्क्षत्रियस्यतु ॥
गुप्तदासपदातास्यादभिधावैश्यशूद्रयोः ॥
तपसाब्रह्मचर्येणदमेनचशमेनच ॥
जगताशर्मदानेनशर्मातोब्राह्मणोभवेत् ॥
⊛ इत्यादिकशृणुवचआश्वलायनभाषित ॥
अतोमीषाब्राह्मणत्वेसंशयोनास्तिकश्चन ॥४०॥

अर्थ— शर्मयुक्त ब्राह्मणाचें नाम, वर्मयुक्त क्षत्रियाचें नाम, गुप्तपदयुक्त वैश्याचें नाम आणि दासपदयुक्त शूद्राचें नाम, याप्रमाणें मुख्य नामाचा उच्चार करावा, अनुक्रमानें चारी वर्णांचीं उदाहरणें आहेत तीं असीं कीं, वसिष्ठशर्माब्राह्मण , इंद्रसनवर्माक्षत्रिय धनदत्तगुप्त आणि गोपालदास याप्रमाणें उदाहरणें जाणावीं. तथा-

चरणानें, ब्रह्मचर्य व्रताचरणानें, दमानें ( इंद्रियांच्या निग्रहानें ) शमानें ( शांतता करणानें ) या पांच प्रकारानीं जगताचें कल्याण करितात म्हणून ब्राह्मणास शर्म हें पद प्राप्त झालें आहे, याचप्रमाणें हीं वरील नामें, चारी वर्णांस यथार्थ आहेत. याप्रमाणें "आश्वलायनऋषींचें वचन" आहे, तस्मात् हे सारस्वत कोंकणे (शाणवी) हे शर्म पदयुक्तच नामोच्चार प्राचीन कालापासून करीत आहेत, यावरून हे यजनादि षट्कर्मवंत आहेत असें सिद्ध होतें, यांत संशय नाहीं.

⊛ व्रतबंधनकालेनचतुर्थःस्थाप्यतेधुना ॥

अर्थ— आतां व्रतबंधन काल यथार्थकरून या चवथ्या हेतूची स्थापना करितों.

अथगर्भाष्टमेवर्षेब्राह्मणस्योपनायनं ॥
जन्माष्टमेवाकर्तव्यंतथैवाब्देतुपंचमे ॥४१॥
राज्ञामेकादशेकार्यद्वादशेतुविशांस्मृत ॥
⊛ इत्थंवसिष्ठवचनंमनसासततंस्मर ॥४२॥
गर्भाष्टमेष्टमेवाब्देब्राह्मणस्योपनायनं ॥
राज्ञामेकादशेसैकेविशामेकेयथाकुलं ॥
⊛ इत्यस्तियाज्ञवल्क्यर्षिवचनताद्विचिंत्यता ॥४३॥

अर्थ— तें असें कीं, गर्भापासून अथवा जन्मापासून अष्टमवर्षी ब्राह्मणानीं उपनयन संस्कार करावा. अथवा पंचमवर्षीहि करावा. क्षत्रियानां अकराव्या वर्षी करावा. वैश्यानीं बाराव्या वर्षी करावा. याप्रमाणें "वसिष्ठऋषीचें" व "याज्ञवल्क्यऋषीचें" वचन आहे त्याचें अवलोकन करावें.

गर्भाष्टमेब्राह्मणस्योपनायनमितिहेमाद्रिः ॥

वैश्यस्यद्वादशेवर्षेशारदर्तौविधीयते ॥

@ इत्येवंबृहस्पतिःप्राहवत्सरर्तुविनिर्णयं ॥५३॥

अर्थ– तें असें कीं, गर्भापासून अष्टमवर्षी वसंतऋतूमध्ये ब्राह्मणांनीं मौंजीबंधन करावें. गर्भापासून अकराव्या वर्षी, ग्रीष्मऋतूमध्ये क्षत्रियांनीं आणि बाराव्या वर्षी शरदृतूमध्ये वैश्यांनीं, याप्रमाणें मौंजीबंधनें तीनही वर्णांना, यथानुक्रमानें करावीं, याप्रमाणें "बृहस्पतीनें" वर्ष व ऋतु यांचा निर्णय सांगितला आहे.

गर्भाष्टमेवसंतर्तौब्राह्मणानांप्रशस्यते ॥

गर्भादेकादशेग्रीष्मेक्षत्रियाणांप्रशस्यते ॥५४॥

शरद्दतौतुवैश्यानांगर्भात्तुद्वादशेतथा ॥

@ इतिगर्गमुनिःप्राहस्मृतिकर्ताचनिर्णयं ॥

@ अतोविप्रेतरेषांनवसंतेह्युपनायनं ॥५५॥

अर्थ– गर्भापासून अष्टमवर्ष व वसंतऋतु हा ब्राह्मणास प्रशस्त. गर्भापासून अकरावें वर्ष व ग्रीष्मऋतु हा क्षत्रियास प्रशस्त आणि गर्भापासून बारावें वर्ष व शरदृतु हा वैश्यास प्रशस्त. याप्रमाणें "गर्गमुनीनें" सांगितलें आहे. यावरून वसंतऋतु हा ब्राह्मणांवांचून अन्यांस(क्षत्रियवैश्यांस) सांगितला नाहीं. यास दुसरें प्रमाण.

ऋतुर्वसंतःशुभदोग्रजन्मनांग्रीष्मोनृपाणांचशरद्विशांच॥

व्रतस्यवर्ज्येयदिवाखिलानांमाघादयःपंचभवंतिमासाः॥

@ इत्यंसंवर्तमुनिनाब्राह्मणस्योपनायनं ॥५७॥

वसंततुःशुभःप्रोक्तोविप्रस्यप्रवलोक्यतां ॥

माघादिषुचमासेषुमौंजीपंचसुशस्यते ॥

वसंततुंरत्तुविप्राणांतत्रश्रेष्ठतमःस्मृतः ॥
इतिवाग्वृद्धगर्गस्यकालादर्शेतुपश्यतां ॥५८॥

**अर्थ**— वसंतऋतूमध्यें ब्राह्मणानीं उपनयन संस्कार करावा. ग्रीष्म ऋतूमध्यें क्षत्रियानीं आणि शरदतूमध्यें वैश्यांनीं याप्रमाणें, अनुक्रमेंकरून उपनयन संस्कार सर्वांनीं केले असतां सर्वांचें कल्याण होतें. आणि माघादिक पांच महिने (माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख आणि ज्येष्ठ) यांमध्यें सर्वांनीं मौंजीबंधन करावें असेंही आहे. त्यांत वसंत ऋतु हा ब्राह्मणासच प्रशस्त आहे. असें "कालादर्शग्रंथामध्यें वृद्धगर्ग व संवर्तऋषीनेंही" सांगितलें आहे तें पाहावें.

तस्माद्धेतुशरीरेचवसंततौप्रवेशनं ॥
वैश्येपुव्यभिचारोनहेतोरस्येतिचिंत्यतां ॥५९
अत्रतत्वमिदंज्ञेयंवस्तुस्थित्यवबुद्धये ॥
वसंततुंश्चतद्धेतुशरीरेतुप्रवेशितः ॥६०॥
एवंतृतीयहेतौचमांगल्यादिपरिग्रहः ॥
अथवैतेपुहेतुत्वंप्रत्येकमवगम्यतां ॥६१॥
मांगल्यंनामवाशर्मवद्याशर्मातिमेववा ॥
तृतीयोहेतुरित्येवमन्यत्राप्यवगम्यतां ॥६२॥
व्यभिचारनिरासार्थमेतदित्थंनिगद्यतां ॥
हेतावत्राष्टमाब्दश्चमुख्यत्वेनाविवक्षितः ॥६३॥
मुख्यत्वेनाष्टमाब्दश्चनोपनीतोविशेषोस्तिहि ॥
तदुक्तस्यापिवाक्यस्यकाम्यत्वेनैवभासनात् ॥६४

**अर्थ**— तस्मात् मदार्शीत केलेल्या सर्व वचनांवरून वसंतऋतु हा

क्षत्रिय वैश्यास नसून मुख्य ब्राह्मणासच उक्त - असल्या कारणानें या हेतूचा प्रवेश वैश्यांवर घडत नाहीं, कारण वैश्यास मुख्य नै-करून शरदृतुच उक्त सांगितला आहे. तस्मात् या हेतूचा व्यभिचार वैश्यावर सिद्ध होत नाहीं ( ब्राह्मणाचा जो उक्त काल तो वैश्यांस लागत नाहीं) याचें चिंतन करावें. वस्तूच्या स्थितीच्या बोधाविषयीं हें तं न जाणावें. आतां वसंतऋतु हा मुख्य वेंकरून ब्राह्मणासच उक्त सांगितला. तसेंच तृतीय हेतूमध्यें मांगल्य पदाचें ग्रहण केवळ ब्राह्मणाविषयींच केलें. यावरून ( मागल्यादिक पदावरून किंवा शर्मे या नामावरून किंवा पाळनादिकावरून ) पाहिलें असतां प्रथमादिक हेतु वस्तूच्या ठिकाणीं, निर्बाध निर्व्यभिचारत्वेंकरून सिद्ध होतात. ते असे कीं उपनयन कालरूप हेतूमध्यें मुख्यत्वेंकरून अष्टमाब्द हें ब्राह्मणाविषयींच ग्रहण केलें. त्याप्रमाणें वैश्यादिकाला मुख्यत्वेंकरून अष्टमाब्द ग्रहण केलें नाहीं. तर. काम्यत्वेंकरून मात्र सांगितलें आहे. मुख्यत्वेंकरून वैश्याला बारावेंच वर्ष सांगितलें आहे. त्याविषयीं प्रमाण.

अष्टमेवर्षेब्राह्मणमुपनयेद्गर्भाष्टमेवैकादशेक्षत्रि
यंद्वादशेवैश्यमाषोडशाद्ब्राह्मणस्यानतीतः
कालआद्वाविंशात्क्षत्रियस्याचतुर्विंशाद्वैश्यस्य
● आश्वलायनसूत्रोक्तंवाक्यमित्यंविचिंत्यतां ॥६३

अर्थ— तें असें कीं अष्टमवर्षीं किंवा गर्भापासून अष्टमवर्षीं ब्राह्मणानीं उपनयन संस्कार करावा. क्षत्रियानीं अकराव्या वर्षीं, वैश्यानीं बाराव्या वर्षीं याप्रमाणें तीनीं वर्णांनीं उपनयनसंस्कार करावा. आतां हे काल कांहीं आपत्तीमुळें अतिक्रांत झाले असतां अष्टमवर्षापासून सोळाव्या वर्षापर्यंत ब्राह्मणानीं, अकराव्या वर्षापासून बेविसाव्या वर्षापर्यंत क्षत्रियानीं, आणि बाराव्या वर्षापासून चोविसाव्या वर्षापर्यंत

वैश्यांनीं; याप्रमाणें उपनयन संस्कार करावे. असें आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितलें आहे त्याचा विचार करावा.

गर्भाष्टमेब्देकुर्वीतब्राह्मणस्योपनायनं ॥
गर्भादेकादशेराज्ञोगर्भात्तुद्वादशेविशः ॥६४॥
❀ इतिहिद्वादशाब्दस्यविशोमुख्यतयोक्तितः ॥
❀ अतोस्यकाम्यकालत्वात्सहेतोर्व्यभिचारिता ॥६५
❀ ननुवैश्यस्यकाम्यत्वादष्टमाब्दस्यनक्षतिः ॥
❀ इत्युक्तंयदयुक्तंतत्काम्यत्वेनप्रतीयते ॥
■ विप्रस्याप्यष्टमाब्दोयत्तेनस्याद्व्यभिचारिता ६७

अर्थ —गर्भापासून अष्टमवर्षीं ब्राह्मणानीं, गर्भापासून अकराव्या वर्षीं क्षत्रियानीं आणि गर्भापासून बाराव्या वर्षीं वैश्यानीं याप्रमाणें तीनी वर्णांनीं उपनयन संस्कार करावा. याप्रमाणें श्रुतिस्मृत्युक्त प्रमाणावरून वैश्यास बारावें वर्षच उक्त आहे. तस्मात् काम्यत्वेंकरून आठव्या वर्षाचें ग्रहण केलें ह्मणून वैश्यावर व्यभिचार येत नाहीं.
आतां वैश्याविषयीं काम्यत्वेंकरून आठवें वर्ष ग्रहण केलें ह्मणून व्यभिचार येत नाहीं ह्मणून जें सांगितलें तें, अयोग्य आहे. कारण काम्यत्वेंकरून ब्राह्मणासही अष्टमवर्ष सांगितलें आहे तस्मात काम्यत्वेंकरून ब्राह्मणालाही व्यभिचार येतो; तो असा कीं;

ब्रह्मवर्चसकामस्यगर्भतोजन्मतोपिवा ॥
सप्तमेवाष्टमेवर्षेब्राह्मणस्योपनायनं ॥६५॥
❀ इतिक्षीरनिधावस्तिकश्यपस्यमुनेर्वचः
ब्रह्मवर्चसकामस्यगर्भतोजन्मतोपिवा ॥ ६६ ॥

सप्तमेवाष्टमेवर्षेविप्रस्याभ्युपनायनं ॥

⊛ इत्थंवृहद्यमेनोक्तवाक्यस्यार्थोविचार्यतां ॥ ६७ ॥

गर्भतोजन्मतोवापिसप्तमेवत्सरेष्टमे ॥

ब्रह्मवर्चसकामानाविप्राणामुपनायनं ॥

⊛ इत्थंभारद्वाजमुनेर्वचनंहिविचार्यतां ॥ ६८ ॥

अर्थ– ब्रह्मवर्चसकाम ह० मोक्षाची इच्छा ज्या ब्राम्हणास आहे त्याणें गर्भापासून अथवा जन्मापासून सप्तमवर्षी उपनयन संस्कार करावा. अथवा अष्टमवर्षी करावा. याप्रमाणें क्षीरनिधिग्रंथामध्यें " कश्यप, यम " आणि " भरद्वाज याज्ञवल्की " वचनें आहेत त्याचा विचार करावा.

आयुष्कामोष्टमेवर्षेगर्भतोजन्मतोपिवा ॥

तेजस्कामोपिनवमेवीर्यकामस्तथोत्तरे ॥ ६९ ॥

इंद्रियार्थीचपश्वर्थीपोडशाब्दंनतुक्रमेत् ॥

⊛ इत्थंवृहद्यमेनोक्तंवचनंवर्ततेखलु ॥ ७० ॥

अर्थ– ज्यास आयुष्यवृद्धीची इच्छा असेल, त्याणें गर्भापासून अथवा जन्मदिवसापासून, अष्टमवर्षी, कांतिवृद्धीची इच्छा ज्यास आहे त्याणें नवमवर्षी, उत्तरायणीं. इंद्रियार्थी जो असेल आणि पशुवृद्धीची इच्छा ज्यास असेल, त्याणें सोळावर्षें अतिक्रांत होण्या-च्या पूर्वी; याप्रमाणें अनुक्रमानें उपनयन संस्कार करावा म्हणून "... यमानें" सांगितलें आहे.

षष्ठेतुधनकामस्यविद्याकामस्यसप्तमे ॥

अष्टमेसर्वकामस्यनवमेकांतिमिच्छतः ॥ ७१ ॥

अर्थ– धन इच्छिणारानें सहाव्या वर्षी; विद्येच्छूनें सप्तमवर्षी;

सर्वकामिच्छूने अष्टमवर्षी, कांति इच्छिणाराने नवमवर्षी; याप्रमाणे उपनयन संस्कार करावे.

⊛ इतिविष्णूक्तितश्चाब्दकाम्योविप्रस्यचाष्टमः ॥
⊛ मुख्यत्वेनविवक्षातोनप्रयोजनशालिनः ॥ ७२ ॥
⊛ इतिचेन्नाष्टमाब्दस्यब्राह्मणस्योपनायने ॥
⊛ काम्यत्वमुख्यताचेतिद्वेविध्यंविद्यतेध्रुवं ॥ ७३ ॥
गर्भाष्टमेब्देकुर्वीतब्राह्मणस्योपनायनं ॥
⊛ इत्यादिवचनान्यस्यमुख्यतायांप्रमाणकं ॥
⊛ कामनारहितस्यापिब्राह्मणस्याष्टमेब्दके ॥ ७४ ॥
⊛ उपनीत्यधिकारस्यदर्शनादस्यमुख्यता ॥
⊛ सर्वेषांग्रंथकाराणामष्टमाब्दस्यमुख्यता ॥ ७५ ॥
⊛ शस्यतेचततोमुख्योष्टमोब्दोहेतुरुच्यते ॥
⊛ नचविप्रस्यैवविशःकामनारहितस्यच ॥ ७६ ॥
⊛ उपनीत्यधिकारस्यवाक्यमस्तिविधायकं ॥
⊛ येनप्रतीमस्तस्यापिह्यष्टमाब्दस्यमुख्यतां ॥ ७७ ॥
⊛ तस्माद्विशोह्यष्टमोब्दोनमुख्यार्थविवक्षितः ॥
⊛ हेतुस्वरूपमुख्यस्यततोनव्यभिचारिता ॥
षोडशाब्दावधित्वंचमौंजीबंधस्यपंचमात् ॥
मौंजीबंधनकालोहिषोडशाब्दावधिःस्मृतः ॥
विप्राणामेवमुनिभिरन्ययोरन्यएवयत् ॥
आषोडशादब्राह्मणस्यसावित्रीनातिवर्तते ॥ ८० ॥

आद्याविंशात्क्षत्रबंधोराचतुर्विंशतेर्विशः ॥
☉ इत्यंमनूक्तिपीयूषश्रवणांजलिनापिब ॥ ८१ ॥

अर्थ– याप्रमाणे ब्राह्मणास काम्य घेऊन अष्टमाब्द उक्त आहे, असें त्याविष्णूक्तीवरून सिद्ध होतें. आणि या अष्टम वर्षाला मुख्यता ही आहे; तस्मात् काम्य आणि मुख्य हे दोन प्रकार या अष्टमवर्षाच्या ठिकाणीं ब्राह्मणाविषयीं सिद्ध होतात. परंतु : गर्भाष्टमे इत्यादि वाक्यानीं अष्टमवर्षींच, ब्राह्मणांनीं उपनयन संस्कार करावा असें या मागें पदार्शीत केलेल्या श्रुतिस्मृतियुक्त प्रमाणावरून सिद्ध होतें, त्यास ब्राह्मण सकामें करून करो, किंवा, कामनारहितत्वें करून करो. एतावता मुख्य श्रुति स्मृति मताप्रमाणें ब्राह्मणास आठवें वर्षच उक्त आहे. तसेंच वैश्याला मुख्य घेऊन बारावेंच वर्ष सांगितलें आहे तस्मात् ब्राह्मणाप्रमाणे आठव्या वर्षाची मुख्यता वैश्यास नसून केवळ काम्य वच, असल्या कारणानें एतद्विषयीं व्यभिचारत्वाचा दोष येत नाहीं, आणि दुसरें प्रमाण असें आहे कीं, ज्याप्रमाणें ब्राह्मणास पांचवे वर्षापासून सोळाव्या वर्षापर्यंत मौंजीबंधनाविषयीं गौणकाल जसा सांगितला आहे; तसा क्षत्रिय आणि वैश्य या उभयतांस सांगितला नाहीं. त्यास अन्यकाल ( अकराव्या वर्षापासून बेविसाव्या वर्षा पर्यंत क्षत्रियास याप्रमाणें आणि बाराव्या वर्षापासून चोविसाव्या वर्षापर्यंत वैश्यास अन्य काल) असल्या योगानें ब्राह्मणाचा जो उक्त काल, तो वैश्यादिकांस लागत नसल्या कारणाने वैश्यावर व्यभिचारत्वाची भ्रांति मुळींच उत्पन्न होत नाहीं. आता दुसरें असें आहे कीं,

अग्रजाबाहुजावैश्याःस्वावधेरूर्ध्वमव्दतः ॥
अकृतोपनयाःसर्वेवृषलाएवतेस्मृताः ॥ ८२ ॥
✿ इतिज्योतिर्निबंधोक्तेःषोडशाव्दादनंतरं ॥

⊛ विप्रजातेरुपनयेह्याविकारश्चानिश्चयात् ॥
षोडशाब्दावधित्वंचविप्रत्वेहेतुरीरित. ॥ ८३ ॥

अर्थ—ज्या ज्या वर्णांस जे जे उक्त काल सांगितले; ते अतिक्रांत झाले असता ते सर्व वर्णांतील कुमार व्रात्यत्व पावतात म्हणजे शूद्रप्राय होतात. याप्रमाणे "ज्योतिर्निबंध ग्रंथांत" सांगितले आहे. यावरून सोळा वर्षां नंतर ब्राम्हणास उपनयनाविषयीं काळ नाहीं.

⊛ षोडशाब्दावधित्वंचहेतुत्वेनाविवक्षितं ॥

⊛ अतःसाधनवैकल्पपूर्वकंनास्तिदूषणं ॥ ८४॥

⊛ विमतेपुप्रचारोहिदृश्यतेत्वष्टमाब्दतः ॥

⊛ एतेनपक्षधर्मत्वमत्रैवास्तिविलोक्यता ॥

⊛ तस्मादनेनविप्रत्वंसित्यतीतिनसंशयः ॥ ८५ ॥

अर्थ— म्हणून ब्राह्मणास सोळावर्षांपर्यंतच अधिकार सांगितल्या कारणानें या हेतूचा साधन वैकल्य अष्टमाब्द जो काल तो; वैश्यास नसल्यानें केवळ ब्राह्मणासच उक्त असल्यामुळें हा हेतु कोणत्याच रीतीनेंही, वैश्यांस लागू होत नाहीं. तस्मात् हा अष्टमाब्दरूप जो उपनयनकाल तो या सारस्वत कोंकणे ( साष्टी ) यांच्यामध्यें हजारों वर्षांपासून, हा प्रचार दिसतो. यावरून उपनयन कालरूप जें पक्षधर्म न ते या सारस्वत कोंकणे (साष्टी) यांच्याच ठिकाणीं राहतें.आणि अष्टमाब्द हें क्षत्रिय वैश्यास नसून तें अष्टमाब्द मुख्यत्वेंकरून या सारस्वतामध्येंच वर्तत असल्या कारणानें, यांच्या विप्रत्वाविषयींचा सिद्धांत निर्व्यभिचारत्वेंकरून होतो. यांत कांहीं संशय नाहीं.

⊛ काषायवस्त्रग्रहणात्पंचमःस्थाप्यतेऽधुना ॥

अर्थ-आता,काषायवस्त्र ग्रहणानें, या पाचव्या हेतूची स्थापना करितो.

द्विवासांसिवसीरन्नूरक्तानिवसीरन्काषायंब्राह्म
णोमांजिष्ठंक्षत्रियोहारिद्रंवैश्यइतिश्रुतिः ॥ ८६ ॥

अर्थ—तो असी कीं, उपनयन झालेल्या त्रिवर्णस्थ बटूनीं वस्त्रें धारण करण्याचा क्रम असा आहे कीं; ब्राह्मणबटूनीं रक्तास्त्र किंवा काषाय (भगवें) वस्त्र धारण करावें. क्षत्रियानीं माजिष्ठ (मांजिष्टरंगाचें.) वस्त्र धारण करावें. आणी वैश्यानीं, हारिद्र (हरिद्रायुक्त पिंवळें) वस्त्र, याप्रमाणें तीनीं वर्णांनीं अनुक्रमानें वस्त्र धारण करावीं. याप्रमाणें "गृह्यसूत्रवचन" आहे.

अतःकाषायवासोहिब्राह्मणस्यैवभाषितं ॥
माजिष्ठंक्षत्रियस्याथहारिद्रंशूद्रजन्मनः ॥ ८७ ॥
शुक्लंकाषायवस्त्रंवाब्राह्मणस्यविधीयते ॥
माजिष्ठमथवाशुक्लंक्षत्रियस्यविधीयते ॥ ८८ ॥
हारिद्रंशुक्लमथवावैश्यस्यैवविधीयते ॥
इत्थंहिगौतमप्रोक्तांवाचंपश्यगरीयसीं ॥ ८९ ॥

अर्थ— भगवें वस्त्र ब्राम्हण बटूनीं, आरक्त वस्त्र क्षत्रियानीं आणि पिवळें वस्त्र वैश्यानीं याप्रमाणें तीनीं वर्णांनीं वस्त्रें ग्रहण करावीं. आता, दुसरें असें आहे कीं, शुभ्र अथवा माजिष्ठ (कुसुंबरंगाचें) वस्त्र क्षत्रियास आणि शुभ्र अथवा पिवळें वस्त्र वैश्यास; याप्रमाणें तीनही वर्णांस यथानुक्रमानें वस्त्रें उक्त सांगितलीं आहेत, याप्रमाणें "गौतमाचें वचन" आहे तें पाहावें.

तथावासांसिवक्ष्यामिविप्रादीनामनुक्रमात् ॥
काषायंचैत्रमाजिष्ठंहारिद्रंचप्रकीर्तितं ॥
इत्थंबृहन्नारदीयपुराणेप्यवलोक्यतां ॥ ९० ॥

अर्थ— भगवें, आरक्त आणि पिवळें यापमाणें तीनी वर्णांनी अनुक्रमानें वस्त्र धारण करावीं. याप्रमाणें "बृहच्चान्द्रीय पुराणांत" सांगितलें आहे तें पहावें.

⊙ नन्वस्यहेतोर्वैश्येपुव्यभिचारःप्रदृश्यते ॥

⊙ अन्वयव्यतिरेकाभ्यांपैठीनसिमुनेःस्मृतौ ॥ ९१ ॥

यज्ञोपवीतकाषायवाससोश्चकमंडलोः ॥

समानत्वेनसर्वेषांसमीरितनयाविशः ॥ ९२ ॥

⊙ विहितत्वागकाषायवाससोगिनिचेच्छृणु ॥

उक्तवस्त्रालाभपक्षेपैठीनसिवचस्तथा ॥ ९३ ॥

विशोहारिद्रालाभेचकाषायस्यापिसंग्रहः ॥

अतएवविशोपिस्यात्कार्पासमुपवीतकं ॥ ९४ ॥

कार्पासमुपवीतंस्याद्विप्रस्योर्ध्ववृतंत्रिवृत् ॥

शाणसूत्रमयंराज्ञोवैश्यस्याविकसूत्रकं ॥ ९५ ॥

⊙ तदभावेतुकार्पासंपैठीनसिगिराभवेत् ॥

○ अतःकाषायवस्त्रंतुवैश्यस्यामुख्यमीरितं ॥ ९६ ॥

⊙ हेतौविप्रस्यकाषायंमुख्यत्वेनविवक्षितं ॥

⊙ अतःसनियवैश्येपुव्यभिचारोनजायते ॥ ९७ ॥

○ काषायस्यैवग्रहणादेषांमुख्यंत्ववेदितं ॥

⊙ असिद्धिर्मुख्यकाषायवस्त्रस्यैतेपुनास्त्यतः ॥ ९८ ॥

⊙ इतिकाषायवस्त्रस्यविप्राणामेवधारणं ॥

⊙ तदेवधार्यतेऽस्माभिरितोविनत्वनिश्चयः ॥ ९९ ॥

⊛ इत्थमेणेयाजिनस्यधारणंब्रह्मगोचरं ॥

⊛ अस्यैवरूढिर्गौडेपुदृश्यतेबलवत्तरा ॥

⊛ अतोमीपांब्राह्मणत्वंसित्थ्यतीतिनसंशयः॥ १०६

**अर्थ—** त्यांत ब्राह्मण बटूंनीं कृष्णाजिन, क्षत्रिय बटूंनीं रौरवाजिन आणि वैश्य बटूंनीं वस्ताजिन, याप्रमाणें ज्या ज्या वर्णास जीं जीं अजिनें ( चर्मे ) मुख्यत्वेंकरून उक्त सांगितलीं आहेत, त्या त्या वर्णांनीं तीं तीं यथानुक्रमानें धारण करावीं. याप्रमाणें "बृहन्नारदीयपुराणांत" सांगितलें आहे तें पाहावें. आतां या अजिन धारणरूप शास्त्राधारावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, " कृष्णाजिन (ह्म०) हरिणाचें चर्म हें ब्राह्मणावांचून, अन्यास ( क्षत्रिय वैश्यांस ) धारण करण्याचा अधिकार नाहीं. केवळ ब्राह्मणास मात्र अधिकार आहे. आणि या गौडसारस्वत कोंकणे ( शाण्णवी ) यांच्या मध्यें, ही रूढी कुलपरंपरागत चालली आहे, यावरून ( ह्मणजे ) कृष्णाजिन धारणरूप साह्याच्या हेतूवरून यांचे ब्राह्मणत्वास आधारभूत जें षट्कर्माधिकारत्व; तें निर्व्यभिचारलेंकरून सिद्ध होतें. यांत कांहींच संशय नाहीं.

⊛ कार्पासस्योपवीतेनसप्तमःस्थाप्यतेथच ॥

**अर्थ—** आतां, कार्पासोपवीताच्या ग्रहणेंकरून, या सातव्या हेतूची स्थापना करितों.

कार्पासमुपवीतंस्याद्विप्रस्योर्ध्ववृतंत्रिवृत् ॥
शणसूत्रमयंराज्ञोवैश्यस्याविकसौत्रिकम् ॥

⊛ इत्थंमनुस्मृतावुक्तंवचनंचापिपश्यतां ॥ १०८ ॥

⊛ कार्पासस्योपवीतस्यधारणंब्रह्मगोचरं ॥

## ◎ तदेवधार्यतेऽमीभिरतोब्रह्मत्वनिश्चयः॥१०९॥

**अर्थ**–तीअसीकीं, ब्राह्मण यदूंस कार्पासोपवीत ( कापसाचेंच यज्ञोपवीत ) असून नवर्ततूं आणि ग्रथियुक्त असावें; क्षत्रियांस, शणाचें, आणि वैश्यांस मेंढ्याच्यालोकरीचें, याप्रमाणे तीनीवर्णांस तीन प्रकारचीं यज्ञोपवीतें सांगितलीं; तीं यथानुक्रमानें, त्रिवर्णस्थ बटूनीं धारण करावीं. याप्रमाणें "मनुस्मृतींत" सांगितलें आहे. यावरून हेंकार्पासोपवीत, केवळ ब्राह्मणासच सांगितलेंआहे. आणि तेंच कापसाचें यज्ञोपवीत हे सारस्वतकोंकणें (शाण्वीं) हे प्राचीन कालापासून धारण करितात, यावरून यांच्या ब्राह्मणत्वा विषयीं निर्बाध निश्चय होतो.

## ◎ मेखलाधारणादत्रहेतुश्चस्थाप्यतेऽष्टमः ॥

**अर्थ**–आतां मेखलाधारणानें याअष्टम हेतुची स्थापना करितों.

मौंजीविप्रस्यविज्ञेयाधनुर्ज्याक्षत्रियस्यच ॥
आवीवैश्यस्यविज्ञेयाश्रुणुध्वमाजिनंतथा॥११०॥
तेषांमेखलामौंजीब्राह्मणस्यधनुर्ज्याक्षत्रि
यस्यावीवैश्यस्य ॥

## ◎आश्वलायनसूत्रोक्तंवाक्यमित्थंविचिंत्यतां१११

**अर्थ**–तीअसीकीं, मौळाची मेखलास (मौळाचीं मुंज) ही ब्राह्मणानीं, धनुष्याच्या दोरिची मेखला क्षत्रियानीं, आणि मेंढ्याच्या लोकरिची मेखला वैश्यानीं, याप्रमाणें अनुक्रमानें तीनी वर्णानीं मेखला (ह०) कंबरेसबांधण्याच्यामुंज्या ग्रहण कराव्या. याप्रमाणें "अश्वलायनगृह्यसूत्रोक्तवचन आहे. व स्मृत्यंतरवचनही" आहे त्याचेंचिंतनकरावें. आतां यामेखला धारण रूप अष्टम हेतूवरून

असें सिद्ध होतेकीं, ब्राह्मण व्यतिरिक्त मोळाची मेखला धारण कर-ण्याला क्षत्रिय वैश्यांस अधिकार दिसत नाहीं. केवळ ब्राह्मणास मात्र मोळाची मेखला उक्त सांगितली आहे. आणि सारस्वत-कोंकणी (शाणवी) हे अनादि कालापासून मोळाचीच मेखला धारण करितात यावरून यांच्या ब्राह्मणत्वा विषयीं कांहींच संशय रा-हत नसून यजनादि षट्कर्मत्वानुरूप जें ब्राह्मणत्व तें, विमत या पक्षावरच निर्व्यभिचारत्वें करून सिद्धहोतें. यांत कांहींच संशय नाहीं.

⊛ पालाशदंडमानाभ्यांनवमोदशमस्तथा ॥

अर्थ—आतां पालाशदंड म्हणें करून व त्याच्या मानेंकरून नवम व दशम या दोन हेतुची स्थापना करितों.

विप्रस्यदंडःपालाशःसोपिसत्केशसंमितः ॥
तथाक्षत्रविशोप्यन्यप्रमाणोन्यात्मकःस्मृतः ११२
विप्रस्यदंडःपालाशोवैल्वोवाधर्मतःस्मृतः ॥
अश्वत्थःक्षत्रियस्याथखादिरोवापिधर्मतः ११३
औदुंबरोथवैश्यस्यप्लाक्षोवादंडउच्यते ॥
एतेषामप्यभावेचसर्वेषामेवयज्ञियः ॥
⊛ इतिसंस्कारकतुकेमनुनाचाप्युदीरितं ॥११४॥

अर्थ—तोअसाकीं, ब्राह्मणास पालाश किंवा बेलाचा दंडअसून तोकेशप्रमाण असावा. क्षत्रियांस पिंपळाचा अथवा खैराचा दंड असावा. आणि वैश्यांस उदुंबराचा (उंबराचा) अथवा वडाचा दंड असावा. याप्रमाणें दंड निर्णय "मनुनें" सांगितला आहे.

ब्राह्मणोवैल्वपालाशौक्षत्रियोवाटखादिरौ ॥
पैलवौदुंबरौवैश्योदंडानर्हतिधर्मतः ॥

@ एवंमनुस्मृतावुक्तंदंडनिर्णयकारकं ॥ ११५ ॥

अर्थ—ब्राह्मणास पळसाचा किंवा वेलाचा, क्षत्रियास खैराचा किंवा वडाचा, आणि वैश्यास औदुंबराचा याप्रमाणें दंडनिर्णय, "मनुस्मृतींत" सांगितले आहेत्.

@ नन्वस्यहेतोर्वैश्येष्वव्यभिचारभवत्यहो ॥
वैश्यानामपिपालाशोयतोदंडोहिविद्यते ११६
पारस्करेणसर्वेवासर्वेषामितिभाषणात् ॥
अथवैश्यस्यपालाशदंडस्त्वेपेनचक्षतिः ॥

@ केशसंमितशब्देनव्यभिचारनिवारणात् ११७

अर्थ—खरें, परंतु, याहेतुवरून वैश्यांवर व्यभिचार येतो; तो असा कीं, पाळाशदंडहा ब्राह्मणासच सांगितला, क्षत्रिय वैश्यांस नाहीं, असें जें प्रमाण मागें सांगितलें, त्या प्रमाणा वरून वसोंप्रच्या मानावरूनहीं वैश्यावर व्यभिचारलाचीव्याप्तीघडती. कारण (**पारस्करेणसर्वेवासर्वेषां**) यावचनावरून पाळशदंडहा, त्रिवर्णस्थ बटूंलाही धारण करण्याच्या अधिकारादिसतो, ह्मणून येथे व्याभिचारयेतो. असेंकोणि शकाधेतील; तर तीशका; केशप्रमाण याशद्वावरून, निवारण होती. कारण, यद्यपि क्षत्रिय वैश्यांला, पाळाशदंड घेण्याचा अधिकार सांगितला; तथापि, केशप्रमाण पाळशदंड, क्षत्रिय वैश्यास धारकरण्याचा अधिकार (पारस्करेण) यावचनावरून दिसत नाहीं. आणि केशप्रमाणहें, ब्राह्मणासच उक्तसांगितलेंआहे, हे खालील प्रमाणावरून *सिद्ध होइल.*

तेषांदंडाःपालाशोब्राह्मणस्योदुंबरक्षत्रियस्यवैल्वो

---

१ ह्मणजे पितृपाननादिकार्नी, घेतलेल्याशके वरून.

वैश्यस्यकेशसंमितोब्राह्मणस्यललाटसंमितःक्ष
त्रियस्यघ्राणसंमितोवैश्यस्य ॥

⊛ इत्याश्वलायनमुनेर्वचनंचविलोक्यतां ॥११८॥

**अर्थ**—आता, ब्रह्म क्षत्रिय आणि वैश्य, यातीनीं वर्णांस अनुक्रमानें दंड सांगितले, ते असे कीं, केशप्रमाण पालाशदंड ब्राह्मणास; ललाट प्रमाण औदुंबराचा दंड क्षत्रियांस आणि नासिकाग्र प्रमाण बेलाचा दंड वैश्यास याप्रमाणें तीनीवर्णांस दंड जाणावे. असें " आश्वलायनऋषीचेंश्रुति " वाक्यआहे. तेंपाहावें. यास स्मृति प्रमाणें;

विप्रस्यकेशमानंस्यादाललाटंनृपस्यवै ॥
नासिकाग्रमितंदंडवैश्यस्याहुर्विपश्चितः ॥

⊛ इत्थंवृहन्नारदीयपुराणोक्तंविचार्यतां ॥११९॥

केशांतिकोब्राह्मणस्यदंडःकार्यःप्रयत्नतः ॥
ललाटसंमितोराज्ञःस्यात्तुनासांतिकोविशः

⊛ इत्थंमनूक्तिपीयूषंवर्ततेवलवत्तरं ॥ १२० ॥

⊛ अतःपालाशदंडश्चवैश्यस्यविहितोवसन्॥१२१

⊛ नकेशसंमितइतिव्यवहारोनविद्यते ॥

⊛ अतोहेतुश्चनिर्दोषइतिवक्तुंनशक्यते ॥

**अर्थ**—तींअसीकीं, ब्राह्मणाचादंडकेशप्रमाण, ( केशापर्यंत ) असावा. ललाटापर्यंतक्षत्रियाचा, आणि नासाग्रापर्यंतदंडवैश्याचा असावायाप्रमाणें "वृहन्नारदीयपुराणांतव मनुस्मृतींत," सांगितलें आहे त्याचा विचार करून पाहावें. तस्मात् ( पारस्करेण ) यावचनाव-

रून पालाशदड यद्यपिवैश्याला उक्त सांगितला; तथापि केशप्रमाण नसल्याकारणानें, याहेतुचा व्यभिचार क्षत्रिय वैश्यावर येतनाहीं, ह्मणून हा हेतू सिद्ध होतो, असे ह्मणता येणारनाहीं. कां, तरवैश्यालाहीं केश प्रमाण दड सांगितला आहे त्याविषयी प्रमाण.

प्राणमानोब्राह्मणस्यदंडःस्यात्क्षत्रियस्यतु ॥
ललाटसंमितःकेशसंमितश्चविशोभवेत् १२२
⊛ एवंवासिष्ठवचनेदंडानिर्णयकारके ॥
⊛ केशसंमितदंडोयद्वैश्यस्यापिप्रचोदितः १२३
⊛ तस्माद्वैश्येप्यस्यहेतोर्व्यभिचारोभवेद्ध्रुवं ॥
⊛ इतिचेच्छृणुपालाशोदंडोमुख्योविवक्षितः १२४
⊛ हेतोःशरीरतोवैश्येव्यभिचारोनसंभवेत् ॥
⊛ नहिवैश्यस्यपालाशदंडोमुख्यतयोदितः ॥
⊛ औदुंबरादिकादंडास्तस्यमुख्यतयोदिताः १२५
⊛ तदभावेचपालाशदडस्यगदितत्वतः ॥
⊛ पारस्करस्यसर्वेवासर्वेषामितियद्वचः ॥
⊛ एतत्प्रागुक्तदडानामभावविषयंभवेत् ॥१२६॥

अर्थ—तें असेंकीं, ब्राह्मणबटूस प्राणप्रमाण, (नाकापर्यंत) क्षत्रिय-बटूस ललाटापर्यंत, आणि वैश्यबटूस केशप्रमाण (केशापर्यंत) याप्रमाणें तीनवर्णांस तीन प्रमाणे सांगितलीं. तस्मात् या वसिष्ठ वचनावरून केशप्रमाण दड हा वैश्यासहीआहे; यावरून केशप्रमाण हेतूची निर्दोषपणी सिद्धी नहोता, पुन व्यभिचार येतो, असीकोणी शंकाघेतील. तर असें आहेकीं, मुख्यत्वेंकरून केशप्रमाण पालाश

दंड हा वैश्यास सांगितला नाहीं; तर, गौणत्वें करून सांगितला आहे. आणि मुख्यत्वें करून श्रुतिस्मृतींनीं, केशप्रमाण पालाशदंड हा, ब्राह्मणासच, सांगितला; तसेंच ललाट प्रमाण औदुंबराचा दंड क्षत्रियांस. आणि वैश्यास नासाग्र (नाकापर्यंत) बेलाचा दंड मुख्यत्वें करून सांगितला आहे तर याप्रमाणें सर्वश्रुति, स्मृति, व पुराणें याची एक वाक्यता केली, ह्मणजे, हेदोनीहेतू निर्दोष निर्व्यभिचारत्वें करून सिद्ध होतात.

पलाशश्चाथन्यग्रोधःप्लक्षोवैकंकतोद्भवः ॥
अश्वत्थौदुंबरौबिल्वश्चंदनःसरलस्तथा॥१२७॥
शालश्चदेवदारुश्चखदिरश्चेतियाज्ञियाः ॥
इतिब्रह्मपुराणोक्त्यास्यात्पालाशोपियज्ञियः१२८
तस्मात्प्रतिनिधित्वेनपालाशस्योदितत्वतः॥
वैश्यस्यस्यादमुख्योयमतोनव्यभिचारिता १२९ ॥
औदुंबरादिदंडाश्चदृश्यतेक्षत्रियादिषु ॥
तथागौडेषुग्रहणंपालाशस्यापिदृश्यते ॥
अतोस्यपक्षधर्मेणब्राह्मणत्वंहिसिध्यति॥१३०॥

अर्थ–दुसरेंअसें आहेकीं, पलाशवृक्ष, वटवृक्ष, पिंपरी, वेहळी, (कानडीभाषेंत यावृक्षास, हल्माणिका, असें ह्मणतात) तो व पिंपळ, उंबर, बेल, चंदन, सरल, (सुरू, असें ह्मणतात) साल (साग) देवदारू, आणि, खैर, यासर्ववृक्षास, यज्ञीय असें नाम आहे. आणि उक्तदंडाच्या अभावीं यापज्ञीय (यज्ञासउत्तम) याच्या दंडग्रहणें करून पालाशदंडाचें ग्रहण होतें. खरें, परंतु केव्हां? जर हे उक्त दंड नसतील तर (एतेषामप्यभावेतुसर्वेषामेवयाज्ञिया) याचवचना-

वरून क्षत्रियवैश्यांवर, व्यभिचाराचा संबंधहोईल. तस्मात् यावचनांत मुख्यत्वेंकरून अभावपद असल्याकारणानें यद्यपि क्षत्रियवैश्यांस, पालाशदंड सांगितला तथापि त्या अभाव पदाच्या योगानें व सांप्रत क्षत्रिय आणि वैश्य या दोन वर्णांत औदुंबरादिकच दंड धारण करण्याची रुढी प्रत्यक्षत्वेंकरून, भासतअसल्यामुळें, याहेतुचा व्यभिचार क्षत्रिय वैश्यांवर येत नाहीं, कारण मुख्यता नाहीं ह्मणून. आतां या **गौडसारस्वत कोंकणे ( शाणवीं )** यांच्यामध्यें हजारो वर्षांपासून पालाशदंडच ग्रहण करण्याची रुढी असल्याकारणानें या पालाश दंड ग्रहण करण्याच्या हेतुवरूनही षट्कर्माधिकाररूपजें **पक्षधर्मत्व ( जेंलक्षण )** तें यासारस्वतांच्याच ठिकाणीं राहते. यावरून यांचे ब्राह्मणत्वहें, अनादिकालीन आहे. असें सिद्धहोतें. यांत कांहींच संशय नाहीं.

® ततोपदेशोगायत्रीमंत्रस्यैकादशःस्मृतः ॥

® यतोपदेशोगायत्र्याविप्रस्यैवान्ययोर्नच १३१

**अर्थ**—आतां गायत्रीचा उपदेशकरण्याचा अधिकार केवळ ब्राह्मणाला मात्र आहे. अन्यवर्णास ( क्षत्रियवैश्यांस ) उपदेश करण्याचा अधिकार नाहीं, ह्मणून गायत्री उपदेशाच्या शास्त्राधारानें या अकराव्या हेतुची स्थापना करितों.

अधीयीरंस्त्रयोवर्णाःस्वकर्मस्थाद्विजातयः ॥

प्रब्रूयात्ब्राह्मणस्त्वेषांनेतरावितिनिश्चयः ॥१३२॥

**अर्थ**—तीअशीकीं, ब्राह्मण क्षत्रिय आणि वैश्य यातीनवर्णांनीं, आपापलींकर्में आचरणकरून वेदाध्ययनकरावें. परंतु अध्यापन (वेदपढविणें) याचा अधिकार तीनवर्णांतून केवळब्राह्मणासच आहे. क्षत्रिय आणि वैश्य यादोन वर्णांस वेदपढविण्याचा अधिकार

यातीनकर्मांचामात्र **क्षत्रिय वैश्यास** अधिकारआहे. आणि ब्राह्मणाचीं उपजीविकेचीं जीं तीनकर्में तीं, यांस ( क्षत्रियवैश्यांस **नाहींत** ) असें **"मनुनें प्रजापतीस"** सांगितलें आहे. व शस्त्र आणि अस्त्र याच्याधारणानें, प्रजासरक्षणकरून क्षत्रियानें उपजीविकाकरावी तसेंच वाणिज्य [ व्यापार ] पशुरक्षण आणि कृषी **[ शेतकी ]** हींतीनकर्मे करून वैश्यानीं उपजीविकाकरावी आता मुख्यत्वेंकरून वेदाध्ययन प्रजारक्षण व व्यापार यातीनकर्मांनीं ब्राह्मण क्षत्रिय आणि वैश्य, यातीनवर्णांनीं आपापल्या उक्तकर्मांवरून उपजीविका करावी. याप्रमाणें "मनुस्मृतींत" सांगीतलें आहे.

यावरून अध्यापनाचा अधिकार केवळ ब्राह्मणास मात्र असल्या **कारणानें**, उपदेशाचा अधिकार क्षत्रियवैश्यांस मुळींच नाहीं. असें या **"मनुवचनावरून"** सिद्ध होतें. यास दुसरें प्रमाण.

पितैवोपनयेत्पुत्रंतदभावेपिःतुपिता ॥
तदभावेपितुर्भ्रातातदभावेपिसोदरः ॥
❁इत्थंप्रयोगरत्नेरितपितेतिब्रह्मगोचरं ॥१३९॥
नक्षत्रियाहिविपर्यंभवेत्तेषापुरोहितः ॥
दृष्टार्थत्वाचोपनीतेरध्यापनविवर्जनात् ॥
❁इत्थंनिर्णयसिंधौहिनिर्णीतमवधार्यता ॥१४०॥

**अर्थ**—तें असेंकीं, पुत्राचें उपनयनकरणें तें, पित्यानें करावें. जर पितानसेल, तर पित्याच्या पित्यानें, [ आज्यानें ] करावें. त्याच्या अभावीं पितुर्भ्राता, [ चुलत्यानें ] करावें. त्याच्याही अभावीं सहोदर [ **ज्येष्ठबंधूनें** ] करावें याप्रमाणें उत्तरोत्तर कनिष्ट पक्ष आहेत. आणि हा सर्वशास्त्राधार केवळ ब्राह्मणाविषयींच

आहे. क्षत्रियादिकांविषयीं नाहीं. कारण क्षत्रियादिकांनीं आपल्या उपाध्यायापासून गायत्रीमंत्राचा उपदेश घ्यावा. शिष्यापासून घेऊनये. कां; तरत्यांस अध्यापनाचा अधिकार नाहीं. आणि गायत्री उपदेश हा अध्यापन कर्मच आहे, म्हणून क्षत्रियादिकांस दुसऱ्या उपदेश करण्याचा अधिकार नाहीं याप्रमाणें. "प्रयोगरत्न प्रयोग" व निर्णयसिंधून" सांगितलें आहे त्याचा विचार करून पाहावें.

॥ ननुमंत्रोपदेष्टृत्वंनृपस्यापिभवेत्क्वचित् ॥
अब्राह्मणादध्ययनमापत्कालेविधीयते ॥ १४१ ॥
अनुव्राज्याचशुश्रूषायावदध्ययनंगुरोः ॥
नाब्राह्मणेगुरौशिष्योवासमात्यंतिकंवसेत् ॥ १४२ ॥
ब्राह्मणेचाननूचानेकांक्षंगतिमनुत्तमाम् ॥
॥ इत्थंहिमनुनाप्रोक्तंसावधानंविचार्यतां ॥ १४३ ॥

अर्थ—खरें परंतु येथें आशंकाउत्पन्नहोतेकी, क्षत्रियादिकालाहिउपदेशकरण्याचा अधिकारआहे, यावरून क्षत्रियवैश्यालाही ब्राह्मण म्हणावे[1] असिकोणिशंकाघेतील, तरत्याशंकेचें समाधानसांगतों. तें असेंकी, क्षत्रियवैश्यालाउपदेशाचा अधिकार आहेखरा. परंतुकेव्हा, आपत्कालीं (ब्राह्मणनसेलतर) क्षत्रियानीं उपदेशकरावा.

१ चित्पावन येथें शंकाघेतील, तीअसी कीं, सोनारास व परभातही गायत्री उपदेश आहे; तर अनादी काळापासून साम्प्रतकालापर्यंत सोनारास व परभात त्याच्या उपाध्यायापासूनच उपदेश वगैरे होतात. आणि हें सर्व विद्वज्जनासही माहित आहे. आता, हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर चित्पावन आपलापक्ष सिद्ध करण्यास्तव त्यांच्याकडून स्वता उपदेश करवितील तरमात्र नकळे.

आणि उपदेश ग्रहणकरणाऱ्याब्रह्मच्याऱ्यानीं; अध्ययनसंपेपर्यंत त्या-गुरुची पादप्रक्षालनादि शुश्रुषा ( सेवा ) करावी असेंआहे. परंतु, ब्रह्मचर्यव्रतधारणकरून क्षत्रियादिगुरुपासीं, यथासांगवेदाध्ययन नझाल्यानंतर, मोक्षेच्छेनें सर्वजन्मपर्यंत शिष्यानें त्याक्षत्रियगुरु-पासीं राहूनये. एवंच तात्पर्यकाय? यद्यपी आपत्कालीं क्षत्रिय-वैश्यांसगुरुकेले; तथापि, तेकेवळ अध्ययनपूर्तेच, आहेत; सिवाय त्यांपासून मोक्षप्राप्तिहोणारनाहीं. याप्रमाणें "मनुनेंसांगितलें" आहे. त्याचाविचारकरावा.

तत्वविज्ञापनंधर्मोविप्रस्यतुविशेषतः ॥ [१]

ज्ञापनंक्षत्रियाणांचधर्मोविप्राभ्यनुज्ञया ॥१४४॥

तदभावेतुवैश्यानांशूद्रस्यपरमापदि ॥

इतिभारततात्पर्यनिर्णयोक्तंविचार्यतां ॥१४५॥

अतोहेतोरस्यभवेत्क्षत्रियेव्यभिचारिता ॥

इतिचेच्छृणुराज्ञस्यगायत्र्यानोपदेशता १४६॥

**अर्थ—**दुसरें असें आहेकी, तत्वाचाउपदेशकरणें, हाधर्म वि-शेषेंकरूनब्राह्मणाचाचआहे. आतां, तत्वोपदेशहा, क्षत्रियहीकरि-तात, म्हणूनपुनःकोणिशंकाघेतील. तरत्यानींउपदेशकरावा, परंतु ब्राह्मणाच्या आज्ञेवरूनकरावा. तसेंच क्षत्रियनसेलतरवैश्यानेंही करा-वा. आतां यातिनीवर्णाच्या अभावीं, शूद्रानेंही उपदेश स्वपुत्रालाक-रावा. याप्रमाणें "भारततात्पर्यनिर्णयोक्तिवचन" आहे. तस्मात् यावरदर्शविलेल्या दोनवचनावरून क्षत्रियवैश्यास उपदेशकरण्या-चाअधिकार भारतअसल्याकारणानें, क्षत्रियवैश्यांवरव्यभिचारयेतो, असीकोणिशंकाघेतील; तर क्षत्रियवैश्यांस उपदेशाचा मुळींचअ-

धिकारनाहीं यानिपयीं व आलेल्याव्यभिचाराच्या निवृत्तीविषयीं नि-र्णयसागतों, तोश्रवणकरा.

विपद्युक्ताध्यापकताविप्रान्यस्यनचान्यदा ॥
अतोत्रावश्यकेम्यश्चविप्रेभ्योह्युपदेशनं १४७ ।
ॐ ब्राह्मराजन्यवैश्यैश्चमन्वादिस्मृतिवाक्यतः ॥
ॐअतोस्यहेतोर्नैवस्याद्व्यभिचारोनृपादिके १४८॥
ॐ सत्स्वप्यन्यद्विजेष्वेभिर्विमतैकरणात्स्वयं ॥
ॐ गायत्र्याउपदेशस्यमुख्यतैतेपुसिध्यति ॥
ॐ अतोस्यपक्षधर्मत्वंविद्यतेतोनदूषणं ॥ १४९ ॥

अर्थ—तो असार्की, क्षत्रियवैश्यांनीं उपदेशकरावा, ह्मणून जें सांगितलें, तें, खरें पणतें येव्हां आपत्कालीं, जर अन्यदा (आपत्कालनसेल्लतर) उपाध्यायापासूनचग्रहणकरावा असें आहे. तस्मात् आपत्कालरेतीतकरून (ब्राह्मणमिळतअसतां) क्षत्रियवैश्यांनीं उपदेशकरूनयें. याप्रमाणें " मन्वादिकांनीं, " स्पष्ट सांगितलें आहे. आणियाचविषयीं, प्रयोगरत्नादिक व निर्णयसिंध्वादिक ग्रंथांतील प्रमाणें मागें दाखविलींच आहेत. तस्मात् यासर्वप्रमाणावरून व सांप्रत आपत्काल्नाहून ब्राह्मणमिळत नसल्याकारणानें, पहेतूचेंलक्षण, क्षत्रियवैश्यांस, लागूहोतनाहीं (अ.) क्षत्रियवैश्य याहेतूविषयीं अर्ह (योग्य) नव्हेत. हेंसर्वप्रमाणावरून, सिद्धहोतें. आणि यावरून गोकर्ण (दाक्षणी) यांच्यामध्यें हजारोंवर्षांपासून, यद्यपि द्राविडादीक (देशस्थ) जवळनजळ आहेत, तथापि, उपनयनकाळीं मुलास उपदेशहोणें तो स्वजातीयाकडूनचहोतो. आणि उपदेशास अध्यापकत्वच नसल्याकारणानें, न तेंअध्यापन निर्वा-

ध निर्व्यभिचारलेंकरून अनादिकालापासून सांपतकालापर्यंत यासारस्व-तांमध्यें प्रत्यक्ष दृष्टीसपडतअसल्यामुळें, याअकरव्याहेतूवरून हीं अध्यापनेंरूपजेंपक्षधर्मत्व, तें, यासारस्वतकोंकणेंब्राह्मण यांच्याच ठिकाणींराहतें. यावरून हेसारस्वत कोंकणें (शाणवीब्राह्मण) हे षट्कर्माधिकारीनिश्चयेंकरून अनादिसिद्ध आहेत. यांतकाहींसशय-नाहीं.

@ अथभिक्षाविधानेनद्वादशस्थाप्यतेधुना ॥

अर्थ—आतां, भिक्षा विधानेंर्णयें करून बाराव्या हेतुची स्थापना-करितो..

भवत्पूर्वंचरेद्भैक्ष्यमुपनीतोद्विजोत्तमः ॥
भवन्मध्यंतुराजन्योवैश्यस्तुभवदुत्तरं॥ १५० ॥
ब्राह्मणेपुचरेद्भैक्ष्यमनिंदेष्वात्मवृत्तये ॥
आदिमध्यावसानेपुभवच्छब्दोपलक्षितं॥१५१॥
भवत्पूर्वंतुविप्रस्यभवन्मध्यंनृपस्यतु ॥
भवदंत्यविशःप्रोक्तंभिक्षायाहरणेवचः ॥१५२॥
@ याज्ञवल्क्यस्मृतिश्चेत्थमनुस्मृतिस्तथैवच ॥
@ तथाबृहन्नारदीयपुराणेचाप्युदीरितं ॥ १५३ ॥

अर्थ—तीं असीं कीं, ब्राह्मणक्षत्रिय आणिवैश्य, यातीनवर्णांनीं उप-नयनसंस्कार झाल्यानंतर, भिक्षामागण्याचाविधी असा आहे कीं, ब्राह्म-

१ याअध्यापनरूप उपदेशाकडे कल्याणेच्छुनें वतत् अनुयायीं जे नीसींमचित्पावनादिक जे असतील त्यानीलक्षद्यावें. ह्मणजे यानां अध्यापनाचा अधिकारअसेकिंवानाहीं, याचाविचार उघडदिसेल. व तेणेंकरून भ्रमाचानाशहोऊन चित्तें स्वच्छहोतील.

धिकारनाहीं याविषयीं व आलेल्याव्यभिचाराच्या निवृत्तीविषयीं नि-
र्णयसागरों, तोश्लाकरा-

विपद्युक्ताध्यापकताविप्रान्यस्यनचान्यदा ॥
अतोत्रावश्यकेभ्यश्चविप्रेभ्योह्युपदेशनं १४७ ।
ⓞ ग्राह्याराजन्यवैश्यैश्चमन्वादिस्मृतिवाक्यतः ॥
ⓞ अतोस्यहेतोर्नैवस्याद्व्यभिचारोनृपादिके १४८॥
ⓞ सत्स्वप्यन्यद्विजेष्वेभिर्धिमतैकरणात्स्वयं ॥
ⓞ गायत्र्याउपदेशस्यमुख्यत्वेतेपुसिध्यति ॥
ⓞ अतोस्यपक्षधर्मत्वंविद्यतेतोनदूषणं ॥ १४९ ॥

ध निर्व्यभिचारत्वेंकरून अनादिकालापासून सांप्रतकालपर्यंत यासारस्वतांमध्यें प्रत्यक्ष दृष्टीसपडतअसल्यामुळें, याअकराव्याहेतूवरून ही अध्यापनेंरूपऊँपक्षधर्मत्व, तें, यासारस्वतकोंकणेंब्राह्मण यांच्याच ठिकाणींराहातें. यावरून हेसारस्वत कोंकणे ( शाण्णवीब्राह्मण ) हे षट्कर्माधिकारीनिश्चयेंकरून अनादिसिद्ध आहेत. यांतकांहींसंशय नाहीं.

⊛ अथभिक्षाविधानेनद्वादशस्थाप्यतेधुना ॥

अर्थ—आतां, भिक्षा विधानेंकरून बाराव्या हेतुची स्थापना करितों.

भवत्पूर्वंचरेद्भैक्ष्यमुपनीतोद्विजोत्तमः ॥
भवन्मध्यंतुराजन्योवैश्यस्तुभवदुत्तरं॥ १५० ॥
ब्राह्मणेपुचरेद्भैक्ष्यमनिंदेष्वात्मवृत्तये ॥
आदिमध्यावसानेषुभवच्छब्दोपलक्षितं॥१५१॥
भवत्पूर्वंब्राह्मणस्यभवन्मध्यंनृपस्यतु ॥
भवदंत्यंविशःप्रोक्तंभिक्षायाहरणेवचः ॥१५२॥
⊛ याज्ञवल्क्यस्मृतिश्चेत्थमनुस्मृतिस्तथैवच ॥
⊛ तथाबृहन्नारदीयपुराणेचाप्युदीरितं ॥ १५३ ॥

अर्थ—तो असा कीं, ब्राह्मणक्षत्रिय आणिवैश्य, यातीनवर्णांनी उपनयनसंस्कार झाल्यानंतर, भिक्षामागण्याचाविधी असा आहे कीं, ब्राह्म-

१ याअध्यापनरूप उपदेशाकडे कल्याणेच्छूने यावत् अनुयायी जे नीरक्षीरविवेचनप्रदिक जे असतील त्यानींलक्षद्यावें. ह्मणजे यानां अध्यापनाचा अधिकारअहेकिंवानाहीं, याचाविचार उघडदिसेल. व तेणेंकरून भ्रमाचानाशहोऊन चित्तें स्वच्छहोतील.

णानीं भिक्षादेही, यूमंत्रास, भवति, हाशब्दप्रथमतःलाऊन भिक्षा-मागावी. तीचाप्रकार. ब्राह्मणानी भवतिभिक्षांदेहि, असेह्मणून भिक्षामागावी. क्षत्रियानीं, भिक्षांभवतिदेहि. असे ह्मणावें. आणि भिक्षांदेहिभवति; असें ह्मणूनवैश्यानीं भिक्षामागावी. याप्रमाणें तीनवर्णानीं श्रेष्ठब्राह्मणाच्याघरीं भिक्षामागावी. याप्रमाणें " याज्ञवल्क्यस्मृतींत " " व मनुस्मृतींत " व " बृहन्नारदीयपुराणांत" ही त्रिवर्णस्थब्रह्मचर्यबटूनीं भिक्षामागण्याचाविधी अनुक्रमानें सांगितला आहे.

अप्रत्याख्यायिनःपूर्वस्त्रियोवाताद्दशीपुनः ॥
भिक्षेतभिक्षांप्रथमंभवान्भिक्षांददात्विति १५३
भवतिभिक्षांदेहीतिस्त्रियंचाग्रेस्वमातरं ॥
मौंजीकर्मोत्सवानांतआमभिक्षांसमाचरेत् १५४
पक्वान्नमाहरेन्नित्यमासमावर्तनात्तथा ॥
गर्भिणींनैवयाचेतमतिमान्विधवांतथा॥१५५॥
इत्थंहिव्यासवाक्यानिस्वंसम्यगवधार्यतां ॥
तस्मादनेनास्यहेतोर्दोषोनास्त्यप्यसंशयं १५६

अर्थ—आणि ब्राह्मणानीं भवतिभिक्षांदेहि असेंह्मणूनप्रथमतः आपल्यामातेजवळ भिक्षामागावी. किंवा मातेसमान त्याअन्यस्त्रिया असतील, त्यांपाशींही, भिक्षामागावी. मौंजीकर्माचाजोवटहोर, तावत्कालपर्यंत आमभिक्षा, ( कोरान्न ) मागावी. आणि मौंजी कर्मसमाप्तझाल्यानंतर पक्वान्न ( ओलीभिक्षा ) मागावी. गर्भिणी स्त्रियेपाशीं व्याणि विधवेपाशींभिक्षामागूनयें. याप्रमाणें " व्यासानीं " व " आश्वलायनानींही" सांगितलें आहे. आतां, याकारणास्तव

कोंकणें ( शाण्णवी ) यांच्यामध्यें प्राचीनकालापासून भवतिभिक्षांदेहि ह्मणून भिक्षामागण्याचीरूढी दिसती, यावरूनयाचें ब्राह्मणत्वानुरूप जें षट्कर्माधिकारत्व, तें निर्दोष निर्व्यभिचारलेंकरून सिद्ध होतें यांत कांहींच संशय नाहीं.

® योग्याभिवादनेश्रोत्रसमहस्तप्रसारणं॥

® कोंकणानांब्राह्मणत्वेस्थाप्यतेथत्रयोदशः १५६

अर्थ—आतां नमस्कारविधानेंकरून या सारस्वतांच्या विप्रत्वाविषयीं यातेराव्या हेतुची स्थापना करितों.

अभिवादेश्रोत्रसमंनिजहस्तप्रसारणं ॥ -

विप्रमात्रस्यगादितमन्येषामन्यदिष्यते ॥ १५६ ॥

स्वश्रोत्रपूर्वमारभ्यपाणिभ्यांजानुतोह्यधः॥

स्वगुरुंब्राह्मणश्रोत्रसमहस्तंप्रसारयेत् ॥ १५७ ॥

उदरस्यतुराजन्योवैश्योमध्यसमंततः॥

नीचैःशूद्रस्ततोन्योपितंप्रत्यभिवदेन्मुदा १५८

®इत्थंस्मृत्यर्णवग्रंथवाक्यमाकर्ण्यतामिदं ॥

® नमस्कारविधौश्रोत्रसमहस्तप्रसारणं ॥

® दृश्यतेतौहिगौडेषुब्राह्मणत्वंहिसिध्यति १५९

करावा. याप्रमाणें चारिवर्णांचे नमस्काराविधि "स्मृत्यर्णवग्रंथांमध्यें" सांगितले आहेत. तस्मात् यास्मृत्यर्णवग्रंथोक्तीवरून योग्याभिवादनाविषयीं श्रोत्रसमहस्तता, ब्राह्मणावाचून अन्यवर्णास नाहीं, असें सिद्ध होतें. आणि यागौडसारस्वतकोंकणे (शाण्णवी) ब्राह्मणामध्यें श्रोत्रसमहस्तकरून अभिवदनकरण्याची रूढी वंशपरंपरागत चालली आहे. यावरून (अभिवदनरूप यातेराच्या हेतुवरूनही) याचें ब्राह्मणत्वसिद्ध होतें. यांत काहींच संशय नाहीं.

⊛ चतुर्दशःस्थाप्यतेयगोत्रप्रवरानिर्णयात् ॥

अर्थ—आता, गोत्रप्रवर निर्णयशास्त्राधारानें याचवदाव्याहेतुची स्थापनाकरितों.

तथाप्रातिस्विकौगोत्रप्रवरावग्रजन्मना ॥
विधेतेचनविधेतेयतस्तौक्षत्रवैश्ययोः॥ १६० ॥
ननुक्षत्रविशोरस्तिगोत्रप्रवरशालिता ॥
अविप्लुतब्रह्मचर्योलक्षण्यास्त्रियमुद्वहेत्॥१६१॥
अनन्यपूर्विकाकातामसपिंडायवीयसीं ॥
अरोगिणींभ्रातृमतीमसमानार्षगोत्रजा १६२
⊛ इतिपद्यार्थविवृतौविज्ञानेश्वरसत्कृतौ ॥
○ संस्कारकतुकेचापिनंदपंडितनिर्मिते॥१६३॥
अत्रासपिंडामितिहिसार्ववर्णिकमिष्यते ॥
सकलेष्वपिवर्णेषुसापिंड्यस्यचसत्वतः १६४
तथातत्रासमानार्षगोत्रजामितियद्वच. ॥
तद्द्विजैवर्णिकपरमित्थंचप्रतिपादनात् ॥

® तस्मात्क्षत्रविशोरस्तिगोत्रप्रवरशालिता॥ १६५॥

अर्थ—तीअसीकीं, ज्याप्रमाणेंब्राह्मणवर्णांस, गोत्र, वप्रवर आहेत्, त्याप्रमाणे गोत्रप्रवरहे, क्षत्रियवैश्यांसनाहींत. आतां, येथे, अशिश काउत्पन्नहोतीकीं, गोत्रप्रवर हे क्षत्रिय वैश्यालाही आहेत. आणियावि षयीं, प्रमाण असें आहेकीं, लक्षणानीयुक्त अनन्यपूर्विकाज्याखिया (ह्म.)पूर्विकोणत्या प्रकारानेंहीं कोणींचग्रहणकेलेलीनव्हे, कांतियुक्त, निरोगी, भ्रातृमती, (जीसबधु आहेतती) सपिंडांतीलनव्हे, समानप्रवरांतील व समानगोत्रांतील नव्हे, अशाप्रकारची, व पुनर्विवाहाचीनव्हे, अशाया सातप्रकारच्या स्त्रियालेरीजकरून, सुलक्षण, वयानेंवरापेक्षांलहान, अशास्त्रिशीं विवाहकरावा. याप्रमाणे " विज्ञानेश्वराचेंवचन" आहे तसेंच " नदपंडितानेंही, सांगितलें " आहे, यातसमानप्रवर, वसमानगोत्रां तील, वसपिंडातील, नव्हे, असेंवचन आहे. आणिहेंवचन त्रैवर्णिकपर आहे ( तिघांसलागू ) तस्मात् यावचनावरून, गोत्रप्रवरहे, ब्राह्मणाप्रमाणेंच क्षत्रिय वैश्यालाही आहेत, तर यावचनावरून.

® अन्यथाक्षत्रवेश्यानामपितुल्यार्षगोत्रजा ॥
® कन्यकापरिणेयास्यादितिचेच्छृणुनिर्णयं ॥

अर्थ—क्षत्रिय वैश्यांनींही, समानगोत्रप्रवरांतीलनव्हे, अशास्त्रीशीं विवाहकरावा, ह्मणून कोणी शंका घेतील, तर, मार्गकेल्या समाधानाविषयीं निर्णय सागतों तो ऐका.

अरोगिणींभ्रातृमतीमसमानार्षगोत्रजां ॥
® इतिवाग्याज्ञवल्क्यस्यत्रैवर्णिकपराध्रुवं १६६
अत्रक्षत्रविशोरेकगोत्रप्रवरवर्जनं ॥

विवाहेयद्यपिप्रोक्तयाप्येतत्पुरोधसः॥१६७॥

अर्थ—ता अता की, अरोगिणी, याज्ञवल्क्यवचनावरून लक्ष णयुक्तस्त्रीविचार त्रैवर्णिकानीं, विवाहकरावा ह्मणून जें सांगितलें त्यांत क्षत्रियवैश्यानीं समान गोत्रप्रवरांतील स्त्रीयेचें पाणिग्रहण करूनये, कारण, यद्यपि विवाहाविषयीं शास्त्राधारसांगितला, तथापि, त्यांनीं आपले पुरोहिताचे गोत्रप्रवरवर्जावे- यास्तव सर्वप्रमाण

सतिभावेक्षत्रविशोःस्वधस्वेनकीर्तितो ॥
समानौचेद्विवाहेतोनर्जनीयाविविरफुट १६८
गुरोःसगोत्रप्रवरानोद्वाह्याक्षत्रविड्जनैः ॥
स्वगोत्रायनभिज्ञैश्चविप्राचार्यगोत्रजाः १६९

अर्थ—तें असें आहे की, सर्व क्षत्रियवैश्यास, समानगोत्रप्रवराचा शास्त्राधारलागतोखरा, परंतु यादोनवर्णांस गोत्र प्रवरहे एकएकच आहेत, यामुळें क्षत्रिय वैश्य यादोनवर्णानीं आपापल्या उपाध्यायाचे जे गोत्रप्रवर असतील तेच ग्रहणकरून यावरील शास्त्राधाराप्रमाणें विवाह करावा आता उभयकुलांतील उपाध्याय एकेकच असून स मान गोत्रप्रवर असतील, तर तेवर्जावे (विवाहकरूनये)

द्व्यामुष्यायणकाःसर्वेदत्तकक्रीतकादयः ॥
गोत्रद्वयेप्यनुद्वाह्याःशौंगशैशिरयोर्यथा॥१७०॥
यद्गोत्रप्रवरोह्येषापुरोधाजायतेत्विमे ॥
तद्गोत्रप्रवरास्तुल्यगोत्रप्रवरकास्तथा ॥१७१॥
विवाहेवर्जनीयाःस्युःक्षत्रियाणामवैश्यकाः ॥
स्वपुरोहिततोभिन्नगोत्रप्रवरकोभवेत् ॥१७२॥

एषांपुरोधसोभिन्नगोत्रप्रवरकाहितु ॥
तेविवाहेपरित्याज्याइतिनिर्णयईरितः॥ १७३ ॥
अरोगिणींभ्रातृमतींमसमानार्षगोत्रजां ॥
❀ इतिपद्यार्थविवृतौविज्ञानेश्वरसत्कृतौ ॥
❀ संस्कारकृतुकेचापिनंदपंडितनिर्मिते ॥१७४॥

अर्थ—आतां दुसरें असें आहे कीं, मुंजझाल्यानंतर, परकुलांत, दत्तकदिलेला, जोमुलगा, त्याच्या विवाहाविषयीं गोत्रप्रवरवर्ज करणें तें असें कीं, जाकुलांत उत्पन्न झाला, व हादि ज्याकुलांत दत्तक दिला, किंवा विकितकेला असेल, त्याउभयकुलाचे जे उपाध्याय असतील, त्यांचे गोत्रप्रवरवर्जावे. आणि याउभयकुलांच्या उपाध्यांयाचे जे गोत्रप्रवर त्यापासून भिन्न जे गोत्रप्रवर असतील, ते, घ्यावे. याप्रमाणे विवाहाविषयीं गोत्रप्रवरनिर्णय हे "कमलाकर" "विज्ञानेश्वर" "वस्मृतिकौस्तुभ" "स्मृतिदर्पणादिग्रथकारानीं" स्पष्टलिहीलें आहेत. आता,याउपाध्यायांचे गोत्रप्रवर हे क्षत्रियवेश्यानीं घेण्याचे कारणकाय? असी कोणी पुनः शंका घेतील, तर त्याचें कारणसांगतो.

प्रवरोयंमानवैलपौरूरवसनामकः ॥
क्षत्रियाणांचसर्वेषामेकएवनचेतरः॥ १७५ ॥
एकमेवतथागोत्रंसर्वेषामनुनामकं ॥
भालंदलोवात्सप्रसांकितेतिप्रवरस्त्वयं ॥१७६॥
तथाभालंदलंगोत्रंवैश्यानामेकमेवहि ॥
अथवाक्षत्रियविशांगोत्रंप्रवरएवच ॥ १७७ ॥

आणि याच वचनावरून क्षत्रिय वैश्यांवर व्यभिचाराची व्याप्ति घडणे, तर तीव्याप्ति क्षत्रियवैश्यांवर न घडावी; याकारणास्तव परमहंस हें विशेषण गृहण केलें. आणि याचपदावरून त्या व्यभीचाररूपव्याप्तिचें निर्बाध निराकरण होतें. तें असें कीं, यद्यपि क्षत्रियवैश्यांस पक्षांतरानें चतुर्थाश्रमपद गृहण केलें; तथापि ( मुखजानामयंधर्मो ) या वचनामध्यें विष्णुचें लिंगधारण, ( परमहंसाश्रम ) हें धारण करण्याचा अधिकार क्षत्रियवैश्यांस नाहीं, असें "दत्तात्रयपुराणाचें" "बौधायनाचें" आणि "माधवाचें" हीं वचनस्पष्ट असल्याकारणानें याहेतुचा प्रवेश क्षत्रियवैश्यांवर जात नसल्यामुळें याहेतुचें निराकरण निर्बाध निर्व्यभिचारानें करून होतें. यांत काहीं संशय नाहीं. आणि याचप्रमाणे " निर्णयसिंधूतही " सांगितलें आहे हें पाहावें.

चतुर्विधाभिक्षवस्तुविख्याताब्रह्मणोमुखात् ॥
कुटीचकोबहूदश्चहंसश्चैवतृतीयकः ॥ १९२ ॥
चतुर्थःपरमोहंसःसंज्ञाभेदैःप्रकीर्तिताः ॥
® इत्थंपितामहःप्राहचातुर्विध्यंहिभिक्षुणां ॥१९३॥

अर्थ—आतां, कुटीचकादि जे चारभेद साक्षात् ब्रह्मदेवानें आपल्यामुखानें प्रसिद्ध केले आहेत, ते, असे कीं, कुटीचक, बहूदक, हंस, आणि परमहंस, याप्रमाणें हेचारभेद " ब्रह्मदेवानें " सांगितले आहेत.

कुटीचकस्तुसन्यस्यस्वेकसद्मनिनित्यशः॥
भिक्षामादायभुंजीतसपिंडानांगृहेथवा ॥१९४॥
शिखायज्ञोपवीतीस्यात्त्रिदंडीसकमंडलुः
बहूदकश्चसन्यस्यबंधुपुत्रादिवर्जितः ॥१९५॥

सप्तागारंचरेद्भैक्ष्यंवेपःपूर्वोक्तएवहि ॥

अर्थ–आतां, संन्यासाश्रमाचे, जेचारभेदसांगितले, अनुक्रमाने त्यांचेधर्मदाखवितों. पहिलाभेद जोकुटीचक, त्याणें संन्यासग्रहणकरून आपल्या आप्तवर्गामध्यें, अथवा, सपिंडबंधूंच्या गृहामध्यें, भिक्षामागून वास करावा. आणि शिखा, यज्ञोपवीत, व तीनदंड, कमंडलू, हेधारणकरावे. बहूदकानें पूर्वोक्तवेप, ( कुटीचकाचाच ) वेपधारणकरून, बंधुपुत्रादिकांचा त्यागकरावा. आणि सातघरीं भिक्षामागूनराहावें,

शिखायज्ञोपवीतीस्यात्तुहंसःसकमंडलुः
एकंतुवैणवंदंडंधारयेन्नित्यमादरात् ॥ १९६ ॥
परहंसस्त्रिदंडंचरज्जुंगोवालनिर्मितां ॥
शिखायज्ञोपवीतंचनित्यंकर्मपरित्यजेत् ॥१९७॥
कौपीनाच्छादनंवस्त्रंकंथांशीतनिवारिणीं ॥
अक्षमालांचगृण्हीयाद्वैणवंदंडमव्रणं ॥ १९८ ॥
® इत्थंस्कंदपुराणादौचतुर्णांयतिनामपि ॥
® सम्यग्विविच्यकृत्यादिविशेपोल्पःप्रदर्शितः १९९

अर्थ–आतां, तिसराभेद जो हंस त्यास कुटीचकाच्याच वेपाप्रमाणे, वेपधारण करण्याचा अधिकार आहे. परंतु दंडमात्र एकधारणकरावा. आणि चवथा भेदजो परमहंस याणें, पुर्वोक्त त्रिभेदकर्मांचा त्यागकरून कौपीन, अच्छादनार्थवस्त्र, शीतनिवारणार्थ कथा, जपमाला, दंड, आणि कमंडलू, हेधारणकरून मधुकरी, मागूनराहावें. याप्रमाणें संन्यास भेदवधर्म "स्कंदपुराणादिग्रंथामध्यें"

विस्तारानें सांगितले आहेत. विचारकरून विस्तारभयास्तव येथें अल्पदाखविले आहेत.

सर्वसंगानिवृत्तस्यध्यानयोगरतस्यच ॥
नतस्यदहनंकार्यंनाशौचंनोदकक्रिया ॥ २०० ॥
कुटीचंकंतुप्रदहेत्पूरयेच्चबहूदकं ॥
हंसंजलेतुनिःक्षिपेत्परहंसंप्रपूरयेत् ॥ २०१ ॥
इतिस्मृत्यर्थसारेचचतुर्णामपिभिक्षुणां ॥
विभिन्नास्तनुसंस्कारासंप्रोक्ताःप्रविचार्यतां॥२०२

अर्थ—सर्वसंग परित्याग करून, ध्यान योगामध्यें रममाण होणारा जो यती, त्याचा अंतकाल प्राप्त झाल्यानंतर, त्याच्या शरीराचें दहन करूनयें. व आशौच धरूनयें. आणि तिलतर्पणादि नित्य क्रियाही, करूनयें. कुटीचक संन्याशाच्या देहाचें दहन करावें. बहूदकाचा देह भूमींत पुरावा. आणि हंसाचा देह उदकात बुडवावा. तसेंच परमहंसाचा देह भूमींत पुरावा. याप्रमाणें संन्याशांचे जे, चार भेद सांगितले. त्यांचा भेदेंकरून त्यांच्या देहाचा संस्कार करावा. याप्रमाणे "स्मृत्यर्थसारग्रंथांमध्यें" सांगितलें आहे त्याचा विचार करून पाहावें.

अतःपरमहंसस्यप्रोक्तलक्षणशालिनां ॥
काषायवस्त्रदंडादिधारिणांचमहात्मनां॥२०३॥
अस्मद्वर्गेहियतिनांबहूनांप्रसमीक्षणात्
अस्यास्तिपक्षधर्मत्वंहेतोरितिविचिंत्यतां २०४

अर्थ—आतां, संन्याशांचे धर्म याकारणास्तव सांगितले कीं, प्रदर्शित केलेल्यालक्षणानींयुक्त (काषायवस्त्र, वैणवत्रिकदंड, क-

मंडलादि ) जेसेंन्याशांचेधर्म तेमुख्यत्वेंकरून श्रुति स्मृतीनीं ब्राह्मणाविषयींच, सांगितले. त्यासर्व धर्मानीयुक्तजे, सन्याशी, ते, आमच्या वर्गांत ( सारस्वतकोंकणें ( शाण्णवी ) ब्राह्मणांत ) हजारोवर्षापासून काशीहून रामेश्वरापर्यंत प्रत्यक्षत्वानें दिसतात. त्यांत, संन्यासग्रहणहें केवळ, ब्राह्मणाचेंचकर्म होय. तस्मात् संन्यासग्रहणहें ब्राह्मणाचेंचकर्म असून तें यासारस्वतां मध्यें अनादि कालापासून चालत असल्याकारणानें, यापधराव्याहेतुवरूनहीं, षट्कर्माधिकाररूपजें पक्षधर्मत्व तें विप्रपक्षावरच राहतें. याचें चिंतनकरूनपाहावें. ह्मणजे आलेल्या भ्रमाचा नाश सत्वर होऊन स्वरूपांतचबोध होईल. यांत कांहीं संशय नाहीं.

⊛ वैदिकःश्राद्धभोक्तृत्वंहेतुःषोडशईयंते ॥

⊛ वैदिकःश्राद्धभोक्तृत्वंविप्रस्यैवोदितंयतः २०५

अर्थ—आतां, श्राद्धभोक्तृत्वेंकरून यासोळाव्या हेतुची स्थापनाकरितों. ती अशी कीं, श्राद्धांतभोजनकरणेंहें, केवळ ब्राह्मणाचेंच कर्महोय. क्षत्रियवैश्य हे श्राद्धसबंधीं भोजनार्ह नाहींत. (ह्म०) योग्यनसून त्यांस अधिकारही नाहीं हें खालीलिहिलेल्याप्रमाणावरून पाहा.

ब्रह्मचर्यस्थितोनैकमन्नमद्यादनापदि ॥

ब्राह्मणःकाममश्नीयाच्छ्राद्धेव्रतमपीडयन् ॥२०६

⊛ इतिश्रीयाज्ञवल्क्योक्तोब्राह्मणग्रहणंत्विह ॥

⊛ क्षत्रियादेःश्राद्धभुक्तिर्युदासायेवनान्यथा ॥ २०७

अर्थ—ब्रह्मचर्य व्रताचाआश्रयकरून, शरीरास व्याध्यादिक, आपत्तिजर नाहींत, तर, भिक्षेवांचून, एकाकडिल अन्न भक्षणकरूनयें. परंतु, त्याब्रह्मचाऱ्यास श्राद्धभोजनाविषयीं, आमंत्रणकेलेंआहे; तर

केवळ ब्राह्मणवर्णस्थ ब्रह्मचाऱ्यानेंमात्र जावें. परंतु भोजनकालीं, मधुमांसादिक पदार्थ भक्षणकरूंनयेत. कारण या भक्षणानें ब्रह्मचर्य व्र ताचा भंग होतो आता, यास्मृतिवचनात, ब्राह्मण पदार्थच गृ हणकेले ह्मणून कोणिशंकाघेतील तर असें आहे कीं, क्षत्रियवै श्य याद्दोनवर्णांतील ब्रह्मचारिहे श्राद्धासभोजनार्ह नाहीत. आणि ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यास, श्राद्धभोजनाविषयीं एकान्नदोष नाहीं. या प्रमाणें " याज्ञवल्क्य स्मृतिवचन " आहे.

भैक्षेणवर्तयेन्नित्यन्नैकान्नादीभवेद्व्रती ॥
भैक्षेणव्रतिनोवृत्तिरुपवाससमास्मृता ॥ २०८ ॥
व्रतवद्देवदैवत्येपित्र्येकर्मण्यथर्षिवत् ॥
काममभ्यर्थितोश्नीयाद्व्रतमस्यनलुप्यते॥ २१९ ॥

अर्थ—ब्रह्मचर्यानें व्रतस्थ राहून भिक्षामागून उदर निर्वाह करावा. केवळ एकान्न भक्षण करूंनये. कारण एकान्न भक्षण केलेंअसता, दोषी होऊन व्रताचा भंग होतो. आणि भिक्षान्न भक्षण केलेंअसता उपवासापासून, जेंफल प्राप्तहोतें, तें फल भिक्षाभक्षणेकरून होतें. आणि देवकृत्य किंवा, पितृकर्म, याविषयीं, ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याला, आमंत्रण केलें असता, त्यानें, मधुमांसावाचून, अन्यपदार्थ, यथेच्छ भक्षण करावें. याक्रमानें, श्राधसंबधी, ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यानें, भोजन केलें असता, व्रतभंग होत नाही.

ब्राह्मणस्यैवकर्मैतदुपदिष्टंमनीषिभिः
राजन्यवैश्ययोस्त्वेवंनैतत्कर्मविधीयते ॥ २१० ॥
कर्मनिष्ठास्तपोनिष्ठापञ्चाग्निब्रह्मचारिणः ॥
पितृमातृपराश्चैवब्राह्मणाश्राद्धसंपदे ॥ २११ ॥

⊛ इत्थंहियाज्ञवल्क्योक्तिविचारेक्षत्रियादयः ॥
⊛ नेतिविज्ञानेश्वरेणतट्टीकायांविनिश्चितं ॥२१२॥
⊛ पराशरस्मृतेःप्रोक्तंटीकायांमाधवेनच ॥
⊛ स्मृतिकौस्तुभपूर्वेपुग्रंथेष्वप्येवमीरितं ॥ २१३ ॥
⊛ इत्थंहिसर्वहेतूनांविचारेणविलोकनात् ॥
⊛ पंचावयववाक्यैश्चब्राह्मणत्वंहिस्थापितं ॥२१४॥
⊛ अस्यस्फुटावलोकेनसम्यक्बोधोभवेत्खलु ॥
॥ अतःकोंकणविप्राणांब्राह्मणत्वंहिसिध्यति ॥२१५

अर्थ—आतां, ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य यातीन वर्णास भिक्षाचरणहें उक्त असून एकान्नश्राध्भोजनहें, केवळ, ब्राह्मणावांचून अन्यवर्णास (क्षत्रियवैश्य) या दोनवर्णास श्राधभोजनाचा अधिकार नाहीं. आणि कर्माच्याठिकाणीं निष्टाठेयणारे ब्रह्मकर्मांत मत्पर) तपोनिष्ट, गार्हपत्यादि पंचाग्निते ग्रहणकरणारे, ब्रह्मचारी, व मातापितरावर भक्ति ठेवणारे, याप्रकारचे जेश्रेष्ट ब्राह्मण त्यांस, श्राधात आमंत्रण करावें. आणि त्यांपासून श्राधकर्म यथासांग होतें याप्रमाणें "याज्ञवल्क्यानें" सांगून क्षत्रियादिक श्राधोपयोगी नाहींत असें "विज्ञानेश्वरानेंही" आपल्या टिकेत सांगितलें आहे आणि याच प्रमाणें, "पराशर, माधव, मनु व स्मृतिकौस्तुभादि "ग्रंथकारानींही, यावरील दोनवचनाचें, स्पष्टीकरण केलें आहे. त्याचा विचार करावा. आतां यावरीलसर्व वचनावरून इतकेंचसिध होतें कीं, श्राध भोजनाचा अधिकार हा ब्राह्मणावांचून अन्यवर्णास (क्षत्रिय, वैश्य) या दोन वर्णास नाहीं असें स्पष्ट दिसतें. आणि श्राध भोजन हें

केवळ ब्राह्मणांचेंच कर्म असून तें या सारस्वत कौंकणें ब्राह्मणांमध्यें प्राचीन काळापासून सांप्रत काळापर्यंत निर्बाध पणानें प्रत्यक्षतें करून चालत आहे. आणि या चाळीस श्राद्धापर्यंत कोणीच निषेधकरून हिचा त्याग केला नाहीं. तस्मात् या श्राद्धभोजन रूप. शास्त्राधारावरूनही, यजनादि षट्कर्मत्वानुरूप जें यतधर्मत्व तें या सारस्वतांमध्येंच रत असल्या कारणानें यांचें ब्राह्मणत्वानुरूप जें षट्कर्माधिकारत्व तें, निर्बाध निर्व्यभिचारत्वें करून सिद्ध होत असल्यामुळें विमतहे षट्कर्मार्ह निश्चयें करूनच आहेत यांतकाहीं संशय नाहीं.

आतां पूर्व प्रकरणांत ह्मणजे अनुमानप्रकरणांत दिल्हेले जे सोळाहेतु ते या तिसऱ्या प्रकरणांत क्रमवानुसारश्रुति स्मृत्योक्त प्रमाणें देऊन ईश्वरीदत्त सदसत् प्रेरणेवरून पंचावयवन्यायानें या षोडशहेतूंची स्थापना सारस्वत कौंकणें (ह्म०) शाणवी यांच्या षट्कर्माधिकारत्वाविषयीं चव्हीस षोडशसंस्कारकर्मांच्या आधारावरून स्थापिले आहेत. आणि या स्थापन केलेल्या षोडश हेतूंच्या स्पष्टावलोकनानें आलेल्या भ्रांतिची शांती होऊन वादीच्यामनास सद्बोध होईल असी मी पूर्ण आशा करितों.

इतिकेण्योपाव्हनारायणसूनुलक्ष्मणविरचिते श्रीमद्दशप्रकरणेहेतुस्थापनंनामतृतीयप्रकरणंसमाप्तं



# प्रकरण चवथें.



॥ अथनत्वारमानाथंसर्वविघ्नोपशांतये ॥
वृत्तिभेदैःप्रकरणंचतुर्थंक्रियतेमया ॥ १ ॥

अर्थ—आतां, सर्व विघ्नाची शांती होऊन, ग्रंथ सिद्धीस्हावी, एतदर्थ, श्रीलक्ष्मीपती वेंकटेशभगवान् जो त्याप्रत, नमस्कार करून, वृत्तिभेदानें हें चवथें प्रकरण करण्यास मी प्रारंभ करितों.

॥ अधुनाचित्तपूतानांसम्यक्ज्ञानंनजायते ॥
अतोस्मद्वृत्तिभेदेनह्येपभावोत्रदर्शितः ॥ २ ॥

अर्थ—आतां पूर्वी प्रदर्शित केलेले षोडशदेत्यानुरूप जे शास्त्राधार, त्यांवरून, अद्यापपर्यंत चित्तपावनादिकांच्या मनाची उत्तमप्रकारें करून शांती झाली नाहीं. ह्मणून आमच्या सारस्वतांवर वृत्तीच्या योगानें पुनः दोष स्थापितात्. तो असा कीं,

॥ अस्मदीयजनाःकेचिद्वैश्यवृत्तिंचरंतिहि ॥
॥ तेनवैश्यत्वमस्माकंस्थापितंपूर्वपक्षिणा ॥
॥ सादरंशृणुमद्वाक्यमेतद्दिपयखंडनं ॥ ३ ॥

अर्थ—अस्मदीय ह्मणजे सारस्वत कोंकणी ब्राह्मण यांच्या मध्यें कांहीं लोक व्यापार करितात ह्मणून त्या व्यापाराच्या योगानें सारस्वत हे वैश्य, आहेत्, असें चित्तपावनादिकांचे बोलण्याचा भावार्थ दिसतो; परंतु या दर्शविलेल्या दोषाच्या खंडनाविषयीं मी कांहीं वाक्यें सांगतों तीं श्रवण करा.

असें जाणावा. याप्रमाणें "निर्नीशास्त्र" आहे. तर, प्रथमतः चित्तपावनादिकांनीं यावचनाचें उत्तमप्रकारें करून अवलोकन करावें नंतर आमच्या पक्षावर ( सारस्वतांवर ) दृष्टी द्यावी.

तात्पर्य काय? इंद्रियनिग्रहावांचून तपजसेंव्यर्थ आहे, तसें चित्तपावनादिकानीं आपल्याचा भयंकर तीन वृत्तींचा विचार केल्यावांचून सारस्वतांचा दोष दर्शविणें हें, केवळ, बंधा मैथुनवत् आहे, असें जाणावें.

® आपद्वृत्तोनिषेधश्चदर्शितोयःकलौयुगे ॥
® तस्यापिपरिहारस्तुश्रूयतामुच्यतेमया ॥ ११ ॥
® अस्माकंवैश्यवृत्तिर्याविहितासाकलावपि ॥
® परंक्षत्रादिवृत्तिर्वायानिषिद्धाहिंसाकलौ ॥ १२ ॥

अर्थ—अरूक आतां या चित्तपावनानीं कलियुगांत आपद्वृत्ति-विषयीं जो निषेध दाखविला, त्याचाहि परिहार मी सांगतों तो श्रवण करा. तो असा कीं, यद्यपि या चित्तपावनादिकानीं वैश्य वृत्तिविषयीं निषेध दाखविला; तथापि, तीच वैश्यवृत्ती, या कलियुगांत ब्राह्मणास प्रशस्त सांगितली आहे, तस्मात् ति वैश्यवृत्ती धर्म शास्त्रानुमोदित असल्याकारणानें, सारस्वतांस तिविहीत आहे. परंतु. शस्त्रास्त्रधारणकरून युद्धांत शत्रूंचा पराभव करण्याची जी, क्षत्रिय वृत्ती; ती या कलियुगांमध्यें; ब्राह्मणांस निंद्य असी सांगितली आहे. तसेंच, वैश्यालाही, निंद्य, असे जे क्षिरादिविक्रयकरणें ( व नीच वृत्ति ) शेवादिकरणें व नांगरणें हें ही ब्राह्मणास निंद्य असें सांगितलें आहे. तस्मात् या अती निंद्य तीन वृत्तिपेक्षां व्यापार हा श्रेष्ट आहे. तो कशावरून? तर त्याविषयीं प्रमाणें सांगतों.

ऋतामृताभ्यांजीवेतमृतेनप्रमृतेनवा ॥
सत्यानृताभ्यांजीवेतनश्ववृत्याकथंचन ॥ १३ ॥
ऋतमुंछशिलंप्रोक्तममृतंस्यादयाचितं ॥
मृतंतुनित्ययांचास्यात्प्रमृतंकर्षणंस्मृतं ॥ १४ ॥
सत्यानृतंतुवाणिज्यंश्ववृत्तिर्नीचसेवनं ॥
वर्जयेत्तांसदाविप्रोराजन्यश्चजुगुप्सितां ॥ १५ ॥
⊛ इत्थंमहाभागवतेनारदेनमहर्षिणा ॥
⊛ ब्राह्मणस्याहिवाणिज्यंवृत्तिरुक्ताविचार्यतां ॥ १६ ॥

अर्थ—तीं असिकी, ऋत ह्मणजे उंच्छशीलवृतीकरून जीवन करणें, अमृत ( याचना केल्यावांचून ) जीवन करणें, मृत ( भिक्षामागून ) जीवन करणें, प्रमृत ( कृषिकर्मादिकेंकरून जीवन करणें, सत्यानृत (वाणिज्य)(क्ष०) व्यापारादिकेंकरून जीवन करणें, अशा या वृत्तीनीं, ब्राह्मणानीं उपजीविका करावी. परतु श्ववृत्ती ( सेवन ) हें ब्राह्मण आणि क्षत्रिय या उभयतांस निंद्य सांगितल्या कारणानें, शैवावृत्ति ही निरंतर वर्ज करावी. याप्रमाणें "श्रीमद्भागवतांमध्यें नारद ऋषीनें" ब्राह्मणास वैश्य वृत्तीउक्त सांगितली आहे त्याचा विचार करावा. यास दुसरें प्रमाण.

अद्रोहेणैवभूतानामल्पद्रोहेणवापुनः ॥
यावृत्तिस्तांसमास्थायविप्रोजीवेदनापदि॥ १७॥
यात्रामात्रप्रसिध्यर्थंस्वैःकर्मभिरगर्हितैः ॥
अक्लेशेनशरीरस्यकुर्वीतधनसंचयं ॥ १८ ॥

अर्थ—तें असें कीं, प्राणि मात्राचा द्रोह केल्यावांचून, किंवा,

अन्य द्रोह करून, जी वृत्ति ब्राह्मणांस योग्य सांगितली, तिनें करून आपत्काल नाहीं, अशा प्रसंगीं त्या वृत्तिनें उपजीविका करावी आता, माहा यागादिक सिद्ध व्हाव्या एतदर्थ शरीरास क्लेश होऊन अशा वृत्तिनें धन संचय करावा.

ऋतामृताभ्यांजीवेत्तुमृतेनप्रमृतेनवा ॥
सत्यानृताभ्यामपिवानश्ववृत्याकदाचन ॥२०॥
ऋतमुंच्छशिलंज्ञेयममृतंस्यादयाचितं ॥
मृतंतुयाचितंभैक्षंप्रमृतंकर्षणंस्मृतं ॥ २१ ॥
सत्यानृतंतुवाणिज्यंतेनचैवापिजीव्यते ॥
सेवाश्ववृत्तिराख्यातातस्मात्तांपरिवर्जयेत्॥ २२ ॥

अर्थ—या वचनाचा अर्थ मागें दर्शविलेल्या भागवतोक्ति प्रमाणेंच आहे. विशेष लिहिण्याचें कारण, या कलींत, वाणिज्यवृत्ति ही ब्राह्मणास प्रशस्त आहे, हा तात्पर्यार्थ जाणावा. परंतु श्ववृत्ती, (निचसेवन करूनयें ) आतां, हिवाणिज्यवृत्तिकसी आहे. ति सांगतों.

कुशूलधान्यकोवास्यात्कुंभीधान्यकएववा ॥
त्र्यहैहिकोवापिभवेदश्वस्तनिकएववा ॥ २३॥
चतुर्णामपिचैतेषांद्विजानांगृहमेधिनां ॥
ज्यायान्परःपरोज्ञेयोधर्मतोलोकजित्तमः ॥२४॥
षट्कर्मकोभवत्येषांत्रिभिरन्यःप्रवर्तते ॥
द्वाभ्यामेकश्चतुर्थस्तुब्रह्मसत्रेणजीवति ॥२५॥
वर्तयंश्वशिलोंच्छाभ्यामग्निहोत्रपरायणः ॥
इष्टीःपार्वयनांतीयाःकेवलानिर्वपेत्सदा ॥२६॥

अर्थ—तीं असी कीं, कुशूलधान्यक, कुंभीधान्यक, त्र्यहैहीक, आणि अश्वस्तनिक असे हे ब्राह्मणाचे चारभेदसांगितले आहेत. ते असे कीं, कुशूलधान्यक, ह्मणजे. तीनवर्षांपासून अधिक, भृत्यवर्गाचे पालन करण्यास उपयुक्त धन ज्यापासीं आहे, तोकुशूलधान्यक असें समजावा. आतां, गोविंदराजाच्या मताप्रमाणें, १२ दिवसांपर्यंत, पोषणकरण्यास धन ज्या ब्राह्मणापासीं आहे; तो हि कुशूल धान्यक असें जाणावा. आतां, कुंभी धान्यक (ह्म० ) एक वर्षपर्यंत कुटुंब पालन करण्यापुर्ते धन ज्यापासीं तो कुंभीधान्यक. गोविंदराजाच्या मता प्रमाणें ६ दिवसांपुर्ते, तो कुंभी धान्यक. त्र्यहैहीक (ह्म०) तीन दिवसांपुर्तेच अन्न ज्यापासीं आहे तोत्र्यहैहीक जाणावा. आतां अश्वस्तानिक (ह्म० ) एकच दिवस पोषण करण्यापुर्ते अन्न ज्यापासीं, तो अश्वस्तनीकजाणावा. याप्रमाणें कुशूलादिकें करून ब्राह्मणाचे, जे चार भेद सांगितले, त्यामध्यें, उत्तरोत्तर श्रेष्ठ जाणावे. (ह्म० ) कुशूलधन्यकापेक्षां कुंभीधान्यकश्रेष्ठ कुंभी धान्यकापेक्षां, त्र्यहैहीक, आणि या तीघांपेक्षां, अश्वस्तनीक श्रेष्ठ जाणावा. कारण, या तीघांजवळ धन संचय पुष्कळ असल्याकारणानें, क्षणे क्षणे, ईश्वराचें स्मरण होत नाहीं. आणि अश्वस्तनीकापासीं धन संचयनसून, अल्प द्रव्याच्या लोभास्तव, पदोपदीं, ईश्वर स्मरीत असतो, ह्मणून, तो सर्वांत श्रेष्ठ जाणावा. याप्रमाणें, कुशूलादिकांचे, भेद सांगितले. आतां यांचे कर्मभेद सांगतों. तेअसे कीं, कुशूलधान्यकजोआहे तो, उंच्छशील (धान्यादिकवेचूनखाणें ) अयाचित, ( भिक्षामागल्यावांचून ) भैक्ष, (भिक्षामागणें ) कृषी, ( शेतकीकरणें ) वाणिज्य, ( व्यापारकरणें ) कुसीद[१] ( व्याजबट्टाकरणें ) असायासाह्यावृत्तीनीं निर्वाहकरितो, तोषट्कर्माहोतो.

---

१- कुशीदको वार्धषक इत्यमरः

आतां कुंभीधान्यकजो आहेतो, याजन (यज्ञकरविणें) अध्यापन, (वेदपढविणें) यातीनकर्मेकरूननिर्वाहजो करितो तो, कुंभीधान्यक जाणावा. त्र्यैहैहीकहा, अध्यापन (वेदपढविणें) आणि याजन यादोनकर्मावरून उपजीविकाकरितो, ह्मणूनतो, त्र्यैहैहीक जाणावा. आणि अश्वस्तनीकजोआहे तो, केवळ, अध्यापनानेंच, निर्वाहक-रितो, ह्मणून तो अश्वस्तनीकजाणावा. आतां, अश्वस्तनीकाचादु-सराप्रकार असा आहे कीं, शिलोंच्छवृत्तिने अग्निहोत्रसंभाळून, दर्श-पौर्णमास्यादिइष्टीमात्रकरितो, कारण, द्रव्यनसूनविशेषकर्मकरण्याची शक्तिनसल्याकारणानें. याप्रमाणें कुशूलादिकांचे भेदवकर्मे आहेत आता दुसरें असें आहे कीं.

नलोकवृत्तंवर्तेतवृत्तिहेतोःकथंचन ॥
अजिह्मामशठांशुद्धांजीवेद्ब्राह्मणजीविकां २१
इत्थंहिमनुनावैश्यवृत्तिर्विप्रस्यभाषिता ॥
गुणांस्तथापद्धर्मांश्चविप्रादीनामिमांच्छृणु ॥२२॥

अर्थ—ब्राह्मणानीं, उदरनिर्वाहार्थ, नानाप्रकारच्या दंतकथा, यज्ञ, इत्यादिकदु:सर्गेकरून, उपजीविकाकरूनयें. तर, अजिह्मा, (या-परहीन) असी व अशठा, (दैभादिकपटेंकरूनशून्य) शुद्ध (अ-न्यवृत्तिनेंमिश्रितनाहीं) असीजी, ब्राह्मणवृत्ती, त्यावृत्तीनें, उप जीविकाकरावी. याप्रमाणें "मनुनें" ब्राह्मणासवैश्यवृत्तीही प्रशस्त सांगितली आहे. आतां ब्राह्मणादिकाचे आपद्धर्मसांगतों.

क्षात्रंकर्मद्विजस्योक्तंवैश्यकर्मतथापदि ॥

---

१. या भावार्थानें चित्तपावनादिकांनी शंका घेतली असेल तर साज सकले.

राजन्यस्यचवैश्योक्तंशूद्रकर्मनचैतयोः ॥२३॥
सामार्थेसतितत्याज्यमुभाभ्यामापिपार्थिव ॥
तदेवापदिकर्तव्यंनकुर्यात्कर्मसंकरं ॥
⊛ इतिविष्णुपुराणेहिवैश्यकर्मापदिस्मृतं २४ ॥

अर्थ—ब्राह्मणाला, आपत्कालीं, क्षत्रवृत्ती आणि वैश्यवृत्ती, यादोनींउक्त आहेत. तसेंच, क्षत्रियालाही, आपत्कालीं वैश्यवृत्ती, योग्यजाणावी. परंतु, शेवावृत्तीजीआहे ती, यद्यपी आपत्कालप्राप्तझाला तथापी, वरदर्शविलेल्या दोनचवृत्त्याकराव्या. परंतु शूद्रवृत्ती करूनये. याप्रमाणें या "विष्णुपुराणोक्ति" वरूनही, वैश्यवृत्तीब्राह्मणानींकरावी- असें सिद्धहोतें. तस्मात्,

⊛ ब्राह्मणस्याप्यतोवैश्यवृत्तिर्हिविहिताध्रुवं ॥
● ननुक्षत्रादिवृत्तिश्चविप्रस्यविपदीरिता॥
⊛ [illegible] ॥२५॥

अर्थ— [illegible] असें सिद्ध होतें. खरें, परंतु, येथें असी शंकाउत्पन्न होतें कीं, ब्राह्मणानीं वैश्यवृत्तिही आपत्कालीं करावी ह्मणून शास्त्राधार देऊन जसें वैश्यवृत्ती सिद्धकेली, तसीचक्षत्रवृत्तीही ब्राह्मणानीं आपत्कालीं करावी- असें यावरदर्शविल्याच शास्त्राधारावरून सिद्धहोतें, आणि ति प्रसिद्ध- आहे ह्मणून. येथेंकोणि शंका घेतील, तर, त्याशंकेचें समाधान सांगतो तें श्रवणकरा.

---

१. शूद्रवृत्ती (त्रिवर्णाची शेवा करणें) तीतर या चित्पावनामध्यें प्रत्यक्ष चालती. आणि याविषयीं "परशुरामाचें" वचन आहे, तें सातव्या प्रकरणांत पाहा. ह्मणजे हे कोण, तें समजेल.

वैश्यक्षत्रियवृत्तीद्वेविप्राणामापदिस्मृते ॥

आपद्वृत्तिर्द्विजाग्र्याणामश्वस्तनिकतातथा २६।

⊛ वाक्यवृत्तिनिषेधोपिक्षत्रवृत्तिकरोभवेत् ॥

⊛ नवैश्यवृत्तिविषयइत्येतन्मुनिसंमतं ॥ २७ ॥

अर्थ–तें असें कीं, वैश्य, आणि क्षत्र, यादोनींवृत्त्या, आपत्कालीं ब्राह्मणासमागितल्याआहेत, परतु वैश्यवृत्तीजीआहेती, अश्वस्तनीकवत् (श्रेष्ठ) सांगितली आहे. आणि या, अश्वस्तनीकवृत्तिच्या श्रेष्ठपणाविषयीं, पूर्वींदर्शविलेल्या मनुवचनांतच विस्तार केला आहे. पुन बाहुल्यतेची, अवश्यकता दिसत नाहीं. आता वाक्यैकत्वजोनिषेध सांगितला, तो केवळक्षत्रवृत्तीविषयींचसांगितला आहे. परतु वैश्यवृत्तीविषयीं सांगितला नाहीं. कारण, या वैश्यवृत्तीविषयीं, प्रत्यक्षप्रमाणे सांगतों.

ब्राह्मणोवृत्तिहीनश्चेद्वैश्यवृत्तिंसमाचरेत् ॥

नीचसेवांनकुर्वीतब्राह्मण्यंहीयतेयथा ॥

⊛ इत्यर्थस्कंदपुराणेपिविस्पष्टमवलोक्यता ॥ २८ ॥

अर्थ–तें असें कीं, ब्राह्मणजरवृत्तिहीन आहे, तरत्यानें वैश्य वृत्तीकरावी, परतु नीचसेवाकरूनयें. कारण, नीचसेवाकेल्यानें असतां, ब्राह्मणत्वासहानीयेते. जसी नीचसेवेच्यायोगानें, ब्राह्मणत्वाला हानीयेती, तसीवैश्यवृत्तीनेंयेतनाहीं. याप्रमाणें "स्कंदपुराणांत" सांगितलें आहे तेंपाहावें दुसरेंप्रमाण.

दुर्भिक्षेमरणेप्राप्तेतथैवाधकलौयुगे ॥

ब्राह्मणोवृत्तिहीनस्तुवैश्यवृत्तिंसमाचरेत् ॥

⊛ इत्थंपद्मपुराणोक्तिसावधानंविचिंत्यता ॥

⊙ अतःकलौब्राह्मणस्यवैश्यवृत्तिर्मुनीरिता ॥२९ ॥

अर्थ—दुर्भिक्ष, मरण, आणि कली, यातीनकालामध्ये, ब्राह्मणजर-वृत्तिहीन आहे, तर, त्याणें वैश्यवृत्ती आचरणकरावी. असें "प-द्मपुराणोक्तवचन" आहे त्याचें चिंतनकरावें. तस्मात् याकलि-युगामध्यें वैश्यवृत्तीही ब्राह्मणास प्रशस्त आहे असें सर्व ऋषींचेंसंमत-दिसतें. २९ परंतु मार्गशीर्षकार्येनस्ती, त्याशंकेचें समाधान या-पुढीलवचनानकरूनहोईल असेल. कदाचित् नझाल्यास पुनःनिवारणार्थ प्रमाणेंसांगतों तेणेंकरून क्षत्रादिवृत्ती, कां, करूनयें याचाबोध उत्तम-प्रकारेंकरून होईल.

कृषिगोरक्षमास्थायजीवेद्वैश्यस्यजीविकां ॥
वैश्यवृत्त्यापिजीवंस्तुब्राह्मणःक्षत्रियोपिवा॥३०॥
हिंसाप्रायांपराधीनांकृषिंयत्नेनवर्जयेत् ॥
कृषिसाध्वितिमन्यंतेसावृत्तिःसद्विगर्हिता॥ ३१
भूमिंभूमिशयांश्चैवहंतिकाष्ठमयोमुखं ॥
⊙ इत्याद्यनेकवचनैर्मनोःस्वायंभुवस्यच ॥
⊙ अतःकलौब्राह्मणानांवैश्यवृत्तिःप्रशस्यते॥३२॥

अर्थ—जो अशीं कीं ब्राह्मण आणि क्षत्रिय याउभतानीं कृषी, (शेतकी) आणि गोरक्ष, (पशुपालन) यादोनवृत्तिचा आश्रय-करून, ह्मणजे रातानकरितां, फक्त अधिकारमात्रठेऊन, वैश्यवृत्ती-नेंजीवन करावें. परंतु, हिंसाप्राय असून, पराधीन, असीजी शे-तकी, ती, ब्राह्मणानींसर्वथाकरूनयें. आतां कांहींलोक शेतकीही, चांगली आहे. असें ह्मणतातते, खरें परंतु, साधूंनीं शेतकीहीनिंद्य-सांगितली आहे. ती असी कीं अधोमुखकाष्ठकरून ह्मणजे नांगर-

त्यादिकेंकरून, प्राणिमात्राचानाशहोतो, ह्मणून, ब्राह्मणानीं शेतकीही, मयनेंकरूनवर्जकरावी. असें " यास्वार्थंप्रमनुवचनावरून " सिद्ध होतें. तस्मात्ब्राह्मणानीं वैश्यवृत्तीचकरावी, कृष्यादिकवृत्तीसर्वथा करूनयें. आणि कृषिकर्मानिषयीं श्रुतिप्रमाण.

हलांतंब्रह्मवर्जंसमितिश्रुतिः ॥
सर्वेषामपिपापानापापमेकंमहत्तरं ॥
लागलाकर्षणंराजन्महापापंप्रकीर्तितं ॥३३॥
यःसदाकर्षतेमूर्खोब्राह्मणोभ्रूणहाहिसः ॥
देवाःपितृगणाविप्रास्तथागंधर्वचारणाः ॥३४॥
हलकर्मप्रकुर्वाणंतथालक्ष्मीपतिःप्रभुः ॥
शेपुस्तेतुसमुद्वीक्ष्यनिर्भाग्योभवनारकी ॥ ३५ ॥
युष्मत्कुलप्रसूतायेसर्वकर्मवहिष्कृताः ॥
दरिद्राअंगहीनाश्चसदासंतानवर्जिताः ॥ ३६ ॥
बंधुभिःसंपरित्यक्तागंतारोनरकंध्रुवं ॥
एवंशेपुःपूर्वकालेस्वस्वधामययुस्तदा ॥ ३७ ॥
तस्मात्सर्वेषुकालेषुकार्षियत्नेनवर्जयेत् ॥
@ इत्थंहिशेषधर्मोपिवचनैश्चविरुध्यता ॥ ३८ ॥

अर्थ.—तें असेंकीं, ब्राह्मणास हलकर्म, (नांगरधरून, स्वतां नांगरणें हें निरंतर वर्ज सांगितलेंआहे. आणि हे राजन्, सर्व पाप मध्ये, लांगलाकर्षण (नांगरणें) हें मोठें पाप सांगितलें आहे. तें असेंकीं, स्वता नांगर धरून, नांगरणारा जोब्राह्मण, तो, या नांगरण्याच्या योगानें, भ्रूणहत्येस, (गर्भपाताचे पातकास) पात्र

होतो. आणि याप्रमाणे, हल्कर्म करणारा जो ब्राह्मण, त्याप्रत, अवलोकन करून, देव, पितर, ऋषी, गंधर्व, चारण, सिद्ध, तसेच, लक्ष्मीपतीभगवानादि करून सर्व, त्याहल्कर्म करणाऱ्या ब्राह्मणास पाहून शाप देतात, तो असाकीं, तू मात्सरहीत होऊन नरकासजा-व तुझ्या कुलामध्यें जे उत्पन्न होतील, ते सर्वकर्मांत बहिष्कृत, दरिद्री, अंगहीन, संतानरहित, वधुर्नीटाकलेले, आणि नरकास योग्य, असें होतील. याप्रमाणें त्या हल्कर्म करणाऱ्या ब्राह्मणास शाप देऊन, देवादिकसर्व आपापल्या, स्वस्थानाप्रत जाते झाले, तस्मात् कृपीकर्महें निरंतर प्रयत्नें करून ब्राह्मणानीं वर्जावें. याप्रमाणे, "हरिश्चंद्र शेषधर्मवचन हें केवळकृपीविषयींच विरुद्धआहे. परंतु वैश्यवृत्तीविषयीं विरुद्ध नाहीं. आणि असीं हीं विरुद्ध वचनें प्रत्यक्ष असताहीं त्याकडे नपाहता कृपीकर्म करितात्, अहो ! कैवर्तवत्रस्थचित्तपावनहो ! या सर्व वचनावरून, तुमच्या पंक्त्यैक्य भोजनकरणारे लोकास निर्दोषी ह्मणावें काय ? तर येथें कोणि शंका घेतील.

❀ कृपिकर्तव्यतोकीनांभवेद्देवेतिचेच्छ्रणु ॥

❀ स्वयंकृताभिप्रायत्वात्तेषानैवविरुत्यता ॥ ३९ ॥

तस्मात् या शेष धर्म वचनांवरून ही, स्वतां केल्यासच दोषास पात्र होतो. परंतु दोघांकडून करविल्यास दोषी होतनाहीं असें सिद्ध होत असून उभयप्रमाणाची एकवाक्यता होत असल्याकारणानें, या शंकेचे निर्बाध निराकरण कृषिगोरक्षमास्थाय या वचनावरून होतें. असें जर ह्मणावें तर निराकरण होत नसून पुनः शंकायेती.

स्वयंवाकर्पणंकुर्याद्वाणिज्यंवाकुसीदकं ॥
कष्टापापियसोवृत्तिकुशीदंतांविवर्जयेत् ॥
७ इत्थंकूर्मपुराणेहिकृषिवृत्तिःप्रशस्यते ॥ ४० ॥

अर्थ.—तें असेंकीं, स्वतांकर्षण करू नये, ह्मणून जें सांगितलें, त्या वाक्यांस या कूर्म पुराणोक्तिवरून दोष येतो. तो असाकीं, या कूर्म पुराणोक्तिवरून, स्वतां कर्षणकरावें, ह्मणजे स्वतां नांगरावें; तसेंच वाणिज्य, (व्यापार) आणि कुसीद, (व्याजवट्टा) इत्यादि यातीर्नीवृत्या स्वतां कराव्या, असें सिद्ध होतें, परंतु कुसीद, (व्याजवट्टा) करून निर्वाह करू नये. कारण, ती वृत्ती पापभूत, असल्याकारणानें, निरंतर ती वर्जावी. आणि कृषी, हीनेंच¹ निर्वाह करावा. असें या "कूर्मपुराणावरून" स्पष्ट दिसतें. तस्मात्, या वचनावरून कृषी करावी यात दोष नाहीं ह्मणून कोणि वाद घेतील तर असें आहेकीं,

७ ननुकारयितुस्वंचात्रिपाद्विपयमेवहि ॥
७ कृषीर्हिवैश्यधर्मत्वाद्विप्रस्यापदिसोदिता ४१ ॥

---

१ चित्तपावनादिकांमध्यें स्वतां नांगर धरण्याची रूढी तर प्रत्यक्ष दिसती. त्यांत मुख्यनेंकरून शास्त्रीय ह्मणविणारेच धरितात मग इतरांची काय कथा.

**अर्थ.**— हलकर्म सता करावें, ह्मणून सांगितलें तें खरें, परंतु केव्हा? आपत्कालींकरावें. असें मार्गेच प्रदर्शीत केलें आहे. तस्मात् ब्राह्मणास कृषीही, अत्यंत आपत्कालींच सांगितली. परंतु वैश्यवृत्ती ही, अत्यंत आपत्कालींच करावी असें सांगितलें नाहीं यावरून वैश्यवृत्ती करावी. परंतु क्षत्रादिवृत्ती करूं नये. असें सिद्ध होतें कारण,

आपद्वृत्तिर्द्विजाग्र्याणामितितस्यनिषेधतः॥
यस्तुकार्तयुगोधर्मोनकर्तव्यःकलौयुगे ॥ ४२ ॥
इत्यादित्यपुराणोक्तेःक्षत्रवृत्तिःकलौनहि ॥
विधवायाप्रजोत्पत्तौदेवरस्यानियोजनं ॥

⊛ इत्यादीनानिपिधानाकलौस्याद्व्यर्थतान्यथा ४३

**अर्थ**—ब्राह्मणास आपत्कालीं क्षत्रीय वैश्य, इत्यादि वृत्याउक्त सांगितल्या खन्या, परंतु या कलीयुगामध्यें, फक्त वैश्यवृत्ती मात्र आहे. असें सांगून कृतादियुगातील जे आपद्धर्म सांगितले, त्यांत क्षत्रवृत्ती, विधवेच्या ठिकाणीं दिरापासून पुत्रोत्पादन करूनघेणें, याचानिषेधकेला आहे. "याप्रमाणेंआदित्यपुराणांत" सांगितलेंआहे यावरून याकलियुगामध्यें ब्राह्मणानीं केवळ वैश्यवृत्ती मात्रग्रहणकरावी परंतु क्षत्रवृत्तीहीसर्वथाग्रहणकरूनयें असें सिद्ध होतें.

⊛ किंचाश्वलायनेनापिकृषिरत्यंतानिंदिता ॥
⊛ सानिंद्यावर्ततेकोदृगितिचेच्छृणुनिर्णयं ४४ ॥

**अर्थ**—आणि आश्वलायन ऋषीनेंही, कृषी कर्महें अत्यंत निंदासांगितलें आहे. तेंकोणत्यारितीनें ह्मणाल तर तें सांगतों श्रवणकरा.

क्षत्रवृत्तेर्वैश्यवृत्तिःप्रशस्तास्यात्कलौयुगे ॥

विप्राणादासवृत्तिस्तुवर्ज्यायत्नेनसर्वदा ॥४५॥
जीवेद्विप्रोविशेषेणस्वयनकृषिकोभवेत् ॥
य.करोतिकृषिंसोपिहलाग्रनस्पृशेद्विजः ॥४६॥
वृत्यर्थमर्चयेद्यस्तुदेवान्वर्षत्रयात्परं ॥
शापनिर्वापयेद्यस्तुयश्चबाधवध्रुग्द्विजः ॥४७॥
घोरेतमसिमज्जतितेविप्रानामधारका. ॥
मृतागह्योजीवमानावर्ज्याः स्यु.सर्वकर्मसु ॥
⊕ इत्याश्वलायनेनोक्तकृपिदोपोविवर्जितस्यता ४८॥

अर्थ—तें असें की, क्षत्रियवृत्तिपेक्षा वैश्यवृत्तिही, याकलियुगांमध्ये ब्राह्मणासप्रशस्त आहे आणि दासवृत्तिही, सर्वदावर्जनीय आहे आता ब्राह्मणानीं, कृषिवृत्तिही, अयत आपत्कालींच करावी, ह्मणून सांगितली तिखी, परतु तिस्वताकरूनयें तर दुसऱ्याच्याद्वारातून करवावी कारण जो ब्राह्मणनामधारितो, वउदरपोषणार्थ तीनवर्षेपर्यंत वेतनघेऊन देवपूजा सतत करितो, व शापदेतो, आणि बधुजनाशीं द्रोहकारितो, याइतक्यागुणानीं युक्त जो ब्राह्मण तो, केवळ नामास मात्र पात्रहोतोखरा परतु तो अयत घोरऋनरकात बुडतो, असें आहे आणि असें हें निंद्यकर्म करणारा ब्राह्मण यद्यपिजिवंत आहे, तथापी त्या निंद्यकर्मांच्यायोगानें वेमेला, असें जाणून सर्व कर्माच्या ठिकाणीं, त्याचा त्याग करावा याप्रमाणें = आश्वलायन ऋषीनें सांगितलें आहे याच चिंतन करून पाहावें ह्मणजे कृषि कर्म व क्षात्रकर्म केल्यास अत्यंत आपत्कालीं हि दोष आहे असें सिद्ध होई॰

⊕ अत.कलौक्षत्रवृत्ति कर्तव्यानेवभूसुरैः ॥

एवंसामान्यवाक्यस्यव्यवस्थास्याद्यथातथा ४९
आपद्वृत्तिरपिज्ञेयाव्यवस्थापिकलावपि ॥
ननिषिद्धावैश्यवृत्तिरितिसाविहिताहिता ५०॥
परंतुक्षत्रवृत्तिर्वानिषिद्धचाकलौयुगे ॥
म्लेंच्छसेवनवृत्तिर्यासाशूद्रस्यापिनोचिता ५१॥
अतःकथंभवद्भिस्ताक्रियतेचोचरंवद ॥
वृत्याभावेपिवाणिज्येकृतेपिचनदूषणं ५२ ॥
वैश्यवृत्तिनिमित्तेनवैश्यत्वंप्रतिपादनं ॥
७ सिद्धंभवतिनैवात्रकारणंतस्यचोच्यते ५३ ॥

अर्थ.— वास्तव या कलियुगांमध्यें, ब्राह्मणानीं, क्षत्रादिकवृत्ती सर्वथा करू नये, याप्रमाणें सामान्य वाक्यांची व्यवस्था होती, आणि आपद्वृत्तिची या कलीयुगांमध्यें, व्यवस्थाकरून वृत्ती आचरण करावी, ती अशीकीं, कलीयुगांत, वैश्यवृत्ती ही, निषेध केली नाहीं, तर श्रेष्ठ असून ब्राह्मणास विहीत सांगितली आहे. परंतु स्वतां नांगर धरून नांगरण्याची व शस्त्रास्त्र धारणकरण्याची, असी जी क्षत्रादिवृत्ती, ती याकलीयुगांत ब्राह्मणास, अतीशय निंद्य असूनही, वर्ज सांगितली; तसेंच म्लेंच्छ शेवनरूप जी वृत्ती, ती, शूद्रांस देखिल निंद्य सांगितली आहे. आणिती शूद्रानीं यत्नें करून वर्जावी असें असून, व क्षत्रादि जीवृत्ती ब्राह्मणास अती निंद्य असून, "कैवर्त वंशस्थादि चित्त पावनादिकहो"! या कलीयुगांत अशा या निंद्य ह्या ज्या तीनवृत्या त्या तुमचेलोक व देशस्थादिकही कोणत्या आधारावरून करिता, त्यांचे उत्तरद्या. वाहावारेशाण्या कल्याणेच्छू ! वृत्तीच्या अभावीं वैश्यवृत्ती अवश्य करावी असें उघड असून, व यद्यपि ती ब्राह्मणानीं

वेग्नी असतां दूषणास पात्रहोतनाहीं, असेंधर्म शास्त्रकर्त्यांनीं, स्पष्टी करण केलें असून आणि ती आमच्या सारस्वतांन काहींलोक, आचरीतात ह्मणून, त्या वैश्यवृत्तीच्या निमित्यानें सारस्वत कोंकणें (शाणवी) हे वैश्य आहेत, अशा अभिप्रायानें आपल्या मनाची शांती करून घेतात काय? चित्तपावनादिकहो! अशा या दुरुक्तिनें, व तुमच्या पूर्णद्वेषबुद्धिनेंही, यद्यपि आमच्या सारस्वतांवर वैश्यत्व, प्रतिपादन करण्याविषयीं, भगिरथ प्रयत्न केला, तथापि, आमच्या सारस्वत कोंकणें उर्फ शाणवी, ब्राह्मणावर, वैश्यत्व प्रतिपादन होत नाहीं. कां ; तर याचें कारण सांगतों, तें असेंकीं,

कृषिगोरक्ष्यवाणिज्यंवैश्यकर्मस्वभावजं ॥
सवैश्यइत्यभिप्रायस्तद्गीतादिगिराभवेत् ५४॥
विप्रस्यापदिकर्मैतद्विज्ञेतव्यंविचक्षणैः॥
अतोस्मदीयवर्गस्यैर्वाणिज्येंतुकृतेपिच॥ ५५॥
अमुख्यवृत्तिताभावाद्वैश्यभावस्त्वनोभवेत् ॥
पूर्वोक्तपद्मपौराणवाक्यान्नैवात्रदूषणं ॥ ५६॥

अर्थ—कृषी, ह्मणजे शेतकी, गोरक्ष, (पशुचेंपालन) करणें आणि वाणिज्य, (व्यापार) या तीनीवृत्या मुख्यत्वें करून, ज्या पुरुषाच्या आहेत, ती वैश्य, असें "श्रीमद्भगवद्गीतेंतील वाक्यपाचा" अभिप्राय दिसतो. आणि वाणिज्यवृत्ती ही, ब्राह्मणास मुख्यत्वेंकरून सांगितली नाहीं. तर आपत्कालीक आहे तस्मात् या भगवद्व चनात् वैश्याला मुख्यत्व असून, ब्राह्मणाच्या टीकाणीं, अभावत्वें करून उक्त सांगितल्या कारणानें, यद्यपी आमच्या सारस्वतानीं आणि यकर्म (व्यापार केला) तथापी त्या व्यापाराच्या योगानें आमच्या सारस्वतकोंकणें उर्फ शाणवी ब्राह्मणावर, वैश्यत्वाचा व्यापार

घडतनाही. कारण, ( ब्राह्मणोवृत्तिहीनश्चे द्वैश्यवृत्तिसमाचरेत् ) "पापप्रपुराणोक्त", व मार्गे दर्शविलेली, स्मृत्योक्त प्रमाणावरूनही, ब्राह्मणानी, वैश्यवृत्ती, अवश्यमेव करावी. आणी ती केलीअसतां त्या वृत्तिच्या योगेंकरून ब्राह्मणत्वास किंवा पट्कर्माधिकारत्वास, काहीं एक बाधक येतनाहीं, असें सिद्ध होतें.

आतां, यावरील भगवद्वचनावरून, वैश्यत्व हें चित्तपावनादिकांवर प्रत्यक्षरीकरून सिद्धहोतें, तें असेंकीं, **कृषिगोरक्ष्यवाणिज्यंवैश्यकर्मस्वभावजं** यांत वैश्याचीं मुख्य जीं तीनकर्मे सांगितलीं तीं या चित्तपावनादिकांत, प्रत्यक्षेकरून, कुल परपरागत चालतात. ह्मणजे, नांगर हे, स्वतां धरून नांगरतात; पशू पालन याविषयीं तर कल्याणेच्छुने दिलेला माधवच लिहितों. ते असेंकीं, **कलभापिपालनाद्यकृषेलाख्याःप्रकीर्तिताः**

आतां, वाणिज्य, याविषयीं तर प्रत्यक्ष लिहिण्याची जरूरी नाही. कारण, या मुंबईत, जीतकीं, दुधाचीं दुकानेंआहेत तीं, सर्व चित्तपावनावांचून, अन्य ब्राह्मणाचीं, ह्मणजे द्राविडाचीं, किंवा गौडाचीं मुळींच नाहींत. आणि याविषयीं बाहूल्यतेची अवश्य कताहि नाहीं. सारांश, यावर दर्शीतकेलेल्या ज्या तीन वृत्या, त्या मुख्यत्वेंकरून चित्तपावनादिकांमध्येंच चालतअसल्यामुळें वैश्यत्व हें चित्तपावनादिकांवांचून सारस्वतावरसिद्धहोत नाहीं. अस्तु, आता, इतके गुण या चित्तपावनादिकांच्या अंगि स्वतासिद्ध असून, त्या दुर्गुणाचा पूर्णविचार नकरितां केवळ द्वेषबुद्धीनें, मूर्ख लोकांच्या भाषणाप्रमाणेच हेजर शंका घेऊ लागले, तर त्यावर कोणता उपाय चालतो! आणि या द्वेषबुद्धीवर उपाय चालत नाहीं, याविषयीं एक प्रमाण ही आहे.

शक्यंवारयितुंजलेनहुतभुक्छत्रेणसूर्यातपः ॥

नागेंद्रोनिशितांकुशेनसमदोदंडेनगोगर्दभौ ॥ ५७॥
व्याधिर्भेषजसंग्रहैश्चविविधैर्मंत्रप्रयोगैर्विषं ॥
सर्वस्यौषधमस्तिशास्त्रविहितंमूर्खस्यनास्त्यौषधं ५८

अर्थ.—जें असेंकीं, अग्नि जो आहे तो, आपल्यासंपूर्ण तेजानें जाज्वल्यमानझाला, तथापी, उदकाच्यायोगानें शांत होतो. तसेंच सूर्याचाताप, छत्राच्या योगानें शांत करितां येतो; त्याचप्रमाणे हत्ती यद्यपी, मदोन्मत्त होऊन कोणाचीच गणना करित नाहीं; तथापी अंकुशाच्या योगानें शांतिप्रत पावतो. याचप्रमाणें, गाई, गर्दभ, रोगी, विषप्राणी, इत्यादिक, यद्यपी, मदोन्मत्त होऊन लोकांस त्रासदेऊंलागले, तथापी त्या सर्व प्राण्यास शास्त्र विहित उपचारें करून, शांत करितां येतात. परंतु; मूर्ख जो आहे, त्याचें समाधन करणे तें शास्त्रासदेखील कठीनपडतें. एवचतात्पर्यार्थ काय? सर्व रोगांस औषध आहे, परंतु; द्वेष या रोगास मुळींच, औषध नाहीं. तरहें, चित्तपावनादिक, केवळ द्वेषानेंच शंका घेऊं लागले, तर त्या शंकेचे समाधान कोणत्या विद्वानाच्या हातून होणारा आहे? असो या शंकेवरून, या चित्तपावनादिकांच्या अंगी काय ग्रस्त आहे तें, सर्व वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल; कदाचित् न आल्यास, यांच्या या चवथ्या शंकेवरून पाहा.

७ अधुनापिहिवादीनांचित्तस्थैर्यनविद्यते॥
७ रत्नागिरिपुरेःकल्याणेच्छुनामास्तिकश्चन॥५९॥
७ तेनसंस्थापितोदोषःशुक्तौरजतज्ञानवत् ॥
७ यदिमेब्राह्मणाह्युक्तंपंक्त्यैक्यंनास्तितत्कथं॥६०॥
७ यत्रपंक्तेरभावस्तंतच्छूद्रस्त्विवतिनिश्चयः॥

⊛ इत्यादिविपयस्तेनपत्रद्वारेणदर्शितः ॥ ६१ ॥

**अर्थ.**—आतां या चित्तपावनानीं, जींजीं, दूपणें, दिलीं होतीं, तीसर्व, श्रुतिस्मृत्योक्तप्रमाणेंदेऊन निवारण केलीं; तथापी त्यांचें समाधान अद्यापपर्यंत नहोतां, **"रत्नागिरी नगरांत"** राहणारा **"कल्याणेच्छू"** या नामाच्या एका चित्तपावनानें, भ्रमाच्या योगेंकरून शुक्तीवर रजतज्ञान ज्याप्रमाणें होतें त्याप्रमाणें, कल्याणेच्छूनें, शंका घेऊन, आमच्या **"सारस्वतकोंकणें ऊर्फ शाण्णवी ब्राह्मणा"** वर एक मोठा दोष स्थापित केला. तो असाकीं; शाण्णवी हे जर ब्राह्मण ह्मणावें, तर, या शाण्णवी लोकांचीं, आणि ब्राह्मणाची एक पंगत कसी होत नाहीं ? तस्मात्, ज्यां ठिकाणीं एक पंक्तीचा अन्नव्यवहार होत नाहीं ? तो केवळ शूद्रप्राय आहे, असें ह्मटलें तरी चालेल. इत्यादिविषय, उत्तररूपेंकरून, **"कल्याणेच्छू या नामाच्या एका चित्तपावनानें"** जगन्मित्र पत्रांत छापपून, प्रसिद्ध केले होते. परंतु; या कल्याणेच्छून दिलेल्या उत्तरासपाहून मला मोठें आश्चर्य, वाटूं लागलें. कारण, असें आहेकीं,

निःसारस्यपदार्थस्यप्रायेणाडंबरोमहान् ॥
नसुवर्णेध्वनिस्तादृग्यादृकांस्येपिजायते ॥

⊛ इत्थंसित्वमभूय्यस्त्वंवागाडंबरमातनोः ॥६२ ॥

**अर्थ.**—ज्या पदार्थांत, सारनाहीं, ( महत्व ) तो पदार्थ बहूतकरून सर्वांपेक्षां, मोठी ध्वनी करितो. यास दृष्टांत पाहा! स्वर्णहोयात् सर्वधातूपेक्षां श्रेष्ठ असून, वाजविली, तर ध्वनी होतनाहीं, आणि कांशहें, सर्वधातूंत, नीच असून (हलकें) सर्व धातूपेक्षां मोठा नाद करितें. कारण, तें निःसार आहे ह्मणून- तसें या कल्याणेच्छून केलेल्या

शंकेचा सिद्धांत दिसून येतो. आतां ह्यांनीं कोणत्यापदार्थाची आहे; हें, कशावरून समजावें ! तर असें आहेकीं,

तुल्यवर्णछदःकृष्णःकोकिलैःसहसंगतः ॥
केनविज्ञायतेकाकःस्वयंयदिनभाषते ॥ ६३ ॥

◎ इदंदृष्टंयतोज्ञानस्वरूपंवचसातव ॥
◎ अस्त्वत्रापिसमाधानंश्रूयतामुच्यतेमया ॥ ६४॥

**अर्थ.**—काकपक्षीहा वर्णेकरून व अंगोपांगेंकरून कोकीळपक्षा सारखाच असून त्या कोकील पक्षासमवेत आपलें मृदूभाषण नकरितां वास करूं लागला, तर तो काकपक्षी आहे, असें कोण ओळखणार आहे ! परंतु; ज्यावेळेस तो आपला गंभीर शब्दकरितो त्यावेळेस सहजच लोकांस ज्ञान होतें कीं; हा कावळा आहे. त्याप्रमाणें या कल्याणेच्छूनें केलेल्या शंकेचें स्वरूपज्ञान दिसून येतें. असक्त यद्यपी, या कल्याणेच्छू नामधारक चित्तपावनानें पंक्तिशब्देंकरून आमच्या ब्राह्मणत्वास दूषण दिलें, तथापी या दूषणानुरूप शंकेचें समाधान भूषणानुरूप शास्त्राधारेंकरून सांगतों तें श्रवणकरा.

◎ पंक्तिभोजनराहित्याद्विप्रानविमताइति ॥
◎ यत्पूर्वंगदितंपूर्वपक्षिणातन्नपेशलं ॥ ६५ ॥
◎ दृष्टंविप्रेपुयच्छूद्रपंक्तिभोजनवर्जनं ॥
◎ पंक्तिशब्देनविप्राणापंक्तिःस्याचेद्विवक्षितः॥ ६६॥

**अर्थ.**—तें असेंकीं, एक पंक्तींत अन्नव्यवहार होत नसल्याकारणानें, विमत हे ब्राह्मणनाहींत, ह्मणून कल्याणेच्छूनें, जें कांहीं पूर्वीं सांगितलें, तें अयोग्य आहे. कारण, शूद्रासमवेत ब्राह्मणाची पंगत वर्ज्य आहे. तर त्यान्यायावरून व पंक्तिशब्देंकरून एक

पंगत होत असेल, तर तो ब्राह्मण, नाहींतर शूद्र; असेंजर चित्तपावनादिकाचें बोलणें असेल, तर,

⊛ भिन्नपंक्तिषुचान्योन्यंविप्रत्वेनमतेष्वपि ॥
⊛ पंक्तिभोजनराहित्यंतेपुनेत्युच्यतेयदि ॥ ६७ ॥
⊛ तर्ह्यस्मास्वपिसद्विप्रपंक्तिभोजनदर्शनात् ॥
⊛ पंक्तिभोजनराहित्यंलिंगस्यासिद्धिरीक्ष्यते॥६८॥

अर्थ—असेआहेकीं, विप्रत्वेकरून, व मतभेदेंकरून, अन्योन्य पंगत न होणारे, असे अनेक ब्राह्मण आहेत म्हणून ते ब्राह्मण नव्हेत काय? आणि एक पंगत होत नसेलतरते ब्राह्मण नव्हे; असें जर तुमच्या बोलण्याचा (चित्तपावनाचा) भावार्थ असेल,तर,' सारस्वतकीं-कर्णेरूर्फेब्राम्हणवी यांचापक्ष, निर्व्यभिचारत्वेंकरून सिद्ध होतो. तरतो, कसा? म्हणून कदाचित्प्रश्नकराल, तर असे आहेकीं, मतभेदेंकरून व ब्राह्मणत्वेंकरून द्राविडादिकांचीच, जसी एकपंगतहोतनाहीं, त्याप्रमाणेच सारस्वतांची आणि द्राविडादिकांची एकपंगतहोत नाहीं।

⊛ भिन्नपंक्त्युपविष्टानामपितेषांकदाचन ॥
⊛ पंक्त्यैक्यादर्शनात्कोपिदोषोनेत्युच्यतेयदि ॥
⊛ तर्हिरामेश्वरादौहिकाश्यांवाजन्मवासिनां ॥
⊛ अन्योन्यमपिविप्राणामेकपंक्तेरसंभवात्॥७०॥
⊛ स्वत्पक्षेविप्रतातेषांभवेद्दत्तजलांजलिः ॥
⊛ तेषांसंगत्यभावेनपंक्त्यैक्यस्यह्यदर्शनं ॥
⊛ नदोषोत्रप्रसक्तेश्चविवक्षेत्युच्यतेयदि ॥७१॥

अर्थ—तस्मात्, यामतभेदावरून व विप्रत्वावरूनही, अन्योन्य पंग-

तहोतनाहीं, ह्मणून, तेब्राह्मणनव्हे, असें ह्मणतांयेणारनाहीं. अस्तुकदाचित् चित्तपावनादिकांचेंमत एकपंगतनसल्याकारणानें तेब्राह्मणनाहीं? असेंचजरअसेल; तर, "श्रीक्षेत्रकाशींत" "व श्रीक्षेत्ररामेश्वरांत" जन्मलेलेजेब्राह्मण, त्यांचीही, अन्योन्यपगतहोतनाहीं, ह्मणूनयातुमच्यान्यायावरून (चित्तपावनादिकांचाच) तेब्राह्मणनव्हे असेंसिद्धहोतें. आतां तेब्राह्मणआहेत, ह्मणून आलापक्षसिद्धकरण्यास जरतुह्मी (चित्तपावन) उच्छ्रूकव्हाल, तर; जेकांहींपूर्वींगेलत्या, त्याबोलण्यावर तिलांजुळीसोडा. आणि असेंच होइल. कारण त्यांची अन्योन्य सगतीनसल्याकारणानें एकपंगत मुळींचहोतनाहीं. तस्मात् "चित्तपावनहो"! यापंक्तिशद्धावरून ब्राह्मणलांस कांहींएकबाधकरूतनाहीं.

ॐ तर्ह्येकपंक्तेःसत्यांचप्रसक्तोगौडदेशिनां ॥

ॐ गुर्जराणांचपंक्त्यैक्यंभवदीयैःसहास्तिन ॥

ॐ तेपुब्राह्मणतास्तीतितद्धेतोर्व्यभिचारिता॥७२॥

अर्थ—कल्याणेच्छुवा! केवळपंक्तिशद्धेकरून, तुह्मीआपल्याबोलण्यास,सत्यत्वआणण्याची इच्छाधराल,तर, गौडांची, व गुर्जराची, आणि देशस्थादिकांची, एकपंगत मुळींच होतनाहीं, असेंसपष्टदिसतअसून, त्यांसब्राह्मणत्वआहे, असें जरतुमचामनोदय असेल, तर तुमच्या बोलण्यासचव्यभिचारयेतो. कारण, एकपंगतनसल्याकारणानें सारस्वतब्राह्मणनव्हे, ह्मणूनप्रथमता आपणदर्शितकेलेंआहे; तर त्याच आपल्यासुंदरबोलण्यावरून, ज्यांची एकपगतहोतनाहींकीं, तेब्राह्मणनव्हे; असेंसिद्धहोतें. आणि आतांतेब्राह्मणआहेत, असेंजरतुमचेंमत असेल तरतुमच्याबोलण्यास स्वोक्तीव्यभिचारयेतो.

ॐ पंक्त्यैक्यासंभवस्तेपुदेशभेदनिबंधनः ॥

ॐ इतिचेदुच्यतेस्माकमप्येतत्समसुत्तरं ॥ ७३ ॥

⊛ किंचित्त्वदीयलोकेषुविप्रत्वेनमतेष्वपि ॥
⊛ केषुचित्पंक्तिभेदश्चतिर्यक्पांक्तिषुकेषुचित् ॥
⊛ सर्वैरालोकितास्तीतिस्यात्तेषांविप्रताकथं॥७४॥
⊛ सदैतदस्तिचास्मासुपूर्वाचारप्रमाणतः ॥
⊛ इतिचेदुच्यतेह्येतन्ममापिसमसुत्तरं ॥ ७५ ॥

अर्थ—आतां, कदाचित्देशभेदनिबंधनेंकरून, गुर्जरांची, आणि देशस्थादिकांची एकपंगतहोतनाहीं; असेंह्मणाल, तर, आमचेंही, तुह्मांसतेंचउत्तरआहे. कारण देशभेदेंकरून, तुमच्यादेशस्थांची, आणि गुर्जरांची, एकपंगत, जसीहोतनाहींकी, त्याचप्रमाणें ह्मणजे देशभेदेंकरूनच, आमच्यासारस्वतांची, आणि देशस्थादिकांची एक पंगतहोतनाहीं. आतु, आतां तुमच्याब्राह्मणामध्येंच कांहीं लोकांची एकपंगतआहे, व कांहींलोकांची तिर्यक् (वांकडी) पंगतआहे. आणि हेंपाहिलेंअसतां, फेयळवैरत्वचभासूनयेतें. तरत्यांस ब्राह्मणत्वकसें? आतां देशाचारानरून, आमची आणि अन्यब्राह्मणाची एकपंगतहोतनाहीं, ह्मणून असेंजरतुह्मीप्रतिपादनकराल? तरमाझेंहीतुह्मास, तेंच उत्तरआहे. असेंसमजा.

⊛ गौडगुर्जरपूर्वैश्चसहपंक्तेरभावतः ॥
⊛ भवतामपिसर्वेषांस्यात्कथंविप्रतावद ॥ ७६ ॥
⊛ तस्मात्पंक्त्यैक्यराहित्यंनैवविप्रत्वबाधकं ॥
⊛ गौडादिनामिवास्माकंतत्विसाधूपपद्यते ७७ ॥
⊛ किंचस्वेष्वपिलोकेषुविप्रत्वेनमतेष्वपि ॥
⊛ केषुचिद्भूयसांदुष्टगुणानामेवशंकया ॥

तहोतनाहीं, ह्मणून, तेब्राह्मणनव्हे, असें ह्मणतांयेणारनाहीं. अस्तुकदाचिन् चित्तपावनादिकांचेमत एकपंगतनसल्याकारणानें तेब्राह्मणनाहीं? असेंचजरअसेल; तर, "श्रीक्षेत्रकाशींत" "व श्रीक्षेत्ररामेश्वरांत" जन्मलेलेजेब्राह्मण, त्यांचीही, अन्योन्यपंगतहोतनाहीं, ह्मणूनयातुमच्यान्यायावरून (चित्तपावनादिकांचाच) तेब्राह्मणनव्हे असेंसिद्धहोतें. आतां तेब्राह्मणआहेत, ह्मणून आत्मपक्षसिद्धकरण्यास जरतुह्मी (चित्तपावन) उत्सुकव्हाल, तर; जेंकांहींपूर्वींबोलल्य, त्यावोलण्यावर तिलांजुळीसोडा. आणि असेंच होइल. कारण त्यांची अन्योन्य संगतीनसल्याकारणानें एकपंगत मुळींचहोतनाहीं. तस्मात् "चित्तपावनहो"! यापक्तिशद्बावरून ब्राह्मणलांस कांहींएकबाधकएतनाहीं.

⊙ तर्हीकपंकेःसत्यांचप्रसक्तोगौडदेशिनां ॥

⊙ गुर्जराणांचपंक्त्यैक्यंभवदीयैःसहास्तिन ॥

⊙ तेपुब्राह्मणतारतीतितद्वेतोर्व्यभिचारिता॥७२॥

अर्थ—कल्याणेच्छुबुवा! केवळपंक्तिशद्बेंकरून, तुह्मींआपल्याबोलण्यास, सत्यत्वआणण्याची इच्छाधराल, तर, गौडांची, व गुर्जरांची, आणि देशस्थादिकांचीं, एकपंगत मुळींच होतनाहीं, असेंस्पष्टदिसतअसून, त्यासब्राह्मणत्वआहे, असें जरतुमचामनोदय असेल, तर तुमच्या बोलण्यासव्यभिचारयेतो. कारण, एकपंगतनसल्याकारणानें सारस्वतब्राह्मणनव्हे, ह्मणूनप्रथमता आपणदर्शितकेलेंआहे; तर त्याच आपल्यासुदरबोलण्यावरून, ज्यांची एकपंगतहोतनाहींकीं, तेब्राह्मणनव्हे; असेंसिद्धहोतें. आणि आतांतेब्राह्मणआहेत, असेंजरतुमचेंमतअसेल तरतुमच्याबोलण्यास स्वोक्तीव्यभिचारयेतो.

⊙ पंक्त्यैक्यासंभवस्तेपुदेशभेदानिबंधनः ॥

⊙ इतिचेदुच्यतेस्माकमप्येतत्सममुत्तरं ॥ ७३ ॥

⊛ किंचित्त्वदीयलोकेषुविप्रत्वेनमतेष्वपि ॥
⊛ केषुचित्पंक्तिभेदश्चतिर्यक्पंक्तिषुकेषुचित् ॥
⊛ सर्वैरालोकितास्तीतिस्यात्तेषांविप्रताकथं॥७४॥
⊛ सदैतदस्तिचास्मासुपूर्वाचारप्रमाणतः ॥
⊛ इतिचेदुच्यतेह्येतन्ममापिसममुत्तरं ॥ ७५ ॥

अर्थ–आतां, कदाचित्देशभेदनिर्बंधनेंकरून, गुर्जरांची, आणि देशस्यादिकांची एकपंगतहोतनाहीं; असेंह्मणाल, तर, आमचेंही, तुह्मांसतेंचउत्तरआहे. कारण देशभेदेंकरून, तुमच्यादेशस्थाची, आणि गुर्जरांची, एकपंगत, जसीहोतनाहींकी, त्याचप्रमाणें ह्मणजे देशभेदेंकरूनच, आमच्यासारख्यतांची, आणि देशस्यादिकांची एक पंगतहोतनाहीं. असु, आतां तुमच्याब्राह्मणामध्येंच कांहीं लोकांची एकपंगतआहे, व कांहींलोकांची तिर्यक् (वांकडी) पंगतआहे. आणि हेंपाहिलेंअसतां, केवळवैरत्वचभासूनयेते. तरत्यांस ब्राह्मणत्वकसें? आतां देशाचारावरून, आमची आणि अन्यब्राह्मणाची एकपंगतहोतनाहीं, ह्मणून असेंजरतुह्मीप्रतिपादनकराल? तरमाझेंहीतुह्मास, तेंच उत्तरआहे. असेसमजा.

⊛ गौडगुर्जरपूर्वैश्चसहपंक्तेरभावतः ॥
⊛ भवतामपिसर्वेषांस्यात्कथंविप्रतावद ॥७६ ॥
⊛ तस्मात्पंक्तैक्यराहित्यंनैवविप्रत्वबाधकं ॥
⊛ गौडादिनामिवास्माकंतत्विसाधूपपद्यते ७७ ॥
⊛ किंचस्वेष्वपिलोकेषुविप्रत्वेनमतेष्वपि ॥
⊛ केषुचिद्दूषसांदुष्टगुणानामेवशंकया ॥

ॐरामानुजैरिवास्माभिःपंक्त्येक्यंपरिवर्जयेत्॥७८॥

अर्थ —आणि, दुसरें असें आहेकीं, गौडादिक (सारस्वत, कान्यकुब्ज, मैथील, उत्कल, आणि कनोज) याच्या बराबर व गुर्जरांबराबर, जंकेरळी, या इतक्या ब्राह्मणांबरोबर, तुमच्या द्राविडादिकाचीं, एक पगत होत नाहीं, तर त्यास ब्राह्मणत्व कोठून! तें सागा. तस्मात् एक पगत नाहीं, ह्मणून, ब्राह्मणत्वास, किंवा षट्कर्माधिकारत्वास, काहीं एक बाधक एत नाहीं. आता सारस्वताची, आणि आदिगौडाची, एक पगतहोतनसून, जसे त्याच्या ब्राह्मणत्वास हानी एत नाहीं, तसें सारस्वतकोंकणे उर्फशाणवी, याची आणि देशस्थादिकाची एक पगत जरी होत नाहीं; तथापी, परिशिष्टदेकरून ब्राह्मणत्वास हानी एत नाहीं. आता, काहीं एक लोकामध्ये मतभेदेकरून व निर्मलेकरून किंवा कोणत्याही ब्राह्मणाचे अंगीं मोठे दुर्गुण असतील तर कर्मनिष्टब्राह्मण बहूधा त्या दुर्गुण ब्राह्मणासीसह, पगतकरित नाहींत. ह्मणून ते ब्राह्मण नव्हे, असें नाहीं. तर याविषयीं दृष्टांत पाहा? रामानुजाची, आणि तुमची एक पगत नाहीं, ह्मणून रामानुज ब्राह्मण नव्हेतकींकाय? तात्पर्य काय, ज्याप्रमाणे रामानुजाची, आणि तुमची एक पगत होत नसून, जसें रामानुजाचें, ब्राह्मणत्वसिद्ध आहे. तसे, आमची आणि तुमची यद्यपी पगत होतनाहीं; तथापी, त्या पंक्तिच्या योगानें, ब्राह्मणत्वास काहीं एक बाधक नाहीं, असें समजा.

ॐ विचार्यसहवासाद्यैःसुपरीक्षितसद्गुणैः ॥
ॐ स्वदेशीयद्विजैरेवस्वदेशेकार्यसिद्धिलः॥७९ ॥
ॐ दोषशंकास्पदीभूत्वाअपरीक्षितशीलकाः ॥
ॐ आगंतुकाःकतिपयब्राह्मणाःपरदेशिनः ॥

❀ पंक्तिभोजनकार्यांदौवर्ज्यतेपुण्यलिप्सया॥८०॥

अर्थ.—कारण ज्यां बरोबर आपला सहवास आहे, व ज्याचे अंगी सद्गुण, किंवा स्वदेशांत राहणारे, असे जे ब्राह्मण, त्यांबरोबर बहुतकरून एकपगत करितात. आणि अन्यदेशीय ब्राह्मणाबरोबर पगत करीत नाहींत. ह्मणून त्यांच्या ब्राह्मणत्वास काहीं एक बाधक नाहीं. कारण असें आहेकीं, ज्याच्या स्वभावाची परिक्षा झाली नाहीं, किंवा आगंतुक, अथवा परदेशीय, असे जे अनवोळखिचे ब्राह्मण, त्यांच्या स्वभावाची. पूर्ण परिक्षा झाल्यावाचून, तपोनिष्ठजे पुण्येच्छू, ते बहुतेककरून एक पगत करित नसतात. आणि त्यांच्याशीं एकपगत करितनाहींत ह्मणून, त्यांच्या ब्राह्मणत्वास काहींएक दूषण एतनाहीं, कारण पूर्वाचारप्रमाणनसून, स्वदेशीय नव्हे? तस्मात् एक पंक्तिव्यवहार हा, ब्राह्मणत्वास, किंवा षट्कर्माधिकारत्वास दूषण देण्याविषयीं समर्थ होत नाहीं.

❀ धर्मशास्त्रेदुर्गुणानामपांक्तेयत्वभापणात् ॥
❀ गुणिनामेवविप्राणांपांक्तेयत्वप्रकीर्तितात्॥८१॥

अर्थ.—आता, अपांक्तेय, असे कोणास, ह्मणावे? तर याविषयीं, धर्मशास्त्रात, असेंसांगितलें आहेकीं; दुर्गुणी जे असतील, त्यांच्याशीं एक पगत कधीं करूनयें; गुणिजे असतील, त्यांच्याशीं एक पगत करावी, असें आहे. आणि याविषयीं मन्वादिक प्रमाणें सांगतों.

येस्तेनापतिताःक्लीवायेचनास्तिकवृत्तयः ॥
तान्हव्यकव्ययोर्विप्राननर्हान्मनुरब्रवीत्॥८२॥
जाटिलंचानधीयानंदुर्बलंकितवंतथा ॥

दिककरून, उपजीविकाकरणारा, स्त्रीसंपर्कानें ब्रह्मचर्य व्रताचा त्याग करणारा, अथवा, संन्यासाश्रमाचा त्यागकरणारा, सवर्णस्त्रीचा त्यागकरून, शूद्रस्त्रीवरावर विवाह करणारा, पुनर्भूचा (ह्म०) पुनर्विवाह झालेल्यास्त्रीचापुत्र, स्त्रीचाजार, जा घरांत आहे तो, डोळ्यानीं काणा, वेतन घेऊन सिष्यपढविणारा, व वेतन घेऊन अध्ययन करणारा, शूद्राचें शिष्यत्वकरणारा, शूद्राचागुरू, कटोर भाषणकरणारा, कुंड, ( ह्म० ) नवराजीवंत असून ज्यारापासून उत्पन्न झालेला पुत्र, गोलक ( ह्म० ) नवरा मेल्यानंतर ज्यारापासून उत्पन्न झालेला पुत्र, आणि, लोकांचीं घरें जाळणारा, विषेघालणारा, वरसांगितलें जें गोलक, त्याचें अन्न भक्षण करणारा, सोमवल्लिचा विक्रय करणारा, समुद्रांतून द्विपांतरास गमनकरणारा, मनुष्यांची स्तुतीकरणारा, तेल्याचें काम करणारा, खोटीसाक्षदेणारा, व मातापितरांपासीं निरर्थक वाद करणारा, कितव ( ह्म० ) आपणास द्युत खेळतां एत नसतील, तर, आपल्याकरितां दुसऱ्याकडून खेळविणारा, मद्यप्राशन करणारा, पापानेव्यास, रोगी, कुष्टी, दांभिक, ( ह्म० ) सदाचरणाचें सोंग दाखविणारा, आणि रसविक्रयी, हे सर्व प्रकारचे ब्राह्मण, अनुक्रमानें अपांक्त सांगितले, आहेत्, ह्मणून मुख्य देव कृत्यास सर्व यावरील ब्राह्मणांस आमंत्रण करूनयें (ह्म० ) निरंतर हे वर्ज करावे.

---

१. यावरून याचित्तपावनाचें उपनाव देखिल् आहे. तेंहीं, "आगलाव" २ विष घालणे हातर कराड्यांचा कुलपरंपरागत धर्म चालत आहे. याविषयीं सह्याद्रीखंडातील ८२ वा अध्याय पाहा. ३ मुख्यत्वेंकरून गणेशशास्त्री वतत् अनुयाई जे असतील ते. ४ मद्यप्राशन. याविषयीं शाक्त मार्गप्रवर्तक अनेक चित्तपावन या मुंबईत सांप्रत आहेत. वाहेरगावीं किती असतील तें, नकळे.

त. याप्रमाणें "मनुस्मृतींत" विस्तारानें सांगितलें परंतु; विस्तार भयास्तव किंचित येथें दर्शविलें तें पाहावें. यावप्रमाणें "मोक्षधर्मांत," व "हरिवंशपर्वांत" हीं, सांगितलें आहे. आणि याचविषयीं अन्यप्रमाणें.

ग्रामयाजिपशुकेशाविक्रयीस्तेनशिल्पापितृवादकारकान् ॥ अर्थकामरतशूद्रयाजकश्मश्रुहीनजाटिमुंडिनिर्घृणान् ॥ ८९ ॥ यस्यचैवग्रहिणीरजस्वलास्वार्थपाकरतशापदायकान्॥क्लीबकुष्ट्यतिविलोहितेक्षणान्कुब्जवामनभृपाभिशापिनः ॥ ९० ॥ पुत्रहीनमथकूटसाक्षिणंप्रातिहारिकमयाज्ययाजकं ॥स्वात्मदातृपरिवेतृजायकस्तेनहिंस्रकमुखान्विवर्जयेत् ॥ ॐ इत्यर्थनिर्णयसिंधौहिविस्पष्टंप्रविचार्यतां ९१ ॥

अर्थ—तीअसीकीं, ग्रामयाजी, (ह० ) ग्रामोपाध्य, पशुविक्रयकरणारा, केशविक्रयी (ह० ) गगायनादिविकणारा, चोर, चित्रादिककरणारा, बापबरोबरव्यर्थवादकरणारा, केवळ द्रव्यलोभी, शूद्रावाकरत्नीयपणाकरणारा, निस्तब्या, जटील, मुंडनकेलेला, निर्दय, ज्याचिस्त्रीरजस्वलआहेतो, केवळ आपणापुर्ताचपाककरणारा, शापदेणारा, नपुंसक, कोडानेंयुक्त, अत्यंतडोळेलालआचेआहेतो, कुबडा, अतीठेंगणा, खोटें बोलणारा, निपुत्रक, खोटीसाक्षदेणारा, द्वारपाल, अयाज्ययाजककरणारा, अशायासर्वदोषानीं व्यासजेब्राह्मण ते निरंतर अपांक्तआहेत्. आणि त्यांसश्राद्धादिहव्यकव्यांत वर्ज करावे. याप्रमाणें "निर्णयसिंधूंत" सांगितलेंआहे, तें पाहावें. तस्मात् कल्याणेच्छूहो! याइतक्यादोषानीं व्यासजेअसतील तेचअपांक्त, असें

ह्मणतात. आणि याच वर्ज्याविषयीं दुसरें एक प्रमाणसांगतों त्यावरून, कोणत्याब्राह्मणासघ्यावें, व कोणत्याब्राह्मणासघेऊनयें, याचाविचार, आपणचकरावे. व तेणेंकरून, तुमच्यावर्गस्थलोकांस (ह्म० चित्त०) तरींज्ञानहोईल, कीं श्रेष्टकोण ? याचें.

अंगवंगकलिंगाश्चसौराष्ट्रान्गुर्जरांस्तथा ॥
आभीरान्कोंकणांश्चैवद्राविडान्दाक्षिणायणान् ९२
अवंत्यान्मागधांश्चैवब्राह्मणांस्तुविवर्जयेत् ॥
इत्थंसौरपुराणेपिपंक्तिभेदउदीरितः ॥ ९३ ॥
तस्मादनेनविप्रत्वंकेषांसिध्यतिमंजसं ॥
भिन्नभिन्नेपुदेशेपुयुक्तमाचरणादिकं ॥ ९४ ॥
कस्यदोपःकुलेनास्तिव्याधिनाकोनपीडितः ॥
व्यसनंकेननप्राप्तंकस्यसौख्यंनिरंतरं ॥
इतिनीरयुक्तोदोपःसर्वत्रापिहिविद्यते ॥९५ ॥

अर्थ—तेंअसेंकी, अंगदेशांतराहणारे, वंगदेशांतराहणारे, सौराष्ट्रदेशांतील, गुर्जरदेशांतील, आभीरदेशांतील, व कोंकणांतील, द्राविडदेशांतील, दक्षिणदेशांतील, अवंतिनगरांतील, आणि मघदेशांत राहणारे, असे जे ब्राह्मण ते निरंतर वर्जकरावे. याप्रमाणें "सौरपुराणांत" सांगितलें आहे. तस्मात् या सौरपुराणोक्तीवरून, कोणत्याब्राह्मणांस अन्योन्यपंगत आहे ती पाहा ! आणि या पंक्तिभेदावरून कोणत्या ब्राह्मणांचें ब्राह्मणत्व सिद्ध होतें ? आणि "चित्तपावनाच्या" समजूतिप्रमाणेंतर, या इतक्या ब्राह्मणासही ब्राह्मत्व नाहीं, असें ह्मणण्यास कांहीं बाधक दिसत नाहीं. कारण भिन्नाभिन्न देशांत, भिन्नाभिन्नाचरणादिक, परंपरागत चालतेंच आहे. आणि

त्या आचरणावरून, कांहीं लोकांची एक पंगतही होत नाहीं, ह्मणून ते सर्व देशांतील ब्राह्मण, आपापल्या ब्राह्मणत्वास मुकतात, असें ही ह्मणतां येत नाहीं. कां; तर, असें आहेकीं, कोणत्याही ब्राह्मणाच्या कुलास दोष नसून निर्दोषी आहे; असा कोणीच नाहीं, तसेंच व्याध्यादिक उपद्रव नसून निरंतर सुखच आहे, परंतु दुखप्रामी नाहीं, आताही कोणी नाहीं, आणि कोणत्याही कुलांत व्यसन हें नसून तें सुखी आहेत. असें कोणीच दिसत नाहीं. तर हे चारि प्रकार (ह्म०) दोष, व्याधी, व्यसन, आणि दुःख हे सर्व कुलांत जन्मापासून लागलेलेच आहेत. याप्रमाणें "निती शास्त्रोक्तवचन" आहे. आणि या नीतिशास्त्रोक्तवचनांत जे दोष सांगितले, ते सर्वांच्या कुलांत व्याप्त असल्याकारणानें एका कुलांतील ब्राह्मणानें दुसऱ्या कुलांतील ब्राह्मणाची निंदा करून परस्परात वैर वाढवूनये. कारण,

देशधर्माश्चदृश्यंतेकुलधर्मास्तथैवच ॥
.जातिधर्मावयोधर्माकुलधर्माश्चशोभते ॥९६ ॥
शरीरकालधर्मश्चआपत्धर्मस्तथैवच ॥
एतंधर्मस्यनानात्वंक्रियतेलोकवासिभिः॥ ९७॥
@ इत्थमास्तिपर्वणिचअनुशासनिकाभिधे ॥
@ तथेवअश्वमेधेपिवर्ततेवलवत्तरा ॥ ९८ ॥

अर्थ.—असें आहेकीं, देशधर्म, कुलधर्म, जातिधर्म, वयोधर्म, शरीरधर्म, कालधर्म, आणि आपद्धर्म, याप्रमाणें, धर्माचे अनेक भेद आहेत, आणि त्यांचे आचरणही, तदनुसार करितात, याप्रमाणें "अनुशासनपर्वांत" व "अश्वमेध पर्वांतही" सांगितलें आहे. तस्मात्

या धर्माचरणानें, ते ब्राह्मण केवळ निंदेसपात्र होतात, असें नाहीं. तर.

देशाचाराःपरिग्राह्यास्तत्तद्देशीयकैर्नरैः ॥
अन्यथापतितोज्ञेयःसर्वधर्मबहिष्कृतः ॥
⊛ इत्थंबृहन्नारदीयपुराणवचनंशृणु ॥ ९९ ॥

अर्थ.—असें आहेकीं, ज्या देशांत जे ब्राह्मण राहतात, व त्यादेशांत जो अचाररूपधर्म असेल तोच त्या ब्राह्मणानीं ग्रहणकरून त्याप्रमाणे वागावें आणि तो सोडून अन्यधर्म जर तो ग्रहणकरील तर तो ब्राह्मण सर्वधर्मांत बहिष्कृत असून पतीत होतो, असें जाणावें. याप्रमाणे "बृहन्नारदीय पूराणांतीलवचन आहे"-ते पाहा.? यास दुसरें प्रमाण.

येषुदेशेषुयेदेवायेषुदेशेषुयेद्विजाः ॥
येषुदेशेषुयत्तोयंयाचयत्रैवमृत्तिका ॥ १०० ॥
येषुस्थानेषुयच्छौचंधर्माचारश्चयादृशः ॥
तत्तत्रनावमन्येतधर्मस्तत्रैवतादृशः ॥ १०१ ॥
⊛ स्मृतिरत्नावलेरित्थंतथैवस्मृतिदर्पणे ॥
⊛ अस्तिधर्मप्रवृत्तेपिसाक्षात्धर्मस्यलक्षणं ॥
⊛ तस्मादाचारमानत्वंमतायुक्तंचमानय ॥१०२॥

अर्थ.—असें आहेकीं, ज्यादेशांत जे देव, व ज्यादेशांत जेब्राह्मण व ज्यादेशात, जें उदक, व ज्या देशांतील जी मृत्तिका, व ज्यास्थानीं जो पवित्रपणा, व ज्यादेशांतील जे आचाररूपधर्म हे जसजसे भिन्न असतील त्याप्रमाणें त्यात्यादेशांतील ब्राह्मणानीं ग्रहणकरावे.

आणि ते आचार तद्देशीय ब्राह्मणानीं ग्रहण केले, ह्मणून तेदोषी किंवा ते ब्राह्मणनव्हे, असें ह्मणवत् नाहीं, कारण तो त्याब्राह्मणाचा देशरूपधर्मच आहे, आणि ते ब्राह्मण आपला स्वदेशधर्मसोडून परदेशधर्म, (अन्यदेशांतील) ग्रहणकरितील तर ते दोषास पात्र होतील. असे आहे याप्रमाणें "स्मृतिरत्नावलींत, स्मृतिदर्पणांत व धर्मप्रवृत्तींत" ही, या आचाररूपधर्मांचीं लक्षणें विस्तारानें सांगितलीं, आहेत्, परंतु; विस्तार भयास्तव, येथें अल्प दाखविलीं. तस्मात् या सर्व आचाररूप धर्मावरून जें योग्य वाटत असेल ते मान्यकरावें. कारण,

यत्रशास्त्रगतिर्भिन्नासर्वकर्मसुभारत ॥
उदितेनुदितेचैवहोमभेदोयथाभवे ॥ १०३ ॥
तस्मिन्कुलक्रमायातमाचारंत्वाचरेद्बुधः ॥
सगरीयान्महाबाहोसर्वशास्त्रोदितादपि १०४
⊛ इत्थंसुमंतुवचनमपिसम्यक्निशम्यतां ॥
⊛ एवमाचारमानेनसंशयोनास्तिविप्रतः ॥१०५॥
⊛ भवतामपिआचारोभिन्नोभिन्नोहिदृश्यते ॥
⊛ तेनयुष्मदमस्माकमेकपंक्तिःकथंभवेत् ॥
⊛ तस्मादेतादृशींशंकावृथानोकुरुनोकुरु॥१०६॥

अर्थ.—जेथें धर्माविषयीं, शास्त्राचीगती भिन्न आहे, आणि अरुणोदयीं व सूर्योदयीं होमभेद आहे, तेथें, कुलक्रमानें जो आचारचालला असेल,तोच, आचार शाण्यापुरुषानें, किंवा पंडीतानीं, आचरणकरावा, असें आहे- आणि, सर्व, शास्त्रोक्तधर्मापेक्षां, कुलक्रमागत आचारधर्म हा श्रेष्ठअसून तो जे आचरण करतील ते पुरुष मान्यअसून, श्रेष्ठ आहेत. असे "सुमंतऋषीचें वचन

आहे" तें उत्तमप्रकारें करून श्रवण करावें. आतां यावरील धर्मशा- स्त्रानुसार देशाचारावरून, आमच्या सारस्वतकोंकणें उर्फशाण्णवी, यांच्या विप्रत्वाविषयीं, दर्शितकेलेल्या शास्त्रोदित धर्माचरणानुरूपन्याया- वरून, कांहीं एक संशय राहत नाहीं, आतां आमची आणि तुमची (चित्तपावनादिकांची) एक पंगत नाहीं? ह्मणून जी कांहीं कल्याणे- करूनें, शंका घेतली, ती अप्रयोजक असूनही व्यर्थ आहे. कारण, उभयतांच्या आचाररूपधर्मात भिन्नत्वअसून देशभेदही आहेत्. तस्मा- त्, या देशाचारप्रमाणें, उभयतांचे आचारभिन्न असल्याकारणानें, एक पंगतहोइलकसी? होणार, नाहीं. त्यांत गौडांची, आणि द्राविडांची, एक पंगत, जन्मापासूनच होत नाहीं, असेंअसून चित्तपावनासमवेत, गौडसारस्वतकोंकणें उर्फशाण्णवी हे, एक पंगत करतीलकसे ? तस्मात्,एक पंगत नाहीं ह्मणून, कोणाच्याही ब्राह्म- णत्वास, किंवा षट्कर्माधिकारत्वास कांहीं एक बाधक एतनाहीं. आतांएकपंगत होतनाहीं ह्मणून शाण्णवी हे ब्राह्मण नव्हे? असा जर कल्याणेकरूनें सिद्धांत केला असेल, तर, मागील सर्वशास्त्राधारा- वरून द्राविडादिकहे कोण ? याचा सिद्धांतकरावा. शिवाय केवळ अविचारानें अशा निरर्थक शंका घेऊन अर्हद्वयाच्या दोषास मात्र अधिकारी होऊनको. कारण.

किंचिरपरस्वंनहरेन्नाल्पमप्यानियंवदेत् ॥
प्रियंचनानृतंब्रूयान्नान्यदोषानुदीरयेत् ॥
⊕ इतिविष्णुपुराणोक्तंविचारयनिरंतरं ॥१०७ ॥

अर्थ—असें आहेकीं, दुसऱ्याचेंद्रव्य, तिळमात्रही, हरणकरूनयें, तसेंच, दुर्भाषणहीकरूनयें, आतां, खोट्यात्रोलण्यानें, यद्यपीदुसऱ्या- चेंप्रीयहोते,तथापी खोटेंभाषणकधींकरूनयें, आणि दुसऱ्याच्या न्यून्या-

धिक्यावरून, त्यांच्यादोषांचेंवर्णनकधींकरूनये. याप्रमाणें "विष्णु-पुराणांत" सांगितलें आहे. याचें निरंतर चिंतन करावें. नंतर-निंदा करण्यासप्रवृत्तव्हावें.

⊛ अतोनिंदास्वभावेननिंदितानामपित्वया ॥
⊛ अस्माकंदूषणंनास्तिनीतिशास्त्रेतथोदितं ॥१०८॥
नदूष्यंतेमहात्मानोदुर्जनानांकटूक्तिभिः ॥
काकमुखाशुचिक्षेपैर्हीरःकिंमलिनोभवेत् ॥१०९॥

अर्थ—आता, याजनादिकावरून किंवा, आपत्कालींकृषिवाणिज्यवृत्तीवरून किंवा पक्तीवरून दूषण देऊन आमच्यावर्गांस्थ सारस्वत-कोंकणेंडर्फेशाण्णवी ब्राह्मणाचीनिंदा यद्यपी चित्तपावनादिकानीं केली, तथापी, प्रदर्शितकेलेल्या सर्व शास्त्राधारावरून, व नितीशास्त्राप्रमाणें, आमच्यासारस्वतांस, काहिंएक दूषणलागूहोतनाहीं. कारण, याविषयीं दृष्टांतसांगतों. तोअसाकीं, कावळ्यानें, आपल्या अपवित्रमुखानें यद्यपी वारंवार हिन्याला, स्पर्शकेला तथापी त्यास्पर्शच्यायोगानें तोहिरामलीन, किंवा अपवित्र होतनाहीं. जसें तोहिरा अपवित्रहोतनाहीं कीं; त्याप्रमाणें यद्यपी चित्तपावनादिकानीं केवळद्वेषबुध्दीनेच, आमच्यासारस्वतांची निंदा केली; तथापी त्यानिंदेच्यायोगानें सारस्वत काहीं दोषीहोतनाहींत; कारण,

मलोत्सर्गंगजेंद्रस्यमूर्ध्निकाकःकरोतिचेत् ॥
कुलानुरूपंतत्तस्ययोगजोगजएवसः ॥११०॥
अधःकरोपियद्रत्नंमूर्ध्नाधारयतेतृणं ॥
दोषस्तस्यैवजलधेरत्नंरत्नंतृणंतृणं ॥ १११ ॥

अर्थ—मसें आहेकीं, कावळ्यानें मिहत्ती पेक्षा मोठा, असें मनात

आणून, हत्तीच्यामस्तकावर मलोत्सर्ग ( हगला ) केला; ह्मणून कावळा हत्तीपेक्षां मोठाझाला; असेंनाहीं, तर, त्याणें आपल्यादुष्टस्वभावे करून हत्तीच्यामस्तकावर जोमलोत्सर्गकेला, तोत्याच्या कुलाप्रमाणेंकेला. ह्मणून गज नीच, आणि कावळा श्रेष्ठ, असें नाहीं; तर याविषयींदृष्टांतपाहा; रत्नहें, अमोलीकअसून, समुद्र त्यारत्नास, खालीकरितो, ( बुडवीतो ) आणि तृणजें आहे तें, मस्तकावरधारणकरितो, ह्मणजे बुडवीतनाहीं, तर पाण्यावर तरते. ह्मणून हादोष त्यापदार्थाचानाहीं, तर, समुद्राचा आहे. कारण, वास्तवीकरितीनें, पाहिलें असतां, रत्नाला, आणि तृणाला किती अंतर आहे ! तस्मात्, असेंहे, अमोलीक रत्नअसून, समुद्रत्यासखालींटाकून, तृण वर धारणकरितो, ह्मणून रत्नाची योग्यता, तृणास येईलकाय? कधींयेणारनाहीं. आतां रत्नबुडविण्याचासमुद्राचास्वाभावीकगुण आहे. आणि ज्ञानी जे आहेत ते यापदार्थांच्या उंच नीचलाविषयीं, सहजचपरिक्षाकरीतात. त्याप्रमाणे चित्तपावनानीं नानाप्रकारच्याइंशकाघेऊन यद्यपी सारस्वतांवरदूषण स्थापून निंदाकेली; तथापीहा चित्तपावनादिकांचा, मुळचा स्वभाव आहे. याविषयीं सातवें प्रकरण पाहावें. आतां, यास्वभावानें, तुह्मीं (ह्म० ) चित्त० आमची निंदाकेलीह्मणून, सारस्वतनीच, आणि चित्तपावनश्रेष्ठ, असें कधींच होणारनाहीं. आतां चित्तपावनांच्या मनासमात्रभासतअसेल, तर आसो ! कारण.

हेपक्षिन्नागतस्त्वंकुतइहसरसस्तत्कियद्वोविशालं ॥
किंवद्वाम्नोपिवाढंतदतिशठमहापापमाब्रूहिमिथ्या ॥
इत्थंकूपोदरस्थःशपदितटगतंदर्दुरोराजहंसं ॥
नीचःप्रायःशठार्थोभवतिहिविपयानापरायेनदृष्टाः ११२

अर्थ—असें आहे कीं, राजहंसास बेडूकविचारितें कीं, हेपक्षा! तूं कोठून आल्यास, तें सांग? तेव्हां राजहंस ह्मणतो, मीसरोवरापासून आलों. तरतें सरोवरकेवढें मोठें आहे? राजहंस. तें मोठें आहे. बेडूक ह्मणतें कीं, माझ्याघरापेक्षा मोठें आहे? रा० होय. बेडूक ह्मणतें. हेदुष्टबुधे, राजहंसा! खोटेंबोलूनकों. याप्रमाणें विहिरींत वासकरणारा बेडूक राजहंसाची निर्भर्त्सना करिताझाला. सारांश, इतकाच कीं, ज्याणें, कांहींच पाहिलें नाहीं, त्यास, सर्व मिथ्यावभासत असतें, आणि सर्व जगांत मोठा व श्रेष्ठ कांहींतो मीच, असें त्याचे मनांत वाटतें. त्याप्रमाणें याचिदपावनाच्या मनासवाटून, त्यागवर्णि, हेतारत्वाची निंदा करीत असतील तर असोत.

त्वचेन्नीचजनानुरागरभसादस्मासुमंदादरः ॥
कानोमानदमानहानिरमिताभूःकिंत्वदेकःप्रभुः ॥
गुंजापुंजपरंपरापरिचयाद्भिल्लीजनैरुज्झितं ॥
मुक्तादामनधामधारयतिकिंकंठेकुरंगीदृशः ॥११३॥

© इत्थंहिनीतिशास्त्रेपुनीतिरुक्तामनीषिभिः ॥
© ततोनकापिहानिर्नोदूषितानामपिस्वया ॥११४॥
© गुणत्वेनोच्यतेयद्यद्युष्माभिःसकलंचयत् ॥
© भवताचरितंमेयदोषत्वेनैवभासते ॥ ११५ ॥
© इतिचेत्तवजासेततमोमयमतिस्ततः ॥
अधर्मंधर्ममितियामन्यसेतमसावृता ॥
सर्वार्थान्विपरीताश्चबुद्धिःसापार्थतामसी ॥
© इत्थंहिभगवद्गीतासारमर्थ्यदेवंमयोच्यते ॥११६॥

अर्थ—रवे असें ह्मणतात कीं, तूंजर, नीचजनावर प्रिति केली, आह्मावरील, आदर कमी केला, ह्मणून त्यांत आमची, हानी काय होणार आहे? कांहीं एक नाहीं, कारण तूं एकच प्रभू नाहीं-तर तुजसारखे किंबहुनातुजहून उत्तम असे अनेक प्रभू आहेत. पाहा! भिल्लिणी ज्या आहेत त्या नानाप्रकारचे गुंज्यांचे, अलंकार ग्रहणकरितात. आणि मुक्ताफलें टाकितात, ह्मणून, अन्य ज्या राजस्त्रीया, त्या, हीं, मुक्ताफलें कंठामध्यें धारण करीत नाहींत काय? यद्यपी भिल्लिणीनीं मुक्ताफलांचा त्यागकेला, तथापी तींच मुक्ताफलें, योग्य स्त्रीयांच्या कंठामध्यें, पावतात, व तेथेंच तींशोभलीं जातात. याप्रमाणें "नीतीशास्त्रोक्तवचन" आहेत. तस्मात् चित्तपावनहो! यद्यपी नानाप्रकारच्या दुष्टवृत्तीनींदूषणेदेऊन सारस्वत कौंकणें हे ब्राह्मण नव्हे, असें जरी ह्मणटलें, तथापी, यासारस्वतांच्या विप्रत्वाविषयीं सिद्धांत करणारे, विद्वज्जन काशीपासून रामेश्वरापर्यंत, अनेक सांपडतील, व सांपडतात. वास्तव चित्तपावनादिकानीं जरी आमची निंदा केली तथापी दर्शविलेल्या या सर्व शास्त्राधारावरून, आमची कांहींएक हानीं होत नाहीं. कारण हा चित्तपावनादिकांचा स्वाभावीकगूण आहे. आतां, गुणलेकरून जें तुमचे वर्णन मी केलें तें तुह्मास, (चित्तपावनास) दोषलानें केलें असें मनांत भासत असेल, तर ते योग्यच आहे. कारण, तमोवृत्तीचागूण सत्ताच आहे. याविषयीं प्रमाण असें आहे कीं, कृष्ण, अर्जुनाप्रत ह्मणतात कीं, हे अर्जुना! अधर्मास धर्ममानण्याची जी बुद्धी व सर्वार्थांवर विपरीत मानणें अशीजी, बुद्धी ती तमोगुणानें युक्त आहे ह्मणूनती तामशी बुद्धी असें, ह्मणतात. याप्रमाणें गीतावचन आहे. आणि, चित्तपावनादिकाचें बोलणें तर, यावाक्यास अनुकूल होऊन आहे, कारण

( आत्मवत्सर्वभूतानीं ) तसे तुमचा ( चित्तपावनादिकांचा ) बोल-ण्याचा भावार्थ दिसतो. याचें कारण ?

गुणिनिगुणज्ञोरमतेनागुणशीलोपिगुणिनिपरितोषः॥
अलिरेतिवनात्कमलंनदर्दुरस्तेकवासोपि ॥११७॥
गुणागुणज्ञेषुगुणीभवंतितेनिर्गुणंप्राप्यभवंतिदोषाः॥
सुस्वादुतोयाःप्रवहंतिनद्यःसमुद्रमासाद्यभवंत्यपेयाः ॥
११८॥ गुणायंतेदोषाःसुजनवदनेदुर्जनमुखेगुणादो
षायंतेद्वयमिदमभूद्विस्मयपदं॥ महान्मेघःक्षारंपिबति
कुरुतेवारिमधुरंफणीपीत्वाक्षीरंवमतिगरलंदुः सहतरं
॥ ११९ ॥अश्वःशस्त्रंशास्त्रंवीणावाणीनरश्चनारीच॥
पुरुषविशेषंप्राप्ताभवंतियोग्याअयोग्याश्च ॥ १२० ॥
® इत्यादिनीतिशास्त्रोक्तबहुवाक्यानुसारतः ॥
® तवनिर्गुणतातत्रकेवलंकारणंभवेत् ॥ १२१ ॥

अर्थ—असें आहे कीं, जो गुणी पुरुष असतो, तो, गुणवान् पुरुषाजवळ रममाण होतो. आणि, निर्गुणी पुरुषापासीं, यद्यपी गुणवान् पुरुषाचें, सानिध्य आहे, तथापी, त्यागुणवान् पुरुषास पाहून, निर्गुणी पुरुषाच्या मनास, आनंद होत नाहीं. पाहा ? यास दृष्टांत असा आहे कीं, भ्रमर जो आहे तो, कमलांचे गुण ग्रहणकरण्याच्या इच्छेनें, वनापासून, तलावाच्या जवळ येऊन, त्यातलावांतील, कमलावरबसून, त्याचागुणग्रहणकरीतो. आणि ज्यातलावांत कमल आहे, त्याच तलावांत बेडूकही, वासकरितें, परंतु; तें निर्गुणी असल्याकारणानें, त्याकमलांतील गुणांचें ग्र-

हणकरीत नाहीं. आणि त्यागुणापासून त्यांदूकाला आनंद-
ही होतनाहीं. सारांशकाय! जोनिर्गुणी असतो, तो गुणज्ञा-
स जाणत् नसून उलट त्याची निर्भत्सनामात्रकरण्यास तत्पर अस-
तो. ११७ आणि जेगूण आहेत, ते, गुणी पुरुषाप्रत पावले
असतां, गुणींचहोतात. आणि तेचगूण, निर्गुणी पुरुषाप्रत गेले.
असतां दोषप्राय होतात. पाहा? मोठमोठ्यानद्या, चांगल्या, स्वा-
दिष्ट, मधूर, उदकानें, भरलेल्या असतात्. परंतु ; क्षारोदकानें
भरलेल्या महासमुद्राप्रतगेल्या असतां, तो त्यांचा मधूरगूण नाहींसा-
होऊन, क्षारोदकी होतात, ( खारट ) ११८ आतां, गूण किंवा
दोष हे, सुजन किंवा दुर्जनयांचे मुखींगेले असतां, तेत्यांच्या स्वभा-
वाप्रमाणें होतात. ह्मणजे यद्यपी गूण आहेत, तथापी दुर्जनाचे
मुखींते दोषहोतात. आणि यद्यपी दोष अहेत्, तथापी सुजना-
चेमुखी तें गूण होतात. तर तेकसे? असें ह्मणाल, तर, पाहा.?
समुद्राचें उदक क्षार ( खारट ) आहे, परंतु; सुजन जो मेघ त्याक्षा-
रोदकातें प्राशनकरीतो. नंतर, तेंचक्षारोदक, वर्षाॠतूमध्यें, मधूर-
होऊन, पृथ्वीवरपडतें. आणि दूध हें स्वतांमधूर असून, दुर्जनजोसर्प,
त्याच्या मुखाप्रत गेलें असतां, मधूरत्वजावून तें विषहोतें.] याप्रमाणें
दुर्जनाचास्वभाव असतो. ११९ त्याचप्रमाणे, घोडा, शास्त्र, शस्त्र,
वीणा, वाणी, नर, आणि नारी, याइतक्यावस्तु ज्या रितीच्या पुरुषा-
प्रत असतील, त्या, त्यापुरुषाच्यास्वभावाप्रमाणें, योग्य किंवा अयो-
ग्यहोतात. ह्मणजे, योग्यपुरुषाजवळ असल्या तर योग्यहोतात.
आणि अयोग्यपुरुषाजवळ असतीलतर अयोग्यहोतात. याप्रमाणें दु-
र्जनसंगतीची महिमा आहे. १२० याप्रमाणें " नीतिशास्त्रआहे"
यास्तव कल्याणेच्छूबुवा! जेंकांहीं, आपण जगन्मित्र पत्रद्वारेंकरून
बोलला! तें यानीतीशास्त्रास अनुसरून आहे. कारण, यासर्ववाक्यां-

वरून व तुमच्याच न्यायावरूनहो, तुमचें निर्गुणत्वसिद्धहोतें. यांत संशय नाहीं.

आतां मी जें कांहीं लिहिलें तें तुमच्याचित्तपावनादिकांस कधीं इष्ट होणार नाहीं, कारण असें आहे कीं.

उपदेशोहिमूर्खाणांप्रकोपायनशांतये ॥
पयःपानंभुजंगानांकेवलंविषवर्धनं ॥ १२२ ॥

अर्थ—मुर्खजनास उपदेशकेला असतां, क्रोधउत्पन्न होतो. परंतु; उपदेशाच्या योगानें ते शांततायुक्तहोतनाहींत. पाहा? दूध हें चांगलें असून, सर्पास पाजीलें असतां, दुधाच्यायोगानें केवळ विषाचीवृद्धी-होती, परंतु; विषाची शांतीहोतनाहीं. याप्रमाणें " नितीशास्त्र-आहे." तसें तुमच्यालोकांस ( चित्तपावनादिकांस ) कितीजरी उपदेशानुरूप शास्त्राधार सांगितले, तथापी तुमच्या मनाची शांतता होतचनाहीं. कारण.

अज्ञःसुखमाराध्यःसुखतरमाराध्यतेविशेषज्ञः ॥
ज्ञानलवदुर्विदग्धंब्रह्मापितंनरंनरंजयति ॥ १२३ ॥

अर्थ—असें आहे कीं, अतीअज्ञपुरुषास, एक सुखशातीहोती. किंवा, अती सुज्ञास एक सुखप्राप्तिहोती. आतां अर्धवट पुरुषास, ( ह० ) केवळ अज्ञहीनव्हे, किंवा, सुज्ञही नाहीं, अशाप्रकाच्या पुरुषास, सुखप्राप्ति कोठून ? आणि, अशाअर्धकड्या पुरुषाचें शांतवन करण्याविषयीं, साक्षात् सर्वांचा पितामह जो ब्रह्मदेव, तोही समर्थ होत नाहीं. कारण त्याचे, स्वाभावीक गुण आहेत. याप्रमाणें, "नितीशास्त्रआहे" तस्मात् या सर्व शास्त्राधारावरून, चित्तपावनादिकांचें, शांतवनकरण्याविषयीं, महत्प्रयत्न केला, तथापी, कल्याणेच्छू आदिकरून सर्व चित्तपावनादिकाचें शांतवन बिल्कुल

होत नाहीं- कारण, चित्तपावनादिकाचे, हे स्वाभावीकगूण आहेत. तर, अशा पुरुषांचे शांतवनहोत नाहीं, याविषयीं दुसरे आधार आहेत.

लभेतसिकतासुतैलमपियत्नतःपीडयन् ॥
पिबेच्चमृगतृष्णिकासुसलिलंपिपासार्दितः ॥
कदाचिदपिपर्यटन्शशविषाणमासादयेत् ॥
नतुप्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥ १२४ ॥
प्रसह्यमणिमुध्दरेन्मकरवक्त्रदंष्ट्रांकुरात् ॥
समुद्रमपिसंतरेत्प्रचलदूर्मिमालाकुलं ॥
भुजंगमपिकोपितंशिरसिपुष्पवद्धारयेत् ॥
नतुप्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥ १२५ ॥

अर्थ—तें असें कीं, पाहा, प्रयत्नेकरून रेतीचें तेल काढतांयेइल. तसेंच ताहान ज्यासलागली त्यास मृगजळापासून उदकही प्राप्त होइल. कदाचित्, पर्यटनकेले असतां, शशाचें शिंगहीमिळेल. तसेंच सर्वांसभिती दाखविणारा, असा जोमगर, आणि त्यामगराच्या, मुखापासून, कर्षनघेणारा, असा जरीमणि आहे, तथापी तो प्रयत्नेंकरून मिळेल. आणि, महानसमुद्र वायुच्यायोगानें, यद्यपी तुफानानें, पूरीत आहे, तथापी त्यांत तरतां येईल. आतां, महादुष्ट असून विषकारक जो भुजंग ( सर्प ) तो यद्यपी कोधानें युक्त झाला तथापी मंत्र तंत्राच्या योगानें पुष्पाप्रमाणें मस्तकावर धारणकरितां येईल. साराशकाय, अघटीत ( असाध्य ) असेजरी विषय आहेत; तथापी प्रयत्नाच्या योगानें प्राप्त होतील. परंतु; मूर्खजनाच्या, मनाचें समाधानकरितां येणार नाहीं. याप्रमाणें "नीतीशास्त्र आहे".

तस्मात् चित्तपावनादिकहो.! तुम्हीं यावरील वचनाच्या सवय्या चरणाप्रमाणें जर शंका घेऊं लागले, तर तुमचें समाधान कसें होईल ! होणार नाहीं. कारण,

निमित्तमुद्दिश्यहियःप्रकुप्यतिध्रुवंसतस्यापगमेप्रसिध्यति ॥ अकारणद्वेषिमनोस्तियस्यवाकथंजनास्तंपरितोपइष्यते ॥ १२६ ॥

नीतिशास्त्रानुरीत्यात्वत्पक्षेदोषोभवेद्ध्रुवं ॥
कदाप्यकीर्तनीयत्वादप्युच्यंतेनतेमया ॥ १२७ ॥
परंतुदेशाचारत्वरूपेणस्वीकृतामया ॥
विज्ञानार्थप्रकाशंतेकेचिद्दोषामयातव ॥ १२८ ॥
अन्येपिदोषावर्ततेसर्वत्रत्वलवत्तराः ॥
कीदृशाइतिपृच्छायांसमाधानमथोशृणु ॥१२९ ॥
दोषश्चकरहाटेषुविषेणान्यस्यमारणं ॥
चित्तपावनपूर्वेषुलांगलाकर्षणादिकाः ॥ १३० ॥
अतोनोभवतांचैवपंक्तिरेकाकथंभवेत् ॥
तस्मात्कुतर्करूपेणशंकांनोकुरुनोकुरु ॥ १३१ ॥
अतोनपंक्तित्यागोनोविप्राणामपिद्वेषणं ॥
अदृष्टमन्यविप्रेषुभिन्नमाचरणादिकं ॥ १३२ ॥
नास्मासुकेवलेष्वस्तिकिंत्वन्येष्वपिदृश्यते ॥
देशाचारस्ततःशिष्टाचारत्वादपितस्यच॥१३३ ॥
भिन्नस्याचरणस्यापिधर्मताशिष्टसंमता ॥

⊙ नानाविचित्रदेशस्थस्वामिमाहात्म्यतोयथा॥ १ ३४॥
⊙ नानादेशीयविप्रेषुयुक्तमस्मासुनस्तथा ॥

अर्थ.–असें आहेकीं, निमित्ताच्या उद्देशावरून, जो रागावतो, त्याचाराग शेवटास जातो; आणि त्याचे समाधान ही करितां येते. परंतु; निमित्तावांचून, केवळ द्वेषान्वेष, भांडण्याचें मत ज्याचें असतें; त्याचें समाधान लोक कसें करितील ? याप्रमाणें नीतिशास्त्र आहे. आणि त्या नीतिशास्त्राप्रमाणेंच तुमच्या, (चित्तपावनादिकांच्या) दोषाची गणना होऊन या चवत्याचरणाच्या दोषास, चित्तपावनादीक निश्चयेंकरूनच पात्र होतात्. आणि हे दोष वर्णनकरण्यासही अयोग्य असेही आहेत्. परंतु; मीं ते देशाचार रूपानें ग्रहण केले. अस्तु देशाचार रूपाप्रमाणें समजून प्रकाशितका केले? (छापलेका?) ह्मणून शका कराल. तर हे तुमच्या (चित्तपावनादिकांच्या) ज्ञापनार्थ छापविले आहेत्. आणखी या चित्तपावन कराड्यादिकांचे, अन्यदोष सर्वत्रठीकाणीं आहेत्. ते कसे आहेत् ह्मणाल तर सांगतों श्रवणकरा, कराड्यांचे दोष असे आहेत्कीं, विष प्रयोगेंकरून, अन्यास (सत्पात्र ब्राह्मणास मारणें) आणि याविषयींचा विस्तार आठव्या प्रकरणांत पाहा ? तसेंच चित्तपावनामध्यें, लांगलाकर्षण (नांगर स्वतांधरणें) आणिखि यांचे दुसरे दोष सातव्याप्रकरणांत पाहा? तस्मात्, असे हे महान्महान् दोष, यांच्या (ब्र० ) चित० ठीकाणीं असण्याचे प्रत्यक्षलेंकरून सर्वब्राह्मणमात्रांस दिसतात् असें असून, चित्तपावनादिकांची आणि सारस्वतांची एक पंगत होइल कसे? सर्वथा होणार नाहीं. तस्मात् कल्याणेच्छुवा ! अशाया कुतर्क रूपशाका घेऊन ब्रह्मद्वेषादोषास मात्र पात्र होऊनका. आतां चित्तपावनाची आणि सारस्वतांची एक पंगत होत नाहीं. हेंठिकच आहे ! परंतु; अन्यब्राह्मणाची आणि सारस्वतांची एक पंगत कां नाहीं? ह्मणून

शंका कराल. परंतु, या शंकेचे समाधान पूर्वीच विस्तारानें सांगितलें आहे त्याचा विचार करावा तस्मात् या पंक्तिशब्दावरून ब्राह्मणास किंवा षट्कर्माधिकारास, काहींएक बाधक नाहीं. आणि हीगल्ला केवळ वदामीयूनवन् असून अप्रयोजक आहे हें खरें किंवा खोटें याचा विचारकरूनपाहा ? ह्मणजे समजेल. कारण, अशायाग्रहद्वेषानें कोणत्यायोनीप्रत जाल ? याचा निश्चय नाहीं.

भद्रंभद्रमितिब्रूयाद्भद्रमित्येववादयेत् ॥
शुष्कवैरंविवादंचनकुर्यात्केनचित्सह ॥ १३५ ॥

अर्थ.—तस्मात् कल्याणेच्छूहो ! जो तुह्मास वादकरणें असेल तो शास्त्ररीतीनें दृढ, व, निश्चय लोंकरून सत्यज्यात असेल, व ज्यावादापासून पक्ष सिद्धीप्रत पावेल, अशायुक्तीनें वादकरा आणि धर्मशास्त्रातही याच प्रमाणें सांगितलें आहे. तेंअसें कीं, सत्य असेल तेंच बोलावें, व वादकरावा, तर तो सत्परीतीनेंच करावा. परंतु; शुष्कवैरानें, किंवा कुत्सितानें कोणाचीही निंदा करण्यात प्रवृत्त होऊनयें याप्रमाणें धर्मशास्त्रही आहे तर, याधर्मशास्त्रप्रमाणें वादकरून आपला पक्ष, सिद्धकरून घेण्यास समर्थव्हा कारण ईश्वरानें उत्तमप्रकारची नरतनू दिली असून तीकसी आहे त्याविषयी प्रमाण सांगतों

मानुष्यंनहिलभ्यतेपदयुगानाहस्ततोनोमुखा ॥
नोगरयानचकर्मणानवपुषानोहारपुष्पादिभिः ॥
किंतूक्तिर्मधुरापरोपकरणदानंयशःपौरुषं ॥
चातुर्यंसकलेष्वतातिगुणवत्केनाप्यहोलभ्यते ॥१३६॥
मानुष्येसतिदुर्लभापुरुषतापुंस्त्वेपुनर्विप्रता ॥
विप्रत्वेबहुविद्यताहिसुलभाविद्यावतोर्थज्ञता ॥

अर्थज्ञस्यसमस्तशास्त्रपटुतातत्रापिलोकज्ञता ॥
लोकस्यास्यसमस्तशास्त्रविदुषोधर्मामतिर्दुर्लभा १ ३ ६॥
⊛ इतिनीतिसमालोच्यदीयतेयोत्तरःकथं ॥
⊛ अस्तुतत्रापिसत्यत्वंनास्त्यहोपंडितादयः ॥
⊛ इदमयोग्यंभवतामस्तिनास्तिविलोकय ॥ १ ३ ७ ॥

अर्थ–पाहा! हें मनुष्यत्व प्राप्त होतें, तरें, परंतु; हस्तपादादिकेंकरून किंवा मुखानें, किंवा चालण्यानें, कर्मेकरून, चांगले सुदृढ किंवा गौरवर्णानें, किंवा शरीरानें, किंवा हार, फुलें, इत्यादीक अलंकारानीं, हें मनुष्यत्व प्राप्तहोतें, असें नाहीं. तर, असें आहे कीं, परोपकारी जीं भाषणें, तसेंच, शरीरानेंही परोपकारकरितो, यानें यशसपादनकरण्यानें, किं० पराक्रमानें, किं० चातुर्यानें, तसेंच, सर्वांचें अहीतन इच्छिता हिताचीइच्छा करण्यानें, आणि सर्वांबरोबर इष्टठेवण्यानें, अशाया सर्वगुणानीं युक्तजो पुरुष; त्यासच मनुष्यत्व प्राप्तहोतें, झणजे हेंगूण ज्यापुरूषाच्याआगीं असतात; त्याचपुरूषाला मनुष्य असें ह्मणतात्. आणि तो सर्वांस मान्यही असतो. विना चांगला सुरेख अवयवानीं धष्टपुष्ट, आणि मीठें एकुनाय ठेऊघेतलें ह्मणून तोयामनुष्यत्वास योग्यहोतो, असें नाहीं. कारण असें आहेकीं, हीनरतनू प्राप्तहोण्यांस, फारच प्रयास लागतात्, आणि ही अतिदुर्लभ असून यद्यपी प्राप्त झाली, तथापी पुरुषत्व प्राप्त होणें हेंही कठीन आहे, अस्तु, तेंहीप्राप्त झालें, तथापी त्यांत द्विजत्व प्राप्त होणें हें कठीन; कर्मे करून तेंही प्राप्तझाले, तथापी, विद्वत्ता प्राप्तहोणें, आणि त्याविद्वत्तेमध्यें अर्थज्ञता प्राप्त होणे हेंहीं दुर्लभ, त्यांत अर्थज्ञअसून, सर्व शास्त्रांत कुशलत्वयेणे हेंअती दुर्लभ, कुशल असून, चातुर्यता प्राप्तहोणें हें सर्वांत दुर्लभ, असें हें चातुर्यही असून समस्त शास्त्र जाणणारा, बुद्धीमान्आहे, असें ह्मणून घेणें, हेसर्व दुर्लभातून्दुर्लभ, याप्रमाणें " नितीशास्त्रांत " उत्तरोत्तर दुर्लभ पक्ष आहेत्. तस्मात् कल्याणेच्छुहो! या इतक्याप्रकारानीं हीनरतनू दुर्लभअसून, त्यांततुह्मी सांप्रत

द्विज असेंही ह्मणून घेतअसून धर्माधर्माच्या ठीकाणीं विचारहीकरितां, आणि तुह्मांस लोक शास्त्रज्ञ, असेंही ह्मणतात्. याप्रमाणें ( मानरीति नितीशास्त्राप्रमाणें ) कांहीं गूणतुमच्या अंगभूतहीअसून, त्यांत कल्याणेच्छू ! असें हें सर्वगुणांत. श्रेष्ठ गूणकारक नामही धारणकरून घेतअसून. अशायाकुतर्कानें उत्तर करेंहोदेतां? अहो! कल्याणे च्छूहीकपडीतहो ! तुमच्या उत्तरांत कांहींतरी सत्यत्व असून अर्थतरी आहेकाय.? आरंभापासूनच शशाविषाणन्यायाप्रमाणें, आपला पक्ष सिद्धकरू पहतां!! अशायाकुयुक्तीनें पक्ष कोठें सिद्ध होतो काय? व अद्यापपर्यंत झालेला आहेकाय? तस्मात् अशापापिशाचरूपशाका घेऊन जे तुह्मी सारस्वतावरावर भांडतां; हेंतुह्मास अयोग्य आहेकिंवा नाहीं याचा स्वस्थचित्ताने विचारकरा नाहींतर ( नाहेकागतमपिकुटिल- नभवतिमरलशुन.पुष्ठ ) यावचनाप्रमाणें मात्र करूंनका.

आतां मी जें हें उपदेशानुरूप भाषणलिहिलें आहे ह्मणून तुमच्या- मनास चित्तपा० क्रोध येईरूच, परंतु; क्रोधआल्यास, पाहिजेतसें बोला, परंतु तुह्मी आपला मूळचास्वभाव सोडा. आणि शास्त्र रितीनें भांडण्यास सिद्धव्हा. केवळ एकाच पिसानें मयूर होण्याची इच्छा करूंनका. कारण व्यासादिकांनीं जीं कांहीं धर्मशास्त्रें व पुराणेंकरून ठेविलीं, तीं केवळ यामनुष्योसाठीच असून, हीतकारक आहेत्. तर त्या धर्म शास्त्रांचा परित्यागकरून केवळ दंतकथा घेऊन भांडण्यास समर्थ होऊंनका.

इतिकेण्योपाव्हनारायणसूनुलक्ष्मणविरचिते ॥
श्रीमद्दशप्रकरणेवृत्यादिपंक्तिभेददर्शितनामचतुर्थप्र
करणंसमाप्तं ॥



# प्रकरण पांचवें.



⊛ श्रीरामचरणंनत्वासर्वसिद्धिप्रदायकं॥
⊛ व्यवहारप्रकरणंपंचमंक्रियतेमया ॥ १ ॥
⊛ शुद्धकोंकणविप्रत्वेप्रमाणंदर्शितंचयत् ॥
⊛ दृष्ट्वातदापूर्वपक्षीकश्चिदित्थमुवाचह ॥ २ ॥

**अर्थ.**—आतां, सर्व विघ्नाची शांतीहोऊन, सर्व सिद्धिप्रदायक जो रामचंद्र त्याच्याचरणाप्रत नमस्कारकरून, व्यवहारनामक या पांचव्या प्रकरणास मी आरंभ करितो. आणि, वादींच्या मनाची शांती होण्यास्तव शुद्ध कुकोण देशांत राहणारे जे सारस्वत कोंकणे (शाण्णवी) ब्राह्मण यांच्या विप्रत्वाविषयीं, शक्त्यानुसार, षोडश हेत्वानुरूप जे संस्कार, त्यास अनुकूल भूत. जीसप्रमाणे, तीं सर्व प्रगट केलीं, परंतु तींप्रमाणें पाहून, वादीजे चित्तपावनादिक, व त्यांतील कोणीएक पुनः शंका करिता झाला. तो अशीकीं,

⊛ अहोशाण्णविजातीयाजनाःशृणुतमद्वचः ॥
⊛ प्रमाणसिद्धंभवतांब्राह्मण्यंविद्यतेयदि ॥ ३ ॥
⊛ व्यवहारःकथंनस्यात्ब्राह्मणाब्राह्मणादिति ॥
⊛ यदस्तितस्यतत्वेनव्यवहारोस्तिभूतले ॥ ४ ॥
⊛ ब्राह्मणाब्राह्मणाइत्थंव्यवहारोयथाहितः ॥
⊛ कोंकणाःशाण्णवीइत्थंव्यवहारोस्तिवस्तथा॥५॥
⊛ केयूयमितिपृच्छायांब्राह्मणाइतिनोच्यते ॥

⊙ किंतर्हिब्राह्मणाइत्थंभवद्भिरपिवाच्यते ॥ ६ ॥
⊙ इत्थंस्ववचनेनापिसमस्तव्यवहारतः ॥
⊙ कौंकणत्वंवचःसिद्धंब्राह्मण्यंनकदाचन ॥ ७ ॥
⊙ भवद्भिराग्रहेणाप्यब्राह्मणाइतिभाष्यते ॥
⊙ तदप्रयोजकंत्वान्यवचनानांविरोधतः ॥ ८ ॥

अर्थ.—अहो! शाण्णवीय जातिस्थलोकहो! माझें वचन ऐका? सर्व शास्त्राधारदाखवून, शाण्णवी लोकांचें, ब्राह्मण्य सिद्ध आहे, असें, जर तुह्मी ह्मणता, तर तुमच्यामध्यें, हे ब्राह्मण; असा व्यवहार का, नाहीं? आणि, या जगांतत्तर, ब्राह्मण, ब्राह्मण, असा खरोखर व्यवहार आहे. असू, जर तुह्मास कोणीं विचारिलें असता, आह्मी, शेणवी, कोंकणें, बारदेसकर, कुडाळेकर सारस्वत, असें तुह्मी ह्मणता, परंतु; आह्मी ब्राह्मण; असाखरोखर व्यवहार दाखवीत नसून, सांप्रत आह्मी ब्राह्मण आहों, ह्मणून तुह्मीं, का वरैवाद करिता? तस्मात्, या तुमच्याच भाषणावरून, कोंकणें, व शाण्णवी इत्यादीक व्यवहारच सिद्ध होतो, परंतु; ब्राह्मण असा व्यहार तुमच्या ठिकाणीं सिद्ध होत नाहीं. असें असून; जर, तुह्मी आग्रहानें ओढाताण करून आह्मीं ब्राह्मण अहों! असें जर, तुह्मी ह्मणून घेता, तर, तें निष्कारण असून अन्यवचनास विरोध येतो. तो कसा ह्मणाल? तर,

⊙ ब्राह्मणाइतिवानास्तिव्यवहारःकदाप्यतः ॥
भवतांब्राह्मणपदेशक्यत्वंनैवयुज्यते ॥ ९ ॥
शक्तिग्रहंव्याकरणोपमानकोशाप्तवाक्याद्व्यवहार
तश्च ॥ वाक्यस्यशेषाद्विवृतेर्वदंतिसान्निध्यतःसि-
द्धपदस्यवृद्धाः ॥ १० ॥

⊛ इत्युक्तेव्यवहारोपिहेतुःशक्तिग्रहोमतः ॥
व्यवहारंविहायान्यत्कोशव्याकरणादिकं ॥ ११ ॥
भवत्सुब्राह्मणपदंशक्तिग्राहकमस्तिन ॥
व्यवहारश्चनास्त्येवततःशक्तिग्रहःकथं ॥ १२ ॥
स्वाभाविकोहिसंबंधःशक्तिरित्येवभण्यते ॥
नतुचिंतामणिप्रोक्ताशब्दादस्मादयंस्वटा ॥१३॥
अर्थोज्ञेयइतिछात्मसंकेतःशक्तिरुच्यते ॥
गंगाशब्दादयंस्रोतस्तीरंप्रत्येत्विवतिछया ॥१४॥
गंगाशब्दस्यप्रयोगाच्छक्तिर्लाक्षणिकीभवेत् ॥
⊛ एतच्चव्यासराजेंद्रैर्विस्तृततर्कतांडवे ॥ १५ ॥
व्यक्तेर्जातिविशिष्टायाः शक्यत्वेपिलघुत्वतः॥
प्रथमोपस्थितत्वाच्चशक्तिज्ञानस्यहेतुता ॥ १६ ॥
जात्यंशएवविज्ञेयःप्राभाकरमतेपिवा ॥
आनंत्यव्यभिचाराभ्यांव्यक्तौशक्तिग्रहोनहि॥१७॥
जातिरेवततःशक्यालक्ष्याव्यक्तिस्तुजातियुक् ॥
आक्षेपलभ्यावासास्यादितिभाट्टमतेपिवा ॥१८॥
जात्याकृतिविशिष्टातुपदार्थोव्यक्तिरिष्यते ॥
⊛ इतिनैय्याइकाद्युक्तपक्षांगीकरणेपिवा ॥१९ ॥
वाच्याव्यक्तयएवास्युःप्रत्येकंजातिपूर्वकं ॥
तेपुतेपुचशब्देपुप्रवृत्तेर्हेतुरुच्यते ॥ २० ॥

⊛ इत्थंहितत्त्ववायुक्तरीत्यंगीकरणेपिवा ॥
शक्तिग्रहोखिलेर्वृद्धव्यवहारस्त्वपेक्ष्यते ॥ २१ ॥
अतःशक्तिग्राहकस्यव्यवहारस्यसर्वदा ॥
⊛ अभावतःकोंकणानाव्राह्मणत्वंनसिध्यति ॥२२॥

अर्थ--असें आहे कीं, तुह्मींब्राह्मण ह्मणून लोकव्यवहार नसल्याकारणानें, ब्राह्मणशब्दहा तुह्मास लागतनाहीं. कारण, अमुकअर्थी, ( अमुकठीकाणीं ) अमुकशब्दाची शक्तीआहे, असें समजण्याविषयीं, कारणें पुष्कळ आहेत, त्याचा प्रकारसांगतों. ती असीं, व्याकरण, उपमान, कोश, आप्तवाक्य, व्यवहार, वाक्यशेष, व्याख्यान, सिद्धपदार्चे सानिध्य, इतकीं कारणें आहेत्, ह्मणून "ज्ञानवृद्धसांगतात्" तर, या इतक्याकारणापैकीं, जो व्यवहार, तो खेरीजकरून, व्याकरण कोशवगैरे, तुह्मास ब्राह्मण ह्मणण्याविषयीं, संभवत नाहींत. आता, मुख्यकारणजो व्यवहार, तोंही, तुह्माविषयीं संभवतनाहीं. तर तुह्मास ब्राह्मण, कसेंह्मणावें? ह्मणवत् नाहीं. कारण, शक्तीनाहीं. तर, शक्तीह्मणजे असें आहे कीं, शब्दाच्या अर्थाशीं, जो संबंध असतो, त्याला शक्तीह्मणतात्. आतां, चिंतामणिग्रंथांतील प्रकार काहींशक्तीनव्हे. तर, तो असाआहे कीं, अमुकशब्दापासून, अमुक अर्थ, असा बोधहोण्याविषयीं, जो संकेत, त्याला शक्तीह्मणावी. आता, गंगाशब्दापासून, तीराचा बोधइच्छिणारानें, प्रयोग केलेला, गंगाशब्दास, ती, रार्थी जी शक्ति, तिला लाक्षणिकी ह्मणावी. आणि हाजोप्रकारसांगितला तो, "तर्कतांडवग्रंथामध्यें व्यासराजेंद्रनामकपुरुषानें" विस्तारेंकरून, सांगितला आहे. आता, जात्याकृतिविशिष्ट व्यक्तीन, शब्दाचा अर्थ अंगीकार करणारी आहे, तथापी, व्यक्तीपेक्षा,

जातीस अर्थ ह्मणण्यानें लाघवअसून व्यक्तीपेक्षां जातिचेज्ञान प्रथमता पाहिजे, कारण, शक्तिज्ञान, शाब्द बोधाप्रत कारण आहे. तर "प्राभाकर" मतीं, शब्दाचाअर्थ जातीच, ह्मणावी. १७ आतां "भट्टमताप्रमाणें" जातहीच शब्दाचो शक्यार्थ आहे. आतां व्यक्तिलाभ, जो आहे तो लक्षणानें होईल अथवा, आक्षेपानें, जातीविशिष्ट व्यक्तिलाभ होईल. १८–१९–२० तस्मात् अह्मांया, तत्ववादीनीं सांगितलेल्याप्रकारावरून, तुमचें ब्राह्मणत्व सिद्ध होतनाहीं. कारण, शक्तिज्ञानहोण्याविषयीं, व्यवहारच, मुख्य कारणहोय तर, तो व्यवहार तुमच्यामध्यें, नसल्याकारणानें, ब्राह्मणत्व सिद्ध होतनाहीं. २१–२२–

॥ अस्तुवाव्यवहारोपिभवतांब्राह्मणाइति ॥
तथापिविप्रतावोनसोन्यथाप्युपपद्यते ॥ २३ ॥
अपत्यार्थीप्रत्ययांतोब्रह्मापत्यस्यवाचकः ॥
अयंब्राह्मणशब्दश्चनरूढःकिंतुयौगिकः ॥२४ ॥
ब्राह्मणोब्रह्मणोपत्यमित्थंहिमुकुटोक्तितः ॥
अन्यार्थरत्वस्यवर्णेषुचतुर्ष्वपिहिसंभवेत् ॥२५ ॥
ब्राह्मणोस्यमुखमासीद्बाहूराजन्यःकृतः ॥
ऊरूतदस्ययद्वैश्यःपद्भ्यांशूद्रोअजायत ॥२६ ॥
॥ इत्थमस्तिश्रुतिर्ब्रह्मापत्यतास्त्वखिलेष्वतः ॥
नैवशक्यश्चरूढिंचक्षमांयोगस्यबाधने ॥ २७ ॥
रूढिर्लब्धात्मिकायोगंबाधतेतत्वलब्धिका ॥
तत्रैवचात्मलाभोस्यायत्रनावयवार्थता ॥ २८ ॥

यथावृक्षेश्वकर्णस्यरूढिर्योगस्तुनोभवेत् ॥
सत्सुत्ववयवार्थेपुततएवोपपत्तितः ॥ २९ ॥
अर्थापत्तिःपरिक्षीणानक्षमाशक्तिकल्पने ॥
यौगिकःप्रोक्षणीशब्दोनिर्मध्यपदमप्पर्त ॥३० ॥
© इत्थंहिकथितंब्रह्ममीमांसायांविचारय ॥
अक्षरैरेवबुध्यंतेसमुदायप्रसिद्धिपु ॥ ३१ ॥
अर्थभागोपसंहारादित्तराविप्ररूप्यते ॥
असत्स्ववयवार्थेपुयोन्यत्रार्थप्रयुज्यते ॥ ३२ ॥
तत्रानन्यगतित्वेनसमुदायःप्रसिध्यति ॥
भवेतांयदिवृक्षस्यवाजिकर्णौकथंचन ॥ ३३ ॥
अदृष्टःसमुदायस्यकःशक्तिजातुकल्पयेत् ॥
© इतिवार्तिकवाक्यानिसावधानंविचिंतय ॥३४ ॥
तद्ब्राह्मणशब्दोयंयौगिकोऽस्त्विचिंतय ॥
अतोऽज्ञानेनविप्रत्वमेपांसिध्येत्कथंचन ॥ ३५ ॥
यद्वाब्राह्मणशब्दोयमेपुंशिष्यत्वपूर्वकैः ॥
धर्मैर्ब्राह्मणसंबंधपूतेपुविमतेपुच ॥ ३६ ॥
गंगायांघोपइत्यादौगंगासंबंधितीरके ॥
गंगाशब्दइवहेयस्त्वयालाक्षणिकास्त्विति ॥३७॥
यथाश्रुतौधान्यमसिचिनुहीत्यत्रतंडुले ॥
तदर्थीनत्वतोधान्यशब्दोयुक्तोभवेत्तथा ॥ ३८ ॥

⊛ ब्राह्मणाद्दतिशब्दोपिनित्यंविप्रवशस्तथा ॥
⊛ कोंकणेप्वपिसित्वंस्यादतःसिधेन्नविप्रता ॥३९॥
⊛ तस्मादनेनविप्रत्वंभवतांनैवसिध्यति ॥
⊛ ब्राह्मणत्वव्यवहृतिरादितोनोपलभ्यते ॥ ४० ॥
⊛ अन्यथाह्युपपद्येतसयुष्मासुभवत्यपि ॥
⊛ अतःकथंब्राह्मणत्वंभवतांवदताधुना ॥ ४१ ॥

**अर्थ.**—आतां तुह्मास ब्राह्मण ह्मणून व्यवहार आहे, असें ह्मणाल तर, जो काहीं, खरोखर व्यवहार, तो, तुमच्या ठिकाणीं संभवत् नाहीं, तर ब्राह्मण असा व्यवहार, तुह्मास काहीं दुसऱ्यारितीनें, मात्र झाला असेल? कारण, ब्रह्मशब्दापासून, अपत्य, (पुत्र किंवा गोत्रज,) या अर्थी, प्रत्यय होऊन, ब्राह्मणशब्द निष्पन्नझाला असेल, तर, तो ब्राह्मणशब्द रूढ्यर्थ नव्हे; तर यौगीक आहे. आतां, ब्रह्माचा अपत्य जो आहे, तो, ब्राह्मणच आहे, असें "गुरुटानें" सांगितले आहे. याचाच दुसराअर्थ असा आहेकीं, ब्रह्मशब्दहा चारीवर्णांस संभवद्रूकीक, होइल. तर, तो। कसा? त्याविषयीं, सांगतों. ब्रह्माचे (ईश्वराचे) मुखच, ब्राह्मण होतेझाले क्षत्रियलोक ब्रह्माचे भूज होते झाले. वैश्यहे, ब्रह्माचे ऊरु, (तगड्या) होते झाले. आणि शूद्रहे, ब्रह्माच्या पायापासून उत्पन्न झाले. याप्रमाणें ("श्रुतिमताप्रमाणें") ब्राह्मणशब्दापासून ब्रह्माचे, अपत्य, असें सांगितले आहे, परंतु; योगाला (अवयवार्थ) रूढीस (समुदायार्थ) बाध करण्याविषयीं समर्थ होत् नाहीं. परंतु; जेथें, ज्या रूढीच्यायोगानें, विवक्षितार्थ सिद्धीप्रत पावेल, व जेथें योगार्थ संभवत नाहीं, तीरूढीमात्र योगाला बाधक करील, जसें, अश्वकर्ण शब्द

( वृक्ष ) ह्याअर्थी रूढ आहे, येथें योगार्थ संभवतनाहीं, जर, अवयवार्थ संभवेल, तर; त्याणेच निर्वाह होतू असतां, रूढीचेऊनये. आतां, अर्थापत्ती, याविषयीं, प्रमाणकल्पावें. परंतु; तेंही, संभवत नाहीं, कारण, तीतीण ज्ञाल्यामुळें, शक्ती, कल्पनेविषयीं, समर्थ होत नाहीं पाहा ! प्रोक्षणीशब्द ( यज्ञपात्र ) हा आपल्या अवयव व्युत्पत्तीनेंच, अर्थ काढीत् असून, यौगीक आहे. आणि याप्रमाणेंच वेदांत शास्त्रांत सांगितलेला ब्रह्मशब्दाचा अर्थ आहे. त्याचा विचारकर. जेथें, अक्षरापासूनच, विवक्षितार्थ सिद्ध होत आहे, व जेथें, अवयवार्थ संभवत नाहीं, तेथें दुसरी गत नसल्यामुळें, समुदायार्थ ( रूढअर्थ ) ह्मणावा. वृक्षास अश्व, आणि कर्ण, असें संभवेल्याय! नाहीं; परंतु; संभवतें, ह्याशब्दाच्या शक्तीविषयीं ज्ञाननाहीं, असा जो, अश्वकर्णशब्द याचीशक्ती, कोणत्याअर्थी कोणपुरुष कल्पेल ? याप्रकारेंकरून "वार्त्तिकवाक्याचा" अर्थ आहे. तो सावध होऊन, विचार कर. ३२—३३—३४—३५—३६—३७ याप्रमाणें, ब्रह्मशब्दहा यौगीक आहे. यावरून याशाण्णवीलोकांस, अज्ञानलेकरून ब्राह्मणत्व पदाकदाचित्, सिद्ध होईल. अथवा, कोंकणी ऊर्फ शाण्णवी लोकांस; ब्राह्मणशब्द हा लाक्षणीक आहे, असें ह्मटलें तरीचालेल. कारण, ब्राह्मणाचे शिष्यह्मणून, तुह्मास ब्राह्मण ह्मणतात्. ! आणि ब्राह्मणलोकाशीं, शाण्णवी, लोकांचा गुरुशिष्य संबंध आहे. जसें, गंगेचाटावर घोष. (गौशाळी लोकांचा खेडेगांव ) परतु; येथें, गंगाशब्दाचा अर्थ, तीर ह्मणून समजावें. तर, गंगाशब्द लाक्षणीक ह्मणतात्. जसें श्रुतीमध्यें (धान्यमसि.) तू धान्य आहेस, ह्मणजे तू धान्याचे स्वाधीन आहेस, असा अर्थ होतो! तसें तुह्मी ब्राह्मण आहां ह्मणणें; ब्राह्मणाचे आधीन आहेत्. तर; शाण्णवी लोकांस स्वतःसिद्ध ब्राह्मण, असा व्यवहार नसल्याकारणानें, तुमचें ब्राह्मणत्व सिद्ध होत नाहीं. तस्मात् हा सर्वव्यवहार तुमच्यां-

नभे नसून, तुर्ही ब्राह्मण ह्मणवीता, हे कसें? आता ते तुह्मीच सागा. ,३८–३९–

⊛ इत्यादिपूर्वपक्ष्युक्तंयुक्त्यादूषयितंतदा ॥
⊛ अस्त्वत्रापिसमाधानंशृणुध्वंहिमयोच्यते ॥ ४२ ॥
⊛ अनयोनयसंकाशोहृदयान्नापसर्पति ॥
⊛ इतीदमभवद्दृष्टंमयानानाप्रकारतः ॥ ४३ ॥
⊛ बोधितस्यापितेदुष्टावासनानापगच्छति ॥
⊛ अयःपिंडइवोत्तप्तेखलानांहृयेक्षणात् ॥ ४४ ॥
⊛ पतिताएवनेक्ष्यंतेगुणास्तोयकणाइव ॥
⊛ इदंसिद्धमभूद्यासिद्धस्वानुभवादिति ॥ ४५ ॥
⊛ ब्राह्मणव्यवहारोनोभवतापद्गतोयतः ॥
⊛ चातकश्चानुमानेनजलंप्रार्थयतेंबुदात् ॥ ४६ ॥
⊛ सरवोदरतयासर्वाञ्चावयंत्स्वंवूनामही ॥
⊛ तथात्वत्कृतशंकायाप्रोच्यंतेबहुलान्यपि ॥४७ ॥
⊛ उत्तराणिमयेदानींशृणुतानिसमस्ततः ॥
⊛ विप्रशब्दव्यवहृतिर्ब्राह्मणत्वेनकारणं ॥ ४८ ॥
⊛ किंतुषट्कर्मवत्त्वादिब्राह्मणत्वेप्रयोजकं ॥
⊛अस्मासुचतदास्तीतिसिद्धाब्राह्मणताहिनः ॥४९॥
॥ अन्यथाविप्रादिपदव्यवहारस्यसत्वतः ॥
⊛ अश्वघ्नोदकपूर्वाणांस्यात्ब्राह्मण्यंभवन्मते॥५०॥

अर्थ—या प्रकारेकरून, पूर्व पक्षकारानीं ( चित्तपावनादिकांनं मुख्य जो कांहीं शास्त्रविलक्षणरीतिनें, त्याणें, व्यवहारावरून पूर्वपक्ष केला आणि याचप्रमाणें, कल्याणेच्छूच्या लिहिण्याचा भावार्थ ही, दिसतो कारण, मार्गे जगन्मित्र नामक पत्रांत त्याणें, आपला तर्क दर्शविला होता, तो पाहून, मोठें आश्चर्य, वाटल्याकारणानें, संपूर्ण शंका, तर्कावरूनच दाखविली आहे अस्तु याचित्तपावनादिकांनीं, व्यवहारावरून यद्यपी, या सारस्वत कोंकणें, ( शाणवीं ) ब्राह्मणाविषयीं दूषण दिलें, तथापी त्याचें समाधान मी सांगतों तें ऐका १९ तें असेंकीं प्रारब्धकर्म चालू असतां, (विनाशकाले विपरीतबुद्धि ) या, निती सारखा भासणारा जो अनय (दुष्टस्वभाव तो, याचित्तपावनादिकाच्या अंत करणापासून निघून, जातच नाहीं आणि, हे मी प्रत्यक्ष पाहीलें तथापी, नानाप्रकारच्या दुष्टवासना त्यासर्व चित्तपावनादिकाच्या हृदयापासून दूरच होत नाहींत्, यद्यपी त्या लोकास, शिष्टानीं, नानाप्रकारेंकरून उपदेश केला, तथापी त्याप्रमाणें, तापविलेल्या अय पिंड, ( लोखंडाचागोळा ) पावर पाणी पडलें असता, जसें अदृश्य होऊन, लोकाच्या नजरेस, पडत नाहींकीं, त्याप्रमाणें, शिष्टानीं, हरएक प्रयत्नें करून त्याच्या मनास बोध केला, तथापी तो तैयल्या तैयेच, नाशाप्रत पावतो हें मी अनेकयुक्तीवरून निश्चय केला अस्तु, चातक ( पक्षी ) हा आपल्या धोरणानें, जलाविषयीं वाच्छाधरून, मेघाची प्रार्थना करितो, आणि त्या प्रार्थनेच्या योगानें, मेघ आपल्या उदारतेंकरून सर्व पृथ्वीजसी भिजवून टाकीतो, त्याप्रमाणें, चित्तपावनादिकानीं केलेल्या शंकेचें समाधान, मी दृष्टांत युक्त शास्त्राधार देऊन, करितो तें लक्षदेऊन ऐका आतां, ब्राह्मण, ब्राह्मण, म्हणून जोकाहीं, लोकांमध्यें, व्यवहार आहे, तो ब्राह्मणत्व येण्याचि-

यर्थी कारण नव्हे. तर; षट्कर्मच ( यजन, याजन, अध्यापन, अध्ययन, दान, आणि प्रतिग्रह, ) हेंच मुख्य ब्राह्मणत्वाविषयीं कारण होय. आणि हें षट्कर्माधिकारत्व, प्रयत्नकरून, तर आमच्याठिकाणीं (सारस्वतांच्या) सिद्ध होतेंच आहे. आतां हे षट्कर्माधिकार व आह्मास आहे! असें तुह्मीं ह्मणाल, ( चित्तपावनादिक ) तर, ब्राह्मण व्यवहार असल्यामुळें, तुह्मीं अश्वब्राह्मण, किंवा शुनक ( श्वान ) किंवा उदकब्राह्मण, असावेत्. अश्वब्राह्मण ह्मणण्याचें कारणकाय? तर, घोड्यांलाही ब्राह्मण असा व्यवहार आहे, त्याविषयीं प्रमाण सांगतों.

पुरासपत्नाहरयोविचेरुःखेचराःकिल ॥
गंधर्वेभ्यःसमुत्पंनासदारवच्छंदचारिणः ॥५१ ॥
वीक्ष्यशक्रोजगादेदंशालिहोत्रंमहामुनिं ॥
छिंदिपक्षानमीषांत्वंयथास्युर्वाहनानिमे ॥ ५२ ॥
इषीकास्त्रेणसोह्येषांपक्षांस्तत्क्षीतयेभिनत् ॥
अथागस्यभुवंराज्ञांगत्यवाहनतांहयाः ॥ ५३ ॥
ब्राह्मणक्षत्रियविशांशूद्राणांचैवलक्षणैः ॥
ज्ञेयाहयोत्तमास्तेपुपूर्वैःपूर्वशुभावहं ॥ ५४ ॥

**अर्थ**—तीं असीकीं, घोडेजे आहेत्, त्यांस, पूर्वी पक्षहोते (पंख) आणि, ते गंधर्वांपासून उत्पन्नझाले. याकारणानें, ते मोठमोठे बलाढ्य असून त्या बलाच्या योगानें, सर्वांस त्रास देऊन, आकाशात संचार करीत होते. तेव्हां, इंद्रानें सर्वांस त्रास होतो, असें अवलोकन, करून, आपणास तर हे, अजिंक, आणि यांस कोणत्यारितीनें जिंकावें; असें तो आपल्या मनांत चिंताक्रांत होऊन, "शालीहोत्र"

या नामाच्या एका ऋषीस शरणजावून, त्याप्रत बोलता झाला. तें असेंकीं, हे माहाराज ऋषिश्रेष्ठा ! हे घोडे, मोठे उन्मत्त, होऊन, आपापल्या पक्षांच्या योगानें सर्व लोकांस, त्रास देतात्; तर; आपण याचे हे पक्षतोडून, हेमाझे वाहन होतील असें करावें, याप्रकारें करून इंद्र त्याऋषीची प्रार्थना करिताझाला. तेव्हां त्याशाली-होत्रनामक ऋषीनें, इंद्राशीं मैत्री होण्यास्तव, एक दर्भाची काडी, अभिमंत्रण करून, त्या सर्व घोड्यांचे पक्ष छेदन करीता झाला. नंतरते सर्वघोडे शक्तिहीन होऊन, या मृत्यु लोकाच्या ठायीं येवून, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र, याल्लक्षणें करून राजांचीं वाहनें होते झाले. त्यामध्यें उत्तरोत्तर श्रेष्ठ होय.

प्रायेणब्राह्मणःशुक्लःक्षत्रियोलोहितःस्मृतः ॥
वैश्यःपीतःसवर्णःस्यात्कृष्णवर्णश्चतुर्थकः ॥५५॥
विवेकीसघृणोविप्रस्तेजस्वीक्षत्रियोबली ॥
दुष्टभावस्तथावैश्यःशूद्रोनिःसत्वकातरः ॥ ५६ ॥

अर्थ.—आणि त्यांचीं लक्षणें असींकीं, स्वभावेंकरून जो शुक्ल, ( सफेत ) तो ब्राह्मण असें जाणावें. आणि लोहीत, ( सांवळा ) तो क्षत्रिय, पीत, (पिवळा) तो वैश्य. आणि कृष्ण, ( काळा ) तो शूद्र. याप्रमाणें, त्यांच्या वर्णावरून जाती जाणाव्या. आता, त्यांचीं दुसरीं लक्षणें, असी आहेतकीं, विचारवान, आणि सदयादी गुणानीं युक्त, जो अश्व ( घोडा ) तो ब्राह्मण. तेजस्वी, आणि बलवान्, तो क्षत्रिय, दुष्ट स्वभावाचा तो वैश्य. आणि, निर्बल असून भित्रा तो शूद्र. याप्रमाणें यांचीं लक्षणें जाणावीं. आतां याची योजना कोठ कोठें करावी तीसांगतो.

ब्राह्मणाःक्षेमकृत्येषुसिद्धिंगच्छंतिवाजिनः ॥

क्षत्रियायुत्थकार्येपुवैश्याद्रव्यार्जनेतथा ॥ ५७ ॥
शूद्राश्चान्येपुकार्येपुज्ञात्वैवंवाजिनस्तथा ॥
आरुहेद्युक्तकार्येपुयइच्छेच्छाश्वतींश्रियं ॥५८ ॥

**अर्थ.**—ती असीकीं, शुभकृत्यांत, ब्राह्मण युद्धांत क्षत्रिय, द्रव्यसंपादन करण्यांत वैश्य. आणि इतर.कार्यांत शूद्र, याप्रमाणे ज्यांस कल्याणाची इच्छा असेल, त्यांनीं या अनुक्रमें करून अश्वारोहण करावें.

पुष्पगंधःसदाविप्रःक्षत्रियोगरुगंधकः ॥
घृतगंधोभवेद्वैश्योमीनिमोदश्चतुर्थकः ॥ ५९ ॥
ब्राह्मणंभक्तिदानेनसोमेनक्षत्रियंतथा ॥
वैश्यंशाब्देनदंडेनशूद्रंदंडेनवाहयेत् ॥ ६० ॥
® इत्थंहिशालिहोत्रोक्तिरश्वानांविप्रताभवेत् ॥
® भवरपक्षेचमरपक्षेपट्कर्मश्रहितत्वतः ॥ ६१ ॥

अर्थ.—आणि दुसरें, असें आहेकीं, पुष्पाप्रमाणे, ज्यांचे अंगास *सुगंध येतो तो ब्राह्मण. अगरूप्रमाणे* गंधयेणारा तो क्षत्रिय. तुपाप्रमाणे गंधयेणारा तो वैश्य. आणि सार्वकाल मत्स्यासारखा गंध ज्यास तो शूद्र. असें जाणावें. तसेच ब्राह्मणाप्रत् भक्तीपूर्वकदानेंकरून क्षत्रियाप्रत, सोमयागें करून, वैश्याप्रत, शब्द दंडेंकरून, आणि शूद्राप्रत, केवल दंडेंकरूनच वाहावें. या प्रमाणें, "शालिहोत्र ऋषींचेंवचन" आहे. तर; यावचनावरून ब्राह्मणत्वाचा व्यवहार घोड्यांवर ही संभवतो. ह्मणून तुमच्या (चित्पाव०) व्यवहाररूप शंकेवरून घोड्यांत्यही ब्राह्मण असा व्यवहार आहे; असें सिद्ध होते. तस्मात्, ब्राह्मणत्व हें घोड्यांवर गेल्याकारणानें आमच्या

भिमानी जो शंकर तो सुंदर अलंकारांनी युक्त असें एक वैश्याचें रूप धारण करून त्या बसलेल्या मध्या समोर ( देवांसमोर ) प्रवर्त होता झाला. आणि त्या चिंताक्रांत बसलेल्या देवांस पाहून त्यांस विचारूं लागला. हे देवहो! तुह्मी कोणत्या कारणास्तव शोक करीत बसला आहां! तें सांगा? तेव्हां ते देव रत्नादिकांच्या उत्पत्ती विषयीं, जी काहीं चिंता करीत होत्साते, ती त्यास सांगते झाले. तेव्हां "शंकरानीं त्यादेवांस पुनः प्रश्न केला.

अपेक्षितानिरत्नानियुष्माभिःकीदृशानिभो ॥
तानिसर्वाणिरत्नानिदास्यामिसुमहान्त्यपि ॥७१॥
तच्छ्रुत्वाप्रीतहृदयाःप्रोचुर्वैश्यवरंप्रभो ॥
मौलेरर्हाणिरत्नानिदीयतांभवताक्षणात् ॥७२॥

अर्थ.—तो असाकीं, हे देवहो! तुह्मांस कोणत्या रत्नाची इच्छा आहे ती सांगा? तीं मी देतों. याप्रकारें करून "शंकराचेंवचन" ऐकिल्या वर, ते सर्वदेव हर्षयुक्तहोऊन, शंकराप्रत भाषण करीता-त्. तें असेंकी, हेवैश्यवर्यप्रभो! जर तूं आह्मास रत्नें देतोस, तर मस्तकाच्या ठिकाणीं. धारणकरण्यास योग्य, असीं रत्नें दे!

इत्युक्तेतैःसरत्नानिअनर्घ्याणिमहांतिच ॥
दर्शयित्वालक्षणानातेपांवर्कुंप्रचक्रमे ॥ ७३ ॥

॥ वैश्यवर्यउवाच ॥ बलोनामाभवच्छ्रीमान्दानवेंद्रोमहाबलः ॥ लोकत्रयाधिपत्यंचसंप्राप्यसुमहानभूत् ॥ ७४ ॥ तस्यास्थिवज्रंदशनाश्चमुक्तास्तथाचरक्तंखलुपद्मरागः ॥ रोमाणिवैडूर्यमितिप्रसिद्धंप्रवालमासीत्पिशितंमहार्हं ॥ ७५ ॥

अर्थ—याप्रकारेंकरून त्यादेवांचें भाषण ऐकल्यावर, मोठ मोठीं अमोल्य रत्नें, त्यादेवांस दाखवून, त्यांची लक्षणें तो वैश्यवर्य सांगताझाला. तींअसीकीं, पूर्वी, स्वर्ग, मृत्यु, पाताळ, यातीनीं लोकांस, अधिकारी, बलनामेंकरून दानवाचा राजा, असता झाला. आणि त्याराक्षसापासून यासर्व रत्नांची उत्पत्ती होती झाली. ती असीकीं, त्या बलनामराक्षसाच्या अस्या, ( हाडें ) तीं वज्रें ( हिरे ) आणि दांत, जे होते ते मोतीं, आणि रक्तें, पद्मराग, ( रत्नविशेष ) आणि त्याचे केस, ते वैदूर्य (रत्नविशेष ) आणि त्याचें मांस तें, प्रवाल, ( पोवळें ) तसेंच.

नेत्रंमहानीलमभूत्प्रशस्तंपित्तंचगारुत्मतरत्नमासीत् ॥
आसीत्कफस्तस्यचपुष्परागोमेदश्चगोमेदकतामवाप ॥ ७६ ॥

अर्थ—त्याचेंनेत्र, (डोळे) ते नील, आणि त्याचेंपित्त तें, गारुत्मत ( पाच ) आणि त्याचा कफ, तो, पुष्पराग, आणि त्याचा मेद, ( धातू ) तो गोमेदिक, याप्रमाणें यारत्नांची उत्पत्ती, त्या बलनामक दैत्याच्या अंगापासून झाली. आतां, त्यांचे वर्ण सांगतों.

वज्रमुक्ताफलेविप्रेनृपेमाणिक्यविद्रुमौ ॥
सपुष्परागौवैश्यौतुगोमेदकविदूरजौ ॥ ७७ ॥
इन्द्रनीलंमरकतंशूद्रंरत्नविदोविदुः ॥

⊛ इत्युक्तेब्राह्मणत्वंस्यात्स्वपक्षेवज्रमुक्तयोः ॥ ७८॥
⊛ इत्थंहिसप्तरत्नानांस्यात्ब्राह्मण्यंभवन्मते ॥
⊛ परंतुविस्तारभयात्सर्वमत्रनदर्शितं ॥ ७९ ॥
⊛ तस्माद्विप्रादिकपदव्यवहारोऽप्रयोजकः ॥

◎ मनुष्यत्वेविप्रपदव्यवहारत्वमीरितं ॥

◎ प्रयोजकंब्राह्मणत्वमितिचेदुच्यतेशृणु ॥ ८० ॥

अर्थ—जें असेंकीं, हिरा, आणि मोती, या दोनरत्नास ब्राह्मण अमी संज्ञाआहे. तसेंच, माणिक आणि प्रवाळ, यास क्षत्रिय, पुष्पराग, गोमेद, आणि वैडूर्य, या तीनरत्नास वैश्य असें ह्मणतात्. त्याच प्रमाणे, नील, आणि मरकत, या दोनरत्नास, शूद्र, अमी संज्ञाजाणावी. यामकारें करून " शास्त्रदयालीलेंत शंकरानें " वैश्यरूपधरून सर्वरत्नाचे भेद व उत्पत्ती,व वर्णाटीकरून लक्षणें सांगितलीं. आणि, या पूर्वरक्षकारांच्या, (चित्तपावनादिकांच्या) बोग्यायाप्रमाणें, " या शंकराच्या वचनावरून " वज्रास, आणि मोत्यासही, ब्राह्मण, असा व्यवहार सिद्ध होतो. आणि याच प्रकारेंकरून बाकीच्या सात रत्नाचाही शास्त्रीया व्यवहारें करून ब्राह्मणत्व सिद्ध होतें. परंतु; ग्रंथवृद्धी, भयास्तव सर्व येथें न दाखविता, फक्त उदाहरणार्थ किंचित् भाग दाखविला. आणि या सर्व वचनावरून व्यवहाररूप शंकेस, व्यभिचार येत असल्या कारणानें, व्यवहार नाहीं, ह्मणून सारस्वतकोंकणें उर्फ शाग्णवी हे ब्राह्मण नव्हे, ह्मणून जी काहीं शंका घेणें, ती, केवळ, अयोग्य असून, अप्रयोजक आहे. अरक, आतां, रत्नाविषयींब्राह्मणत्व दाखवून, व्यवहाररूपशंका ही, अप्रयोजक आहे, ह्मणून, जें सांगितलें; तें खरें, परंतु; या मनुष्यत्वास ब्राह्मणत्व व्यवहार हा, प्रयोजक असून, तो तुमच्या धर्मस्थ लोकांत ( शेणव्यांत ) कीं, नाहीं ? असें ह्मणून पुन: शंका घ्याल, तर, त्याशंकेच्या समाधानाविषयीं निर्णय सांगतों; तो ऐका.

◎ निखिलेष्वपिचास्मासुब्राह्मणत्वेप्रयोजकं ॥

◎ मनुष्यत्वेविप्रपदव्यवहार्यत्वमस्तिहि ॥ ८१ ॥

स्वयंकरोतिकर्माणिस्वयंतत्फलमश्नुते ॥
स्वयंभ्रमतिसंसारेस्वयंतस्माद्विमुच्यते ॥ २५१ ॥
⊛ इतिज्ञात्वाप्रेरितोन्यैरपित्वंमावदानृतं ॥
क्षत्रियंचैवसर्पंचब्राह्मणंचबहुश्रुतं ॥२५२ ॥
नावमन्येतवैभूष्णुःकृशानपिकदाचन ॥
एतत्रयंहिपुरुषंनिर्दहेदवमानितं ॥ २५३ ॥
तस्मादेतत्रयंनित्यंनावमन्येतबुद्धिमान् ॥
भद्रंभद्रमितिब्रूयाद्भद्रमित्येववावदेत् ॥ २५४ ॥
शुष्कवैरंविवादंचनकुर्यात्केनचित्सह ॥
⊛ इतिशृणुमनोरुक्तीस्तथाकुरुयथामनः ॥ २५५ ॥
⊛ तदेवंब्राह्मणाइत्थंव्यवहारःप्रदर्शितः ॥
⊛ तेनचब्राह्मणत्वंत्रसिध्देदित्यपिसाधितं ॥२५६ ॥
⊛ तदेवंब्राह्मणत्वेनःप्रमाणत्रितयंस्फुटं ॥
⊛ भाषितंव्यवहारोपिब्राह्मणाइतिदर्शितः॥२५७ ॥
⊛ तस्मात्कोंकणविप्राणांविप्रत्वेनास्तिदूषणं ॥
⊛ अतःसिद्धंब्राह्मणत्वंनिर्बाधंकिलसर्वदा ॥२५८॥

**अर्थ.**—असें आहेकीं, ज्या वचनाचायोगानें नरक प्राप्ती न होईल तें वचन बोलावें असें आहे. तें अवलोकनकरून ज्याभाषणात धर्म असेल तेंच बोल. कारण, या नरतनूत आपणच कर्म करितो व त्याचें फल आपणच भोगितो. संसारात आपणच भ्रमण करितो व आपणच त्यासंसारापासून मुक्त होतो. असें जाणून जरी दुसऱ्यानीं प्रेरणा केली असेल तथापि खोटें बोलू नका. आणि श्रीमंतानें ब्राह्मण, सर्प, आणि क्षत्रिय, हे तिघे यद्यपी कृश झाले आहेत्

नयापरी त्याची निंदा करूनये. आणि या तिघाची निंदा जो करि-ता तो त्वकरच नाश पावतो. तस्मात् बुध्दिमानानी सर्वथा या तिघाची निंदा करूनये वाद किंवा वैर संपादन करणे झाल्यास जा वादापासून पक्ष सिद्ध होईल तोच वाद करावा त्यावाचून केवळ द्वेषाने वैर संपादन करूनये असी ही "मनुची वचनें" आहेत् तर ती उत्तमप्रकारें करून श्रवण केल्यावर त्या मनुवचनाप्रमाणें वाद करण्याची बुद्धी धारण करा आता या सर्व शास्त्रानुरूपन्यायाव रून कोकणे ऊर्फ सारस्वताविषयीं केलेल्या ब्राह्मणत्वानुरूप जो काहीं व्यवहार तो सर्व प्रघट केला. आणि या व्यवहाराविषयीं पूर्वीच तीन प्रमाणे दाखवीलीं व भाषणावरून हीं ब्राह्मण असा व्यवहार दाखवेला, आणि या सर्व युक्तीवरून सारस्वत कोंकणे ऊर्फ शा णवी लोकाचा ब्राह्मणत्वानुरूप जो काहीं खरा व्यवहार तो निश्चयें करून सदासर्वकाल सिद्धहोतो व आहे याचें उत्तमप्रकारें करून चिंतन करा आणि प्रमाच्या योगानें त्यासंबंधी काहीं मनें तीं शांती प्रत न्या — आणि हा जो काहीं सर्व शास्त्राधारानुरूप जो व्यवहार तो सर्व चित्पावनादिकांच्या समाधानाकरितांच दाखविला आणि या सर्व व्यवहारावरून वादाच्या मनाची पूर्ण खात्री होईल

इतिकेण्योपाख्ह नारायणसूनु लक्ष्मण विरचिते श्रीमद्दशप्रकरणे ब्राह्मणव्यवहार प्रदर्शनन्नाम पंचम प्रकरण समाप्त श्री गोपाळ कृष्णार्पण मस्तु.



# प्रकरण साहावें.



॥ श्रीमज्जगद्गुरुंविष्णुंत्रैलोक्याधिपतिंप्रभुं ॥
॥ नत्वा षष्ठं माधवोक्तिखंडनाख्यमथोच्यते ॥ १ ॥

अर्थ—आता, श्रीमज्जद्गुरू, त्रैलोक्याचा स्वामी, असा प्रभु जो विष्णु, त्याप्रत नमस्कार करून, माधवोक्तीचें खंडन नामक, हे साहवें प्रकरण सांगतों. आता, या साहाव्या प्रकरणांत, श्लोकबद्ध भाषण फार न घेता, फक्त प्रमाणें मात्र संस्कृत घेऊन, बाकीसर्व भाषण, प्राकृत भाषेतच घेतलें आहे. कारण संस्कृतांतच बोलणें केलें असते, परंतु; यांत बहुल्यतेची, गरज फारच असल्याकारणानें, ग्रंथवृद्धीभयास्तव फक्त एकेच भाषेत वीवेचन करितों

आता, सारस्वतकोंकणे (शाण्णवी,) ब्राह्मणाविषयीं, चित्तपावनादिकांनीं, जीजी, दूषणें दिलीहोतीं, तीं सर्व, शास्त्रानुसार, श्रुति स्मृत्योक्त प्रमाणादिकाच्या आधारावरून, निराकरण केलें. तथापि वादीच्या मनाची शांती नहोता, रत्नागिरी नगरांत राहणारा, कल्याणेचकर यांनायाच्या एका चित्तपावनानें, माधवकृत शतप्रश्नकल्पलतिका म्हणून एक अर्वाचीन, ग्रथाचें नामघेऊन, सारस्वत् ३ कर्मी, असें सिद्ध करण्याविषयीं, त्याकादबरींतील मधोमधचे ८ श्लोक, निवडून ता० २९ माहे नोवेंबर सन् १८६९ चें जगन्मित्र नामक पत्रांत छापून प्रसिद्ध केले होते परंतु; शालीवाहनशकाच्या १३ व्या शतकांत, तुंगभद्रानदीच्याकांठीं पंपानामकक्षेत्रांत उत्पन्न झालेला जो विद्यारण्यमाधव तो निराळा. कारण त्याविद्यारण्यमाधवाचा जन्मशक, व त्याची वंशपरंपराही सांपडते. आणि त्याच्या

जन्मास ५०० शेंपर्यंत संख्या दिसत असून तो अद्वैत मतप्रतीपादन करण्यांत तत्पर होता. असें त्याच्या ग्रंथावरून दिसतें. आणि या कल्याणेच्छूनें, प्रसिद्धकेलेल्या लतीकेवरून पाहिलें असतां, हीलतिका शालीवाहन शके १६१२ त रचिली, असें त्यालतीकेवरून सिद्ध होतें. असें असून यालतीकेचा कर्त्ता अद्वैत खंडणकरण्यात तत्परहोता, असें त्याच लतीकेवरून स्पष्टीकरण होत असल्याकारणानें हीलतिका विद्यारण्य माधवाची नव्हे, असें सिद्धहोतें. तस्मात् यालतिकेचाकर्ता केवळ जातिभेद विवेकसार कर्त्याचा भ्रेष्टबंधू असें ह्मणण्यास कांहींच बाधक दिसत्नाहीं. कारण, जातिभेद विवेकसारकर्त्यानेंही, या सारस्वतांविषयीं, धर्मारण्य ग्रंथाचें नामघेऊन, एक स्व कपोल कल्पित वाक्य लिहिलें आहे परंतु ; धर्मारण्य ह्मणून स्कंदपुराणांत" एक ग्रंथ आहे, तो अथ पासून इतीपर्यंत तपासून पाहिला असतां या विवेकसार कर्त्याचें स्वोक्ती वाक्य, त्या* धर्मारण्यात सांपडत् नाहीं. त्याचप्रमाणेंया लतीकेच्या कर्त्यानें, माधवाचें नामघेतलें आहे. परंतु ; माधवानें जे ग्रंथ केले, (ह्म०) कालमाधव, निदानमाधव, माधवसूत्ती, शंकरविजय, पंचदशी, ब्रह्मगीता, सर्वदर्शनसंग्रह, विद्यारण्यकालज्ञान, न्यायमाला, पराशरमाधवीय, व भाष्यादी, अनेक प्रकरचिले आहेत्, परंतु त्या ग्रथांत, लतीका, असीं अक्षरें कोठेंच दिसत्नाहीं. इतकेंच नाहीं, तर या प्रतीची रचना, विद्यारण्यमाधवाच्या कोणत्याहीं ग्रंथांत नाहीं. एतावता यालतिकेचा कर्ता केवळ ब्रह्मद्वेषीच होता. असें ह्मणण्यास कांहींच बाधक दिसत् नाहीं. आतां हा द्वेषी आहे किंवा नाहीं तें याच्या कवितेवरूनच पाहा.

* धर्मारण्यग्रंथाविषयीं संकोच वाटत असेल तर हा ग्रंथ कैलासवासी शेट रामदास हीराचंद, याची विधवा देवकुंवरबाई ह्मणून या मुंबईत आहे. तो तीजपासीं जाऊन आवश्य असेल त्यानीं वाचून पाहावा.

गौडदेशेवसान्विप्राःश्रुतिस्मृतिपरायणाः ॥
इष्टापूर्तादिकर्तारःपट्कर्मनिरताःसदा ॥ २ ॥
दुर्भिक्षमभवत्तस्मिन्वृष्टिनाशाब्दद्वूनूसमान् ॥
मृतास्तुबहवोलोकादेशाद्देशांतरंगताः ॥ ३ ॥
अन्नाभावेतुतेविप्रामत्स्यभक्षणतत्पराः ॥
महायज्ञाश्वमत्स्येनब्राह्मणाश्चक्रुरन्वहं ॥ ४ ॥

अर्थ.—पूर्वींगौडदेशांमध्यें, वेदशास्त्रसंपन्न, घाट, विहीर, देवालयें इत्यादीक, धर्मार्थबांधणारे, आणि सार्वकाल, यजनादि षट्कर्मे (यजन, याजन, अध्ययन, अध्यापन दान, आणि प्रतिग्रह,) करणारे असे, ब्राह्मण राहत् होते. नंतर त्या गौडदेशांमध्यें, पर्जन्य नसल्याकारणानें, कांहीं लोक मरण पावले, व कांहीं लोक देशांतरास गेले, अन्न नसल्याकारणानें, मत्स्याच्या मांसानें, माहायज्ञादिक करून उदर निर्वाह करिते झाले. ४.

एवंद्वादशवर्षाणिलोकास्तुबहुपीडिताः ॥
प्राप्तेत्रयोदशेवर्षेसुवृष्टिःसमजायत ॥ ५ ॥
सुभिक्षंचैवसर्वत्रधान्यवृद्धिरभूत्तदा ॥
लोकेनिंद्याभवन्विप्रामत्स्यभक्षणकारणात् ॥६॥
पश्चात्तापेनसंयुक्ताऋषींश्चशरणंययुः ॥
प्रायश्चित्तंददुस्तेवैज्ञातिस्तेषांपृथक्कृता ॥ [illegible] ॥
यजनाध्ययनंतेषांदानमेवतृतीयकं ॥

१. वाचकहो ! हें प्रकरणवाचतेवेळीं, यामाधवानें दिलेल्या यत्र, याशब्दावर लक्ष द्यावें.

कर्मत्रयाधिकारंतुशणव्याख्यांददुस्तदा ॥ ८ ॥
स्नानसंध्यादिकंकर्मपंचयज्ञाश्चनित्यशः ॥
कर्माण्येतानिकुर्वीतत्रीणिकर्माणिवर्जयेत् ॥ ९ ॥
प्रतिग्रहोध्यापनंहियाजनंचतृतीयकं ॥
वर्जयेत्तुसदात्रीणिकन्यापाणिग्रहंविना ॥ १० ॥

अर्थ—यामकारेंकरून, बारावर्षेपर्यंत, पर्जन्य, नसल्याकारणानें, लोक बहुत पिडीत झाले. नंतर तेराव्यावर्षी, पर्जन्यपडून, धान्यादिकाची, वृद्धी होतीझाली. मग त्याब्राह्मणानीं, मत्स्यभक्षण केलें होतें. त्याब्राह्मणाची, लोक निंदा करूं लागले. तेव्हां, त्याब्राह्मणास, पश्चात्तापहोऊन, ते ऋषींला शरणगेले. नंतर, त्या ऋषींनीं, त्याब्राह्मणास, प्रायश्चित्तदिलें आणि त्याची ज्ञात पृथक् करून, त्यास शेणवी, असे नाम दिलें. आणि यजन, दान, आणि अध्ययन अशींहीं तीन कर्मे दिलीं. स्नान संध्या पंचमहायज्ञ, आणि यातीनकर्मे, हीं सर्वकाल करावीं आणि कन्यादानखेरीज करून, याजन, अध्यापन, आणि प्रतिग्रह, हीं तीनकर्मे, वर्जकरावीं. असें या कल्याणेच्छूनें दिलेल्या माधव स्वरूपोक्तीवरून दिसतें. असो, यावरून यामाधवाचे फार, आभार मानले, पाहिजेत्. कारण, गौडदेशात राहणारेब्राह्मण षट्कर्मी आहेत असें यामाधवाच्याच बोलण्यावरून सिद्ध होतें. १० अस्तु, हें सारस्वताचें पुण्यच म्हटलें पाहिजे. असो; हामाधव त्यादुर्भिक्षकाळीं, कोठच्या गावीं होता? बहुतारेमाधवा! दुर्भिक्षकाळीं आत्मसंरक्षणार्थ, भक्षाभक्षण केलें असतां, मुळींच दोषनाहीं, असें "याज्ञवल्क्यादीऋषींच्यास्मृति" मतावरून सिद्धहोतें. तशांत, तेंही, शशविषाणवत्, कबूल केलें असतें, परन्तु, हामाधव स्पष्ट "गौडदेशी," असें म्हणत् असून, पुढें

यज्ञाचें नांव घेतो, तर,; यामाधवाच्या स्रोकावरून, इतकेंच प्रसिद्ध होते कीं, यामाधवाला, व त्याप्रायश्चित्त देणाऱ्या ऋषीलाही, श्रुति स्मृत्यादिक धर्मशास्त्राचें ज्ञान मुळींच नव्हतें, असें ह्मणण्यास, कांहींच संशय दिसत् नाहीं. कारण, स्मृतींत असें ह्मटलें आहेकीं,

आर्यावर्तःपुण्यभूमिर्मध्यंविंध्यहिमालयोः ॥-
सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदंतरं ॥ ११ ॥
तस्मिन्देशेयआचारःपारंपर्यक्रमागतः ॥
वर्णानांसांतरालानांससदाचारउच्यते ॥ १२ ॥
कृष्णसारस्तुचरातिमृगोयत्रस्वभावतः ॥
सज्ञेयोयज्ञियोदेशोम्लेच्छदेशस्त्वतःपरः ॥
इत्थंमनुस्मृतावस्तिविस्पष्टंप्रविचार्यतां ॥ १३ ॥

अर्थ.—हिमाचल व विंध्याचल या दोनपर्वतांमधील, जो देश त्यास आर्यावर्त ह्मणतात आहे. व त्यादोनदेशाला पुण्यभूमी ह्मणतात् तसेंच सरस्वती आणि दृषद्वती, या दोननद्यांमधील देशांसही पुण्यभुमी असें ह्मणतात्. व या पुण्यभूमीदेशामध्यें, परंपरेनें चालत आलेला जो आचार, तो, तेथील लोकांस सदाचार आहे. आणि ज्यादेशांत, कृष्णसारमृग संचार करितो, तोदेश यज्ञिय, ( यज्ञासउत्तम ) आणि ज्यादेशांत, कृष्णसारनाहीं, तो म्लेंच्छदेश, असें जाणावें. याप्रमाणें, "मनुस्मृतींत" व "वाल्मीकीरामायणांत" सांगितलें आहे. तस्मात् याधर्म शास्त्राप्रमाणें, देशभेद अवलोकन केलें असता सारस्वतदोषी, असें सिद्ध होत् नाहीं. त्यांत दुसरें असें आहे कीं,

विंध्यस्योत्तरभागेतुखादन्मांसंनदोषभाक् ॥
इत्थंस्मृत्यंतरेवाक्यंविचारयहिपंडित ॥ १४ ॥

**अर्थ** –विंध्यपर्वताच्याउत्तरभागीं, ( गौडदेशांत. ) राहाणाऱ्या लोकानीं, यद्यपी, मांस भक्षण केलें, तथापी ते दोषी होत नाहींत् याप्रमाणें स्पष्टतर वचन आहे हेंपेडीता कल्याणेच्छून्त्र। याचा विचारकर

विद्वज्जनवाचकहो। असो हीं धर्मशास्त्रानुमोदीत स्मृतीमध्यें उघड असता, गौडदेशातील, सारस्वत उर्फ शाणव्यी ब्राम्हण दोषी कसेचे संभवतील? तशात, दोषी, असें कबूल केलें असतें, पण तें केव्हा,? जर या ललितेच्याकर्त्यानें, यावाक्याची रचना केली नसती, तर हातर स्पष्ट लिहितो कीं. “दुर्भिक्षप्रभवस्तस्मि ट्टिनाशाम्हनूसार्॥ भक्ष्याभावेनुलेनिप्र। असें ह्मणतो तरहा दोषका,” असो यावचनावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, याललीतेचा कर्ता केवळ आपमतलबी असून अज्ञानी होता, असें सिद्ध होतें तर तें का. ह्मणाल? तर सांगतों, जरया ललितेचाकर्ता, ज्ञानअसता तर, यापुढें लिहिलेल्या प्रमाणाचा विचार केल्यावांचून सार स्वत दोषी, असें लिहिलेच नसतें ज्याअर्थी त्यानें याप्रमाणाचा विचार केला नाहीं, त्याअर्थी तो धर्मशास्त्र व्यतिरिक्त होता. असें सिद्ध होतें हेंखालील प्रमाणावरून प्रत्यक्ष दिसेल

प्राणात्ययेतथाश्राद्धेप्रोक्षितद्विजकाम्यया ॥
देवान्पितॄन्समभ्यर्च्यखादन्मांसनदोषभाक् ॥
● इतिश्रीयाज्ञवल्क्यस्यवचनगुणसुदर ॥ १५ ॥
प्रोक्षितभक्षयेन्मांसब्राह्मणानाचकाम्यया ॥
यथाविधिनियुक्तस्तुप्राणानामेवचात्यये ॥ १६ ॥
प्राणस्यान्नमिदंसर्वंप्रजापतिरकल्पयत् ॥

स्थावरजंगमंचैवसर्वंप्राणस्यभोजनं ॥ १७ ॥
देवान्पितृश्चार्चयित्वाखादन्मांसनदोषभाक् ॥
❀ इत्थमनुस्मृतावस्तिविस्पष्टंप्रविचार्यता ॥ १८ ॥

**अर्थ**—तैंअसेकीं, प्राणसंकटीं (नभक्षणकेलें असता प्राणजाणार) *भक्षामसर्गीं, श्राद्धकालीं, देव व पितर, यांची पूजाकरून,* ब्राह्मणानीं काम्यनें करून, प्रोक्षितमांस भक्षण केले असता, भक्षणाच्या योगानें ब्राह्मण दोषी होत नाहींत आणि ज्याकाळीं, ब्राह्मणास, मांस भक्षणकरण्याची कामना (इच्छा) होत्ये, त्याकाळीं, अथवा, प्राणसंकटीं, यथाविधीनें प्रोक्षणकरून, नंतर भक्षण करावें कारण प्रोक्षणावांचून भक्षणकरूनये तस्मात् प्रोक्षण करून नियमानें भक्षणकरावें आता, येथें कोणीं शंकाघेतील, कीं असी कीं, मनुष्याचें भक्ष अन्नअसून, मांसभक्षणहे, अयोग्य आहे, असें ह्मणतील, तर असें, आहे कीं, शरीरांतर्गत जोप्राण, त्यास भक्षणीय असें हे स्थावर (अन्न) जंगम (पश्वादि) पदार्थ, ब्रह्मदेवानें उत्पन्न केले आहेत् तस्मात् हे सर्वपदार्थ भक्षणकरावे, परंतु, मांसभक्षणहे, *नियमावांचून (प्र०) प्रोक्षणकरून, देव पितरास अर्पण* केल्यावांचून भक्षण करूनये तर, देवपितरास अर्पणकरून, आपण भक्षणकरावें ह्मणजे मांसभक्षण अन्यदोष लागतनाहीं याप्रमाणें "मनुस्मृतीत" व "याज्ञवल्क्यस्मृतींतही," सांगितलें आहे, त्याचा विचारकराना याप्रमाणें सबळ प्रमाणें असून त्यांत तो (माहायत्ताश्चमत्स्येनब्राह्मणाश्चक्रत्न्वह) असें लिहित असून सारस्वत ऊर्फ शाणवी हे दोषी कसे बरे ठरतील ? अस्तु, पक्षांतरानें, तेंही कबूल केलें, तथापि, तो स्पष्टलिहितो ते असें कीं, "प्रायश्चित्तन्तुलेवैजातिसैवाप्रथककृत " तर, विद्वज्जनवाचकहो !

हें याचें मतलबी लिहिणें नव्हे काय? अस्तु, पाहा; प्रथमतः तो माधव "पश्चात्तापेनसंयुक्त" असें लिहितो. तर या पश्चात्ताप पलीकडे, प्रायश्चित्तची कोणतें आहे! व कोण याधर्मशास्त्रांत आहे! वास्तवीक रितीनें, खरेपश्चात्ताप होऊन अरतें सारस्वत ब्राह्मण ऋषींस शरण गेले, आणि त्या ऋषींनीं, जर प्रायश्चित्त दिलें, तर, पूर्वोक्त दोषराहिलाकाय? असो याप्रमाणें प्रायश्चित्तदेऊन, शुद्ध झाल्यावर, त्यांचीं तीनकर्में कापून घेतात्, असें मीं कोणत्याही मान्य ग्रथान, (ह्म०) "मनु, " याज्ञवल्क्य; पराशर, अत्री, गौतम, शांडिल्य, इत्यादी, माहान ऋषींनीं केलेल्यास्मृत्या व निर्णयसिंधू, हेमाद्री, कालमाधव, स्मृतिमुक्तावली, व स्मृतिकौस्तुभ," इत्यादि जे मान्यग्रंथ, ते सर्व मीं या प्रायश्चित्ताच्या शास्त्राधाराविषयीं अथ, पासून इती पर्यंत, तपासून पाहिलें परंतु; या माधवाच्या लिव्याप्रमाणें लिहिणें यापरील ग्रंथापैकीं, कोणत्याही ग्रंथातसांपडत नाहीं; इतकेंच नाहीं, तर, हाशास्त्रार्थ, कोणी विद्वानपंडीतलोकानीं, अद्यापपर्यंत ऐकीलाही नसेल असें मलावाटतें. असो, आतां मालती. फेच्याकार्यानें व त्यावर पूर्ण विश्वास ठेऊन सारस्वत प्रीकर्मी, म्हणणाऱ्या चित्तपावनानीं, आपल्या मनाची मात्र खात्री करूनघेतली असेल तर असो.

अस्तु, आतां दुर्भिक्षकाळीं सारस्वतानीं प्रोक्षित मांस भक्षण केल्याबद्दल त्यानिनावी ऋषींनी, व चित्तपावनानीं, सारस्वतर्फे मागणवी ब्राह्मणाचीं तीनकर्में घेतलीं, हिगोष्ट मी कबुल करितों परंतु; हे खात्री लिहितों, यांचीं कितीकर्में घेतलीं, किंवा घेण्याचीं आहेत्, कसें काय? तें सांगा. याविषयीं मी किंचीत् शास्त्राधार कथारूपानें दर्शवितों.

अत्रैवोदाहरंतीममितिहासंपुरातनं ॥

वृषादर्भेश्वसवादसप्तर्षीणाचभारत ॥ १९ ॥
कश्यपोत्रिवसिष्ठश्वभरद्वाजोथगौतमः ॥
विश्वामित्रोजमदग्निःसाध्वीचैवाप्यरुंधती ॥२०॥
सर्वेपामेवतेपातुचंडाभूत्परिचारका ॥
शूद्रःपशूसखश्चैवतस्याभर्ताबभूवह ॥ २१ ॥
तेचसर्वेतपस्यतःपुराचेरुर्महीमिमा ॥
समाधिनाजिगीपतोब्रह्मलोकसनातन ॥ २२ ॥

अर्थ—भिष्मह्मणतात् हेभारत वृषादर्भीराजाचा, आणि सप्तऋषींचा, (म०) कश्यप, अत्री, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, वसिष्ठ, आणि अरुंधती, याचा सवाद झाला, त्याविषयीचा इतिहास सागतो १९–२०–२१—आता हेसे, सप्तऋषी सागितले, ते सर्व तपश्चर्या करून समाधिस्थ व स्वशक्तिनें सनातन जो ब्रह्मलोक त्याप्रत जिंकित होसाते, या पृथ्वीप्रत सचार करिते झाले २२

अथाभवदनावृष्टिःकदाचिन्महतीनृप ॥
कृच्छ्रप्राणोह्यभूत्तत्रसर्वलोकःक्षुधान्वितः ॥ २३ ॥
ततोनिरन्नकालोकाजीवरक्षाचिकीर्षतः ॥
मृतकुमारमादायकृच्छ्रप्राणास्तदापचन् ॥२४॥
दृष्ट्वाराजावृषादर्भिःप्रोवाचेदवचस्तदा ॥

अर्थ—नतर कोणी एके समयीं मोठी अनावृष्टी होऊन, धान्यें उपजीं नसल्या कारणानें, सर्वलोकास, प्राण सरक्षण करण्या विषयींचें सकट प्राप्तझालें नंतर, बुभुक्षीत होसाते, जीवसरक्षणकरण्याच्या हेतूनें, मृत्युप्रत पावलेल्या एका कुमाराचें प्रेत आणून, त्याचा पाक करिते झाले नतर त्या कुमराचा पाककरण्याचा समयपाहून,

॥ वृषादर्भिरुवाच ॥ प्रतिग्रहोब्राह्मणानांसृष्टावृत्तिरनिंदिता ॥ तस्मात्प्रतिग्रहंमत्तोगृह्णीध्वंमुनिसत्तमाः॥२५॥ वरान्ग्रामान्व्रीहियवान्रसांश्चरत्नादिकंकांचनगांचधेनूः ॥ एतत्सर्वंतदहंवोददामिमास्माभक्षंभक्षयध्वंश्वहि ॥ २६ ॥ ऋषयऊचुः ॥ राजप्रतिग्रहोस्माकंमध्वास्वादोविषोपमः ॥ अग्राह्यमाणंकस्मात्त्वंकुरुषेनःप्रलोभनं ॥ २७ ॥.

अर्थ—वृषादर्भि राजा बोलता झाला, तें असेंकीं, ब्राह्मणास, प्रतिग्रहहा, अनिंद्य असून, मुख्यत्वें करून यानेंच उदर पोषणकरावें, असें सांगितलें आहे. तस्मात् तुह्मास मी चांगलें ग्राम, भात, यव, गुडादिकरस, रत्नें, सोनें, भूमी गाई, इत्यादीक देतों, तीं घेऊन उदरपोषण करावें, परंतु, हें प्रेतमांस भक्षणकरूनका. याप्रमाणें वृषादर्भी राजाचें भाषण श्रवणकरून, ते सर्व ऋषी ह्मणतात्, तें असेंकीं, राजा पासून प्रतिग्रह घेणें हें आह्मास इष्ट नसून विषतुल्य आहे. तस्मात्, अग्राह्य प्रतिग्रह घेण्याविषयीं, तूं आह्मास कोणत्या कारणास्तव लोभ दाखवितोस आतां तूं ह्मणसीलकीं, राजापासून प्रतिग्रह कां, घेउनये तर सांगतों.

दशसूनासमश्चक्रीदशचक्रीसमोध्वजी ॥
दशध्वजीसमावेश्यादशवेश्यासमोनृपः ॥ २८ ॥
दशसूनासहस्त्राणियोवाहयतिसौनिकः ॥
तेनतुल्योभवेद्राजाघोरस्तस्यप्रतिग्रहः ॥ २९ ॥

अर्थ.—तें असेंकीं, दशसूना ( ह्म० दाहा प्राणी हिंसाकरणाऱ्या पुरुषाशीं सम एक चक्री, ( कुंभार किंवा कारक करणारा )

अशाया दाहांशी सम एकध्वजी, (नेली अथवा सदाचरणाचें ढोंग दाखविणारा दांभीक) अशा दाहांशी सम एक वेश्या, (कलावंतीण) आणि यादाहावेश्यांशीसम एकनृप, (राजा) असून हे उत्तरोत्तर दोषी आहेत्, दुसरे असें आहेकीं, पुरुषानें १०००० पशू हिंसा केल्याअसतां, जितक्या दोषास पात्रहोतों, त्या तितक्या दोषांशीसम एक राजा आहे. तस्मात् राजप्रतीग्रह हा आह्मास इष्टनाहीं. कारण राजप्रतिग्रह हा घोर असून नरकपाती आहे. आतां, तूह्मणसील्कीं, मांस भक्षणानें नरकास जात नाहींकाय? तर त्याविषयीं प्रमाण सांगतों.

वसिष्ठोभगवानाहस्वर्गलोकंसगच्छति ॥
योभक्षयित्वामांसानिपश्चादपिनिवर्तते ॥ ३० ॥

अर्थ.—वसिष्ठऋषी ह्मणतात्, जोपुरुष प्रथमता कारणानें, मांस भक्षणकरून, नंतर त्याचा त्यागकरितो, तो स्वर्गाप्रत जातो. याप्रमाणे विस्तारिकरून, "इतिहास समुच्चयग्रंथामध्यें" "वसिष्ठादिऋषीनीं" सांगितलें आहे. ते पाहावें. यास दुसरें प्रमाण.

श्वमांसमिच्छन्नार्तोऽत्तुंधर्माधर्मविचक्षणः ॥
प्राणानांपरिरक्षार्थवामदेवोनालिप्तवान् ॥ ३१ ॥
क्षुधार्तश्चात्तुमभ्यागाद्विश्वामित्रःश्वजाघनीं ॥
चंडालहस्तादादायधर्माधर्मविचक्षणः ॥
⊛ इत्थमाहमनुःपूर्वसावधानंविचार्यतां ॥ ३२ ॥

अर्थ.—तें असेंकीं, "वामदेव" आणि "विश्वामित्र" हेउभयतां धर्माधर्म (ह्म०) धर्मकोणता व अधर्मकोणता हें यद्यपी ते जाणणारे होते; तथापी ज्याकालीं, अतीशय क्षुधेनें पिडीत होऊन,

प्राणोत्कर्षणकाळ प्राप्तझाला, त्याकाळीं, प्राण संरक्षणार्थ चांडाळाच्या हस्तापासून कुत्र्याचें मांस घेऊन उभयतानीं भक्षणकेलें, परंतु; प्राण संरक्षणाच्या पुण्यानें मांसभक्षण जन्यदोषास ते पात्र झालेनाहींत्, याप्रमाणे "मनुस्मृतींत" मनुनें पूर्वी सांगितलें आहे. ते स्वस्थ चित्तानें अवलोकन करावें. आणि याच प्रमाणें, "महाभारतांत," व "मत्स्यपुराणांत' ही या प्रतिची अनेक वचनें आहेत् परंतु; विस्तार भयास्तव दोनच ग्रंथातील उदाहरणार्थ दाखविलीं आहेत या वाक्यांच्याविचारकरून, सारस्वत ऊर्फ शेणवी ब्राह्मणास लागू केलेल्या माधवाच्या कायद्या प्रमाणें, या सप्तऋषींनी किती कर्मे घेतली ? व कोणते नामाभिधान ठेविलें आहे ! त्रिनाहिकर्म शून्यच, कसें काय ? ते सांगा. कारण, जर त्यासप्तऋषींचीं, याजन, अध्यापन, प्रतिग्रहादीक तीनकर्मे कापली नाहींत् तर सारस्वताचीं तीन कर्मे, निश्चयलेंकरूनच गेलीं नाहींत्, हे लक्षात ठेवा. कारण, बाप षट्कर्मी असून, मुलगा तीनकर्मी, असें कोणत्याही शास्त्रांत नाहीं. आता चित्पावनादीकांनीं लिहिलेल्या द्वेषनामक शास्त्रांत असेल, तर मात्र, त्याच्या सिद्धांता विषयीं मी समर्थनाहीं ✗ कारण द्वेष या रोगावर, उपचारच नाहींत्, याविषयी चवथें प्रकरण पाहा.

एवंच तात्पर्यार्थकाय ? यावरतिकेल्या कथनानें त्यासप्तऋषींच्या कर्मांचा विचार केलाअसून जरते षट्कर्मीच आहेत, तर; सारस्वत उर्फ शेणवी, ब्राह्मणा विषयीं जोमजकूर लिहिला तो केवळ द्वेषानेच लिहिला असून, अक्षरशः खोटा आहे असेंम्हणण्यास कोणीकां, अनमानकरावें ! कारण शास्त्रहें दोघीमाणसास, लागूआहे असें असून जर त्यासप्तऋषींस बाधककरीतनाहीं, तर केवळ सारस्वताच्या द्वेषानेच लिहिलें आहे असें सिद्धहोतें. पाहा ! यामाणसाचीं द्वेषबुध्दी

दाखवितो ! तीअशीकीं, याकादंबरींत अनेक लोकांची निंदा असून नूतनतर आहेच, दुसरे असें आहेकीं, कराडे, चित्तपावन,व देवरुखे, यातीयांविषयीं इत्थंभूत वर्णन असून त्यांस प्रायश्चित्तें दील्याविषयीं, त्याक्षेत्राचें नाम, व प्रायश्चित्त देणाऱ्या ब्राह्मणाची संख्या व त्यांची नामें, इत्यादिक, विषय स्पष्ट लिहिले आहेत्. आणि यासारस्वतां विषयीं सर्व गुप्तच लिहिती. (नाव, गाव, संख्या इत्यादि काहीएक विषय लिहीत नाहीं) तर याच्या लिहिण्यावरुन हा सारस्वतांचा बद्ध द्वेषीच होता असेंसिद्ध होतें. आणि याची द्वेषबुधी खरी आहे किंवा नाहीं, याविषयींची खात्री, हें प्रकरण संपूर्ण वाचून पाहिल्याच्याअंती होईल. यांत संशय नाहीं.

असो आतां मीह्मणजे सारस्वतांनीं दुर्भिक्षकाळीं मत्स्य खाऊन निर्वाह केल्यानाहीं असे ह्मणतनाहीं, तर याचित्तपावनादिकांची द्वेषबुद्धी ही सर्व माझ्या विद्वज्जन प्रीय वाचकांस श्रुत होण्यासाठीं सप्रमाणे देऊन स्वल्पांत दाखवीतों.

आतां त्याकादंबरीच्या लिहिण्यावरुन सारस्वतांनीं अनावृष्टींत मत्स्यभक्षणकेलें, इतकेंच दिसतें, तरतें सासारस्वतऋषींनें कोणत्याविधीनें खाल्लि हेंसिद्ध होतनाहीं. तथापि त्याचेच बोलण्यावरुन सारस्वत दोषीआहेत् असे सिद्ध होत नाहीं. परंतु पक्षांतरानें येथें कोणी शंकाघेतील, तर तीशंका नघ्यावी, यांहेतूस्तव, त्यांनीं मत्स्य भक्षण केलेंत्याविधी सांगतो.

पुराकृतयुगस्यांतेह्यासीद्रामममहामते ॥
सिरस्तूतोमहादेशोदेवैःसेव्यश्चनिस्वशः ॥ ३३ ॥
कश्चित्कालेतुतद्देशेदुर्भिक्षमभवन्महत् ॥
वरुणात्सर्वलोकेपुरत्नानावृष्टिरभूत्तदा ॥ ३४ ॥

**अर्थ.**—तोअसतां, हेमहाभवेरामा! पूर्वी कृतयुगाच्या अंती देवानीं शेवीत, असाजो तिरुहूत (त्रिहोत्र) नामकदेश असताझाला. आणि सर्वदेशांमध्यें वरुणापासून, अनावृष्टीझाली ह्मणजे पर्जन्य नस-ल्याकारणानें, सर्वठिकाणीं दुर्भिक्षकाळ प्राप्तझाला.

तद्देशेपूर्वकालेतुसुधापानंकरोतिसः ॥
कालेदुर्भिक्षसंप्राप्तेअन्नाहारंचकारह ॥ ३५ ॥
तदन्नमभवत्क्षीणंतदाचिंतापरोभवत् ॥
कोद्रवाद्येश्चदुष्टान्नैःप्राणरक्षांचकारह ॥ ३६ ॥
तदन्नहीनमभवत्कंदमूलफलेच्छया ॥
वनंजग्मुश्चतेसर्वेप्राणरक्षानिमित्तकं ॥ ३७ ॥
तत्रापिहीनमभवत्प्राणरक्षोदकेच्छया ॥
दूरदेशेचजग्मुस्तेसर्वेप्राणहितेच्छया ॥ ३८ ॥
तस्मान्नहीनमभवत्वृक्षच्छायांचजग्मिरे ॥

**अर्थ.**—आणि त्यादेशांत पूर्वी सर्वलोक सुधापान (क्ष० ) अमृत प्राशन करीत होते. परंतु; दुर्भिक्षकाल प्राप्तझाल्याकारणानें, अन्न भक्षण करूं लागले. आणि तें अन्न, काहीं दिवस भक्षण केलें, परंतु; अन्नही मिळेना तेव्हां, कोद्रु भक्षणकरूं लागले. कांहीं दिवसानीं कोद्रुही संपले, त्यासमयीं, वनांतजाऊन, कंदमूलादिक पदार्थ भक्षणकरिते झाले. नंतर तेंही संपल्यानंतर, प्राणसंरक्षण व्हावा, येतदर्थ, उदकाच्याइच्छेनें दूर देशापर्यंत गमन करिते झाले. व तेंहे कांहीं दिवसानीं उदकही संपलें, त्याकाळीं वृक्षच्छायेपर्यंत गेले.

तत्रापिसूर्यरश्मीभिर्दहन्यमपुरंगताः ॥ ३९ ॥
तत्रसर्वेजनारामतृणाहारंचचक्रिरे ॥

तत्तृणंहीनमभवत्पत्राहारंचकारह ॥ ४० ॥
तदापश्चादितत्रैवतृणहीनंभवत्तदा ॥

अर्थ.—आणि वृक्षच्छायेप्रत गेल्यानंतर, कांहीं दिवसानीं सूर्य किरणाच्या, योगानें, कांहीं लोक दहनहोतसाते, यमपुराप्रत गेले (मरणपावले) नंतर कांहीं अवसिष्ठ राहिलेले लोक, तृण भक्षणकरू लागले. नंतर कांहीं दिवसानीं तृणही संपलें, तेव्हां लोक, पानें, भक्षू लागले. त्याकाली सर्वपर्शूस देसील तृणमिळेनासें झाले.

तृणंसर्वंलयंयातंशुष्कंधनमिवाग्निना ॥ ४१ ॥
तदातत्रमहाघोरंदुर्भिक्षमभवन्महत् ॥
तदायज्ञादिकाःसर्वेलयंयातानसंशयः ॥ ४२ ॥
श्रुतिस्मृत्यादिकंसर्वंकर्मकांडादिकंमहत् ॥
कर्मनित्यादिकंयच्चहाराधीनमभूत्तदा ॥ ४३ ॥

अर्थ.—आणि सुकलेलें काष्ट, अग्निच्या योगें करून जसें नष्ट होतें, त्याप्रमाणें, तें सर्वतृण नष्टझालें. तेव्हां मोठें भयंकर दुर्भिक्ष प्राप्त होऊन, त्या भयंकर दुर्भिक्षाच्या योगानें, यज्ञादिक ज्याक्रिया त्या सर्व लयाप्रत गेल्या- आणि श्रुति स्मृत्यादिक, जें कर्मकांड (नित्यकर्मादिक) तेंही आहारनसल्यामुळें, नाशाप्रत पावतें झाले.

अथसर्वेपिलोकाश्चतद्देशात्प्राद्रवन्किल ॥
दिग्भ्यस्तान्प्रद्रुतान्दृष्ट्वामुनिःसारस्वतस्तदा ॥ ४४ ॥
गमनायमतिंचक्रेसरस्वत्याःसकाशतः ॥
तदाकाशात्तुविप्रेंद्रगंभीरंवाक्यमब्रवीत् ॥ ४५ ॥
भोद्विजेंद्रशृणुष्वेदंवचनंपरमाद्भुतं ॥

त्वदग्रेपतितंमत्स्यंत्वंभुंक्ष्वद्विजोत्तम ॥ ४६ ॥
तेनत्वंदेहंरक्षस्वदेहात्सर्वंभविष्यति ॥
तद्देहाध्ययनादीनिसंकुरुष्वमहामते ॥ ४७ ॥
तदाइंद्रादिदेवानांकुरुष्वमखसत्क्रियां ॥
यज्ञभागंतदादेहिदेवेष्विंद्रादिकेष्वपि ॥ ४८ ॥

अर्थ.—नंतर त्यादेशांतील ऋष्यादीक सर्वलोक पळूं लागले, तेव्हां त्यास पाहून, सारस्वत ऋषीही, सरस्वतीच्या तीरापासून जाण्याविषयीं, उद्युक्तझाला. त्याकाळीं, आकाशामध्यें मोठा गंभीर शब्द उत्पन्नहोताझाला. तो असाकीं, हे द्विजश्रेष्ठा ! हें आमचें, वचन ऐक, आणि तुझ्या अग्रभागीं जोमत्स्य पडला आहे, तो तू भक्षण करून, आपलादेह संरक्षणकर. आतां तू ह्मणसील, मत्स्य भक्षणहें, अयोग्य असून तें कसें मीं आचरण करूं असें ह्मणसील तर श्रवणकर असें आहेकीं, प्राणसंरक्षणाच्या योगानें सर्वसाधून येतें. परंतु, प्राणगेल्यावर कांहींच साधन होणार नाहीं. याकारणास्तव, तुझ्या पुढ्यांत पडलेला मत्स्य तूं भक्षणकरून देहाचें संरक्षणकर. आणि देहसंरक्षण झाल्यावर, अध्यापनादिक कर्मेंकरून, इंद्रादि देवाप्रत, यजनकरून सर्व इंद्रादिदेवास यज्ञभाग अर्पणकर.

तदातुष्यंतिदेवास्तेइंद्राद्याःपरमादृताः ॥
वृष्टिंकरोतिइंद्रोपिदेवैःसर्वैरनेकगः ॥ ४९ ॥
तदाक्षेत्रादिकेसर्वेष्युद्भवत्यन्नमेवच ॥
तृणादिपश्वाहारादिसंभवंतिममाज्ञया ॥ ५० ॥

अर्थ.—ह्मणजे, तेणेंकरून, ( त्याआनंदेंकरून ) सर्व इंद्रादिदेव

संतुष्ट होतील. आणि, त्या आनंदाच्या योगानें, पृथ्वीवर चांगली पर्जन्यवृष्टी करतील. नंतर पर्जन्याच्या योगानें, सर्वधान्येंउत्पन्न होतील. व पश्वादिकांचें भक्षण जे तृण तेंहीं उत्पन्न होईल.

अन्नाद्भवंतिभूतानिपर्जन्यादन्नसंभवः ॥
यज्ञाद्भवतिपर्जन्योयज्ञःकर्मसमुद्भवः ॥ ५१ ॥
तस्मात्सर्वगतंब्रह्मनित्यंयज्ञेप्रतिष्ठितं ॥
नित्यंयज्ञादिकान्सर्वान्त्वंकुरुष्वद्विजोत्तम॥५२॥
तेनत्वंप्राप्स्यसेविप्रमंगलत्वंदिनेदिने ॥
तस्माद्विप्रेंद्रवर्येंद्रशृणुमेपरमंवचः ॥ ५३ ॥
त्वदग्रेपतितंमत्स्यंत्वंभुंक्षस्वमहामते ॥
त्वंनभुंक्ष्यसिचेद्विप्रमत्स्याहारंद्विजोत्तम ॥ ५४ ॥
तेनसर्वंलयंयांतिमूलच्छेदेयथापरः ॥
लयंयास्यतिविप्रेंद्रमत्स्यात्सर्वंभविष्यति ॥

अर्थ—आणि असें आहेकीं, अन्नापासून, सर्व भूतें ( प्राणी ) उत्पन्न होतात्. पर्जन्यापासून अन्न उत्पन्न होतें. आणि यज्ञा पासून, पर्जन्यपडतो. कर्मानें यज्ञ होतो. तस्मात् सर्व जगहें ब्रह्मच असून, असें हें ब्रह्म यज्ञाच्या योगेंकरून प्राप्तहोतें. म्हणून हेब्राह्मणश्रेष्ठा ! तूंनित्य यज्ञकर, म्हणजे दिवस दिवसाच्याठाईं कल्याण पावसील. या प्रमाणें सर्व प्रकार आहेत्. तर हें माझें मंगलदायक वचन ऐक. तेंअसेंकीं, तुझ्या अग्रभागीं पडलेला मत्स्य तूं भक्षणकर. आणि जरहा, मत्स्य तूं भक्षण केलास नाहीं- तर मुलच्छेद झाल्यावर वृक्ष जसा सर्व नाशास पावतो. त्याप्रमाणें तुझ्या प्राणाचा नाश झाल्यावर, सर्व देशाचा नाश होईल. आणि

जरहा मत्स्य भक्षण करसील तर; तुझे प्राण संरक्षण होऊन, सर्व लोकांचे व वेद शास्त्र पुराणादिकांचें ही रक्षण होईल.

श्रुत्वाऽशरीरवाणींतामुनिःसारस्वतस्तदा॥ ५५ ॥
॥सारस्वतउवाच ॥ कस्त्वंवदसिकोदेवकिजानामिपुरं परं ॥कस्मादागतमाख्याहियथातथ्यंमहामते ॥५६॥
श्रीरामउवाच ॥ भोद्विजेंद्रशृणुष्वेदंवचनंपरमाद्भुतं ॥
रामंमादेहरक्षार्थेविद्धित्वत्रागतंपरं ॥ ५७ ॥
त्वदग्रेपतितंमत्स्यंत्वंसेवस्वयथातथं ॥
तेनत्वद्देहरक्षस्वदेहात्सर्वंभविष्यति ॥ ५८ ॥
देहाद्वेदादिनष्टंचभविष्यतिनसंशयः ॥
तस्मात्त्वदग्रेपतितंहतमत्स्यंद्विजोत्तम ॥ ५९ ॥

अर्थ.—आणि याप्रकारें करून, आकाशातून झालेल्या शब्दातें श्रवणकरून, "सारस्वतमुनीं" विचारिता झाला. तें असेंकीं, दृष्टीस गोचर नहोतां, गंभीर शब्द करणारा, असा तूं कोण आहेस? हेंकांहीं मलासमजतनाहीं. याकरितां तूं कोण आहेस तें मला साग. याप्रमाणें सारस्वताचें भाषण श्रवणकरून, उत्तरदेताझाला. तें असेंकीं, हेब्राह्मण श्रेष्ठा, रामजो ह्मणतात तोमीच आहे. आणि तुझ्या देहाचें संरक्षण करण्याकरीताच मी येथें प्रवर्तझालों आहे असें जाण. आणि माझ्या वचनाप्रमाणें तुझ्या आग्रभागीं पडलेल्या

१ सुभिक्षता झाल्यावर त्या वेदाच्या योगानें उदर निर्वाह करतील.

२ ह्मणजे, तूंजर रक्षण केलेस नाहींत तर नाशच होइल. ( नाहींसे होतील. )

मत्स्य भक्षणकरून, देहाचें संरक्षण कर. जर देहसंरक्षण केलें तर, त्या देहाच्या योगानें सर्व साधून येतील, परंतु देह नष्टझाल्यावर सर्वच नष्ट होयील, यांत संशय नाहीं. तस्मात् तुझ्या अग्रभागीं मरणाप्रत पावलेल्या मत्स्य नूं भक्षणकर.

॥ द्विजउवाच ॥ रामरामजगन्नाथभक्तकल्पतरोप्रभो॥
हतमत्स्यंत्वयादत्तंभुंक्ष्यामितवाज्ञया ॥ ६० ॥
कथंविधिःकिमाचारोतन्मत्स्यस्यचवैहरे ॥
॥ रामउवाच ॥ लक्षणंतत्प्रवक्ष्यामिमत्स्याहारस्यसत्तम
॥ ६१ ॥ तच्छृणुष्वद्विजेंद्रेशयथातथ्यंसुदुर्लभं ॥
वर्षेवादशमेमासेअष्टमेसप्तमेपिवा ॥ ६२ ॥
पंचमेवापिविप्रेंद्रमत्स्याहारंतुकारयेत् ॥
सौम्येभौमेहिसोमेवामंदवारेविशेषतः ॥
आनयेत्धतमत्स्यंचगृण्हीयाद्विजसत्तम ॥ ६३ ॥

अर्थ—याप्रमाणें करून, रामाचें भाषण ऐकिल्यावर, सारस्वत ऋषी ह्मणतो कीं, हेजगाच्यानाथा ! भक्तांचे मनोरथ पूर्ण करणाऱ्या! हेरामा ! तूं दिलास असाजो हामृतमत्स्य, तो, मी तुझ्या आज्ञेवरून भक्षण करितो, परंतु, यामत्स्य भक्षणाचा विधि व आचार कसाआहे? तो, मलासांग याप्रमाणें सारस्वताचें बोलणें ऐकून, राम उत्तर देतातू. तें असें कीं, हेसारस्वतऋषी श्रेष्ठा एकावर्षानें, किंवा १० महिन्यानीं अथवा, ८ महिन्यानीं, किंवा ६ महिन्यानीं, किंवा ५ महिन्यानीं तरी मत्स्य भक्षण करावा. आणि, बुधवारीं, किंवा, मंगळवारीं, किंवा सोमवारीं किंवा मंदवारीं, मरणाप्रत पावलेला मत्स्य गृहण करावा.

कस्मिन्कालेपिविप्रेंद्रअब्धोमत्स्यंमृतंयदि ॥
तदानीयद्विजेंद्रेशाविधिद्दष्टेनकर्मणा ॥ ६४ ॥
आनीयादिवसेमत्स्यंप्रागणेभानुसंयुते ॥
स्थाप्योदकेनसंप्रोक्ष्यउल्मुकंस्पर्शयेत्तदा ॥६५॥
तस्यभागंपृथक्कृत्वातैलपक्कंतुकारयेत् ॥
स्थंडिलंकारयेत्तत्रस्थाप्याग्निगृह्यवद्यथा ॥ ६६ ॥
वरुणायेतिमंत्रेणदशमत्स्याहुतिंचरेत् ॥
तच्छेषंद्विजवर्येणसेवयेद्भक्तिमादरात् ॥ ६७ ॥

अर्थ–हेब्राह्मणश्रेष्ठा,! कोणत्याही काळीं समुद्रात, मरणाप्रत पावलेला मत्स्य असेल, तर तो आणून, आंगणात ठेवावा, आणि यथाविधीनें स्थाप्योदकघेऊन, प्रोक्षणविधीनें प्रोक्षण करावा. आणि प्रोक्षणकेल्यावर अग्निस्पर्शकरावा. आणि मत्स्याचे, पृथक् पृथक् तुकडे करून, तैलात पक्क करावे (तळावे.) नंतर स्थंडिलघालून, अग्नि प्रदिप्तकरावा. आणि "मत्स्यायाभि०" या मंत्रास "वरु णाय" अशीं अक्षरे लावून, यामंत्रानें, त्यामत्स्याच्या दाहा आहुत्या त्या प्रदिप्त केलेल्या अग्नींत द्याव्या.—आणि अर्पणकरून, जोशेष भाग राहिला असेल, तो, द्विजानीं (ब्र०) ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य, यातीघनीं आदरेंकरून भक्तिनें गृहणकरावा.

नसेवयतिमूढात्मामत्स्याहारंद्विजोत्तम ॥
द्विजाधमःसविज्ञेयोसत्यंसत्यमयोदितं ॥ ६८ ॥
यदाविध्युक्तमार्गेणमयोक्तेनचसत्तम ॥
त्वदग्रेपतितमत्स्यत्वंभुक्ष्स्वमहामते ॥ ६९ ॥

॥ सूतउवाच ॥ एवंतस्यवरंदत्वारामेणतद्विजस्यच ॥
जगामस्वेच्छयारामोरमेशोद्विजसत्तम ॥ ७० ॥
तदातदाज्ञयातत्रवेदविध्युक्तमार्गतः ॥
कृत्वाहोमंतुतत्शेषंगृहीत्वातद्विजेनवै ॥ ७१ ॥

**अर्थ**—आणि, जो द्विज, मत्स्यशेष, शेवन करीत् नाहीं कीं तो केवळ द्विजात अधम, ( हीन ) आहे असें जाणावें. तस्मात्, हे सारस्वतमुने ! तुला मी जो भक्षणविधी सांगितली, त्याविधीनें मत्स्य भक्षणकरून आपला प्राण संरक्षणकर. या प्रमाणें **राम सारस्वत** ऋषीप्रत बोलताझाला. आतां हीच कथा सूत शौनकादि ऋषीप्रत हाणतात् कीं, याप्रमाणें "**राम**" त्या **सारस्वत ऋषीप्रत** बोलून, आपल्या स्वस्थानाप्रत गेल्यावर, रामाचे प्रमाणें "**त्यासारस्वतमुनीनें,**" तो मत्स्यआणून, वेद विध्युक्त मार्गानें ( वेदांतसांगितल्याप्रमाणें ) हवनकरून, अवशिष्ट जो भाग ( होमशेष ) तो, आपण भक्षणकरिताझाला.

तेनप्राणादिकान्सर्वान्रक्षयित्वातदाज्ञया ॥
तदावेदादियज्ञादीन्रक्षयित्वायथातथं ॥ ७२ ॥
तदाइंद्रादिदेवादीन्यज्ञभागंददौतदा ॥
वृष्टयश्चभविष्यंतिसर्वदेशेयथापुरा ॥ ७३ ॥
○ इत्थमाहपुरासूतसंहितायांविचिंत्यतां ॥
○ तथामहाभारतस्यगदापर्वणिकेपिंच ॥
○ आस्तिस्वकीयवृत्तांतःसावधानेनाचिंत्यता ॥ ७४ ॥

अर्थ—याप्रमाणें त्या सारस्वत ऋषीश्रेष्टानें होमशेषजो भस्म, तो भक्षणकरून, सर्वांचे प्राणसरक्षणास्तव यज्ञ भाग इद्रादि देवांस देता झाला.—आणि त्या हाविर्भागाच्यायोगानें, इद्रादीदेव, संतुष्ट होऊन ज्याप्रमाणें पूर्वी (सुभिक्षतेंत) वृष्टीकरीत होते कीं, त्याच प्रमाणें, पुनः सर्व देशात पर्जन्यवृष्टी करिते झाले. याप्रमाणें, "सूतसंहितेमध्यें" "सूतपुराणीक," यानीं, "शौनकादीऋषीं प्रत" हीकथा विस्तारेंकरून कथन केलीआहे. त्याच प्रमाणें, "महाभारतातर्गतगदापर्वात" हीं स्वकीयश्लोकाचा) सारस्वत कीं कर्णे उर्फ शाण्णवी, ब्राह्मणाचा सविस्तारें करून वृत्तात दीहिला आहे. तरतो स्वस्थचित्तेंकरून यावरील दोनी ग्रथाचें अवलोकनानुरूप चिंतन करावें. तेणेंकरून कल्याणेचद्रबुवा! तुह्मी भाषणाचें नाव घेऊन जीं स्वकपोलवाक्यें छापून प्रसिद्धकेलीं, तीं, केवळ द्वेषानेंच केल्या किंवा नाहीं याचे किंचित् ज्ञानहोईल.

अहो! कल्याणेच्छूडी चित्तपावनादिकहो! अशाया दुरुक्ती रूपानुसार द्वेषकेल्यानें, त्याच सिद्धहोतो काय? आणि नूतन एक ग्रथरचून त्यास महानपडितांचें नावदिलें ह्मणून, त्यास कोणी प्राचीन ग्रथअसें ह्मणतील काय? आतां एरवादी अरण्यपंडितासारखाअसून शार्पेकरून कुबुद्धीच जर असेल, तरतो, याकल्याणेचद्रनेंदिलेल्या द्वेषरूपानुभूत स्वकपोल कादबरीला मानदेईल. विना जो दराअसून त्याचेअगींपाडित्यसत्ती आहे, तो, अशाया द्वेषरूपन्याया

१. यादींकाळ्यापुढें सुवृष्टी झाल्यावर सारस्वत कोंकणे ऊर्फ शाण्णवी ब्राह्मणास, सर्वऋषी शरणआल्यावरून सारस्वतानें त्यासर्व ऋषींस वेदाध्ययन सांगितलें असें असून तीं गुरुकिर्दीचीं वाक्यें असल्याकारणानें, तींसर्व दाहावे प्रकरणात घेतलीं आहेत् तीं पाहावीं. तेणेंकरूनउत्पन्न झालेल्या भ्रमाचा नाश नीश्चयें करून होईल.

त अवलोकनही करणार नाहींत्. कल्याणेच्छूनुवा ! हें आपण भद्रत्वें करून लक्षांत ठेवा.

विद्वज्जनवाचकहो ! देवाज्ञाअसून, दुर्भिक्षकाळीं, वेदविध्युक्तमार्गानें, यज्ञकरून, आत्मसंरक्षणार्थ, अवशिष्ट जो होमशेष, तो, कोणत्याही, ब्राह्मणानीं, गृहणकेलाअसतां, त्यागृहणाच्या योगानें, त्या गृहणकरणाऱ्या ब्राह्मणांची जात निराळी होऊन, तो अपल्या कर्मापासून भ्रष्टहोतोकाय ? आतां, यज्ञकरून होमशेष भक्षण केल्याबदल तोब्राह्मण भ्रष्टहोऊन, जातीपासून व्यतिरिक्त होतो असें जर सर्व विद्वज्जन पंडितांचे मत असेल, तर त्यासर्वविद्वज्जनपंडीतानीं उत्तमप्रकारचे मान्यग्रंथांतील शास्त्रार्थदेऊन जीमतें असतील तीं प्रगटकरावीं. तेणेकरून मी सर्वविद्वानांचा फार आभारी होईन. आतां वेदशास्त्राप्रमाणें म्हटलें असतां, ब्राह्मणानीं यज्ञअवश्यमेव करावा. आणि यज्ञकरून होमशेष जोराहिला असेल, तो, आदरेकरून ब्राह्मणानीं भक्षणकरावा. असेंअसून, सांप्रतकालापर्यंत, वेदातेंप्रमाणें भक्षण करीत आले. परंतु वेदाज्ञामान्यकरून त्याब्राह्मणानीं शेषभाग भक्षणकेल्याबदल तेब्राह्मण दोषी, किंवा भ्रष्टकर्मी, किंवा, अकर्मी झाले, किंवा त्याब्राह्मणाची जातचनिराळ केली, असें कोणत्याच मान्यग्रंथांत आढळत्नाहीं. इतकेंचनव्हे. तर, अद्यापपर्यंत कोणत्याच-विद्वानाचें विरुद्धकारक मतही दिसत् नाहीं. असें, असून, केवळद्वेषबुद्धीनें एकनूतन ग्रंथरचून त्याग्रंथांत पाहिजेतसीं, स्वकपोल कल्पित वाक्यें लिहिलीं असतां तोमान्यग्रंथ असें समजावें काय ? आतां जरतो मान्य म्हणावा तर, वेदशास्त्रादिकांवर व्यभिचारलएतें. तर, यांत कोणतें खरेंमानावें? आतां, वेदशास्त्र खोटेंमानून, सर्वविद्वज्जनपंडित माधवाची कादंबरीच, खरी, असें म्हणण्याविषयीं जर ते सर्व उत्सूक होतील, तर, तेथें माझा न इलाजआहे. त्यांत विद्वज्जन जर वेदशास्त्र खोटें, असें म्हणतील, तर, माझें लिहिणें

१०.

तरी खरें कशावरून ? अस्तू एवच नाना प्रकारच्या युक्तीनें मन तरंग उठविले असता ही, कल्याणेच्छू नामधारक, पुरुषानें, प्रदर्शीत केलेल्या जो माधव तो, केवळ सारस्वतऊर्फ शाणवी ब्राह्मणाचाच द्वेषी, होता असें नाहीं. तर वेदशास्त्राचा ही द्वेषी आहे. अस्तू मार्गव्यासादीक अनेक महर्षी होऊन गेले परंतु; याप्रकारचा शास्त्राधार कोणींच केला नाहीं, इतकेंच नव्हे, तर, लिहून देखील ठेव लानाहीं. ही त्या सर्व महर्षींची मोठी चूकच म्हटली तरी चालेल नाहींवरे ! किंवा यावित्तपावनादिकानीं त्यास्वकपोल वाक्याचा अर्थ भिन्नकेला असेल, तर मात्रनकळे. आता भिन्नकेला, असें जर म्हणावें तर तोमाधव काय सांगतो तें पाहा !

महायज्ञाश्चमत्स्येनब्राह्मणाश्चक्रुरन्वहं ॥
० इत्यर्थंयुष्माकिनाग्रथेमाधवेनसमीरितं ॥
० अतःकथंभवेद्दोषोविप्राणांवदपंडित ॥ ७५ ॥

शाण्णवीब्राह्मणांस ) कोणत्याधर्मशास्त्रानुमोदीत न्यायावरून लागूके-ला तो स्वस्थचित्तानें विचारकरून सांग.

विद्वज्जन पंडीतहो! यामाधवाच्याच लिहीण्यावरून, हा खरोखर सारस्वतांचा, वैरी व वेदविरुद्ध होता; किंवानाहीं? याचा शुद्धांत:करणानें न्यायकरून पाहा! आतां या चित्तपावनादिकानीं हा एकच स्वकपोल कल्पित ग्रंथ रचला असें नाहीं, तर, ज्याज्याग्रंथांत यानीं (चित्तपावनानीं) स्वकपोल कल्पित वाक्यें लिहिलीं आहेत् तीं सर्व कर्मे करून याच प्रकरणामध्यें, सर्ववाचकांसमोर प्रगटकरीतों. तेणेंकरून सर्व विद्वज्जन वाचकांच्या मनाचीखात्री होईल, यात संशयनाहीं अस्तु आता या चित्तपावनादिकानीं माधवाच्या लतिकेवरून सारस्वतउर्फ शोण्णवी हे ब्राह्मणनव्हे, किंवातीनकर्मी, अथवा अकर्मी झटले ह्मणून, सारस्वत तीनकर्मी किंवा, अकर्मी, होतात् असे नाहीं. आता चित्तपावनादिकानीं आपापल्या मनाची मात्र खात्री करून घेतली असेल तर असोत्. एवच तात्पर्यार्थकाय? द्वेषें करून जर हे सारस्वताची निंदा करूंलागले; तर त्याद्वेषास कोणता उपायचालतो? चालत् नाहीं. आणि याद्वेषापुढें वेदशास्त्रदेखील कुंठीत होऊन जातें (वेदशास्त्रालाही जडपडतें) असो आतां; विद्वज्जनवाचकहो!

---

१ शेणवी ह्मणण्याचें कारणकाय? असेह्मणाल, तर या शेणवी पदाचाविस्तार व याचेकारण, यापुस्तकाच्या १ प्रकरणात पाहा? आणि शेणवी हा शब्द केवळ गौडातच आहे असें नाहीं. तर द्राविडातही अनेक लोकास आहे. तर त्या शेणवीयापदावरून ते कितीकर्मी व त्या द्राविडादीकास शेणवीपद हे कोणत्याकारणास्तव प्राप्त झालें. याचा सिद्धांत करा? आणि कर्नाटक देशात शेणई, शानभाग, इत्यादिक पर्याय हे कुळकर्णी जो असेल त्याला ह्मणतात्, व त्याणें स्वर्गस्थ झाल्यावर त्याच्या मुलांस ही (शानभागर, मगा, अण्णा, तमा, अळिया.) असें ह्मणतात्.

अशाया ऋषी श्रेष्ठ सारस्वतानें कृतयुग हें पद्याचें असून त्यांत दुर्भिक्ष-काळीं, वेदशास्त्रादिकांच्या संरक्षणार्थ व आत्मसंरक्षणार्थही देवाळेवरून वेदविप्लुत मार्गानें यज्ञकरून होमशेष भक्षकेल्याबद्दल, सारस्वत तीनकर्मी, असें जर चित्तपावनादिकांचें मत असेल, तर, सांप्रत (ह०) पांच दाहावर्षां मार्गे दुर्भिक्षनसून वेदाज्ञा किंवा देवाज्ञाही नसतां कलींत वर्ज सांगितलेला असून, प्रत्यक्ष पशूपासून त्याच्या मांसानें यज्ञ करून, शेषभाग गृहणकेला असतां तेमात्र जातीपासून भिन्न न होतां षट्कर्मीच राहतात् काय? चित्तपावनादिकहो! ताडून मारूमारूते हाहा या म्हणीप्रमाणें कां बेर्वतनकरितां.

मित्रहो, ! दोष व कायदा म्हटला असतां, सर्व ब्राह्मणास सा-रखाच असतो. कारण दोषापासून एक पतीत होतो व एक शु-द्ध राहतो असें नाहीं. तर, तो सर्वत्रठिकाणीं दोषदायकच आहे. पाहा! याकालियुगात हिंसायज्ञहा प्रत्यक्ष वर्जसांगितलेला असून तो प्रत्यक्ष यांच्यामध्यें (देशस्थांत) करितात् तर, यात्रतिकें-च्या कार्यानें सारस्वतांस लागूकेलेल्या शास्त्राधाराप्रमाणें या सर्वांस, म्हणजे देशस्थादिकांस व हैव्यांस, तैलंगांस वकेरली इत्यादिक ब्राह्मणांस कर्महें म्हणावेत् काय? आतां मी, म्हणजे त्या सर्व ब्राह्मणाच्या द्वेषानें लिहितों किंवा वेद शास्त्र व्यतिरिक्त होऊन भाषण करितों असें नाहीं. तर वेदशास्त्रांत प्रतिपादित जीं या-वयें असतील तींच येथें सर्ववाचकांच्या ज्ञापनार्थ, व द्वेषदायकजे चित्तपावनादीक, त्यांच्या मनाच्या शांतर्थ काहीं वाक्यें दाखवितों. तीं सर्व वाचकानीं उत्तम प्रकारें करून अवलोकन करावीं!

तपःपरंकृतयुगेत्रेतायांज्ञानमुत्तमं ॥
द्वापरेयज्ञमेवाहुर्दानमेवकलौयुगे ॥
⊛ इत्थंपराशरमुनेर्वचनंहृदिचिंत्यतां ॥ ७६ ॥

अर्थ.— तीं असींकीं, कृतयुगामध्यें तपस्या, त्रेतायुगामध्यें ज्ञान, द्वापारयुगामध्यें, यज्ञ, आणि कलियुगामध्यें दान, हीं चारकर्मे चारयुगांमध्यें उक्तसांगितलीं आहेत्. याप्रमाणें कलियुगाचें स्मृतिकर्ते जे पराशरऋषी " यानीं यावचनाचें स्पष्टीकरण केलें आहे. त्याचें चिंतन करा. आतां या पराशरवचनावरून यज्ञहा द्वापारयुगाचा धर्म आहे असें सिद्ध होतें. आणि तो तर यांचामध्यें (इ०) देशस्थादि-कांमध्यें प्रत्यक्ष चालतो तर या पराशरवचनावरून सांप्रत यज्ञ करून होमशेष भक्षण करणाऱ्या ब्राह्मणास कर्माहं ह्मणावेत् काय ? आतां येथें शंका उत्पन्न होती तीअसी कीं.

अग्नीषोमीयंपशुमालभेतमितिश्रुतिः ॥
यावेदविहिताहिंसानसाहिंसेतिभावनात् ॥
श्रुतिस्मृतिविरोधेतुश्रुतिरेवगरीयसी ॥ ७७ ॥
धर्मजिज्ञासमानानांप्रमाणंपरमंश्रुतिः ॥
यज्ञार्थंपशवःसृष्टाःस्वयमेवस्वयंभुवा ॥ ७८ ॥
यज्ञस्यभूत्यैसर्वस्यतस्माद्यज्ञेवधोऽवधः ॥
हिंसात्ववैदिकायातुतयानर्थोध्रुवंभवेत् ॥ ७९ ॥
वेदोक्तयाहिंसयातुनैवानर्थःकथंचन ॥
⊕ इत्थंमनुस्मृतावस्तितथाभाष्यादिकेष्वपि ॥
⊕ अस्तिप्रमाणंप्रत्यक्षंस्वस्थेनहृदिचिंतय ॥ ८० ॥

अर्थ— वेदहा आनादी असून, वेदांत जी हिंसा करावी ह्मणून सांगितली, त्याविधीनें हिंसा केली असतां, तीहिंसा होत् नाहीं (हिं-साजन्यदोषलागत्नाहीं) आतां श्रुति स्मृति मध्यें विरोधयेईल तर श्रुतिमताप्रमाणेंच वर्तावें. कारण स्मृती पेक्षां श्रुति वरिष्ट (अधिक)

आहे. तस्मात् धर्म जाणणारानीं, श्रुतीच प्रमाण मानून वर्तावें. असें आहे ह्मणून वेदोक्त हिंसा याकरीतां वर्ज सांगितली नाहीं. आणि "ब्रह्मदेवानें" पशूजे उत्पन्नकेले, ते केवळ यज्ञासाठींच आहेत् ह्मणून यज्ञामध्ये यद्यपि पशूचा वधकेला, तथापि तोवध होत नाहीं. (तज्जन्यदोष लागत्‌नाहीं) आणि दुसरें असें आहे कीं, वेदोक्त हिंसाकेली असता, दोषतर लागत् नसून उलट पुण्याची वृद्धी होते. आणि वेदोक्त हिंसा द्विजर न करील तर पुण्याचा नाशहोऊनमोठे अनर्थ उत्पन्न होतात्. याप्रमाणें "ब्रह्मसूत्रभाष्यांत" " वेदांत " व मन्वादिकस्मृतींत" हा सर्वजनांस मान्य असा निर्णय सांगितला आहे. तस्मात् या अनेक वचनावरून उत्पन्न झालेल्या शंकेचें समाधान असें होतेंकीं, बहुजनांचेमतानें वेदप्रमाण, असून स्मृति-पेक्षा श्रुतिवरिष्ट असल्याकारणानें याकलींत प्रत्यक्ष हिंसा करावी. आणि त्या केलेल्या हिंसेच्या मांसानें यज्ञ करावा आणि तो केला असता, तज्जन्य दोष लागत् नाहीं, आणि यायज्ञाविषयीं अनेक प्रमाणें ही असून सर्वमान्य असल्या कारणानें हिंसायज्ञ करावा असें चित्तपावनादिकांपैकींच एक शास्त्री या वचनाचा आधार सांगता झाला. तो खरा परतु; या सर्व वचनावरून चित्तपावनादिकांचा पक्ष सिद्ध होत नाहीं. इतकेंचनव्हे; तर; कल्याणेकरानें दिलेल्या मा धवाच्या स्तिंदेस दोषयेऊन ती स्तिका खोटी असें सिद्ध होऊन गणेशशास्त्र्यादिकानीं बोललेल्या बोलण्यास स्पोक्तो व्यभिचार येतो. कारण मत्स्याच्या मांसेकरून वेदाविधुक्त मार्गानें यज्ञकरून होमशेष गृहण केल्याबदल १३ ब्राह्मणीं त्यास प्राय श्चित देऊन त्यांचीं १ कर्में करून घेतलीं असें त्या माधवाच्या स्वकपोल कादंबरी वरून चित्तपावनादिक, शणवी उर्फ सारस्वत ब्राह्मणाचा बद्धद्वेषकरूं लाग-ले, इतकेंच नाहीं, तर, कल्याणेकर नामक पुरुषानें आपला पक्ष सिद्ध

करण्यास्तव त्या कादंबरींतील काहीं वाक्यास सप्रमाणत्व देऊन ता० २९ माहे नोवेंबर सन १८६९चे जगन्मित्र नामक पत्रांतछापून प्रख्यात केली. व त्यावाक्याचा अर्थ पाहिला असतायद्यपि यज्ञकेला, तथापि ३ कर्मे जातात् असें स्पष्ट दिसतें. तर, आता (ह्म०) याकलींत दुर्भिक्ष नसून यज्ञकेला असता यामाधवाच्या वाक्याप्रमाणें, वाकीराहि-लेल्या तीनकर्मांचा व्यापार सांप्रत यज्ञकरणाऱ्या ब्राह्मणावर घडतो काय? त्यांत तोंही घडलाअसता पण तो केव्हा? जरहे चित्तपावना-दिक, यज्ञ केल्यास दोषनाहीं ह्मणते, किंवा श्रुतिस्मृति खरी असें मानते तर कदाचित् घडेल. हे तर केला असता ब्राह्मणाचीं कर्मेच जातात् असें ह्मणतात् तर या कल्याणेच्छूच्या व त्यामाधवा-च्याच न्यायावरून सांप्रत् पशूयज्ञ करून होम शेष भक्षणकरणारास (देशस्थादिकांस) षट्कर्मी असें कोण याआधारावरून ह्मणेल? एवच या कल्याणेछु दिक चित्तपावनाच्याच न्यायावरून हे (चित्त०) केवळ ब्रह्मद्वेषी असून वेद विरुद्ध आहेत् असें ह्मणण्यास काहींच बाधक दिसत् नाहीं. अस्तु एवच माझ्या बोलण्याचा भावार्थ यज्ञविषयींच असल्या कारणानें प्रथमता तोविषय दाखवितों.

तपःपरंकृतयुगेत्रेतायांज्ञानमुच्यते ॥
द्वापरेयज्ञमेवाहुर्दानमेकंकलौयुगे ॥ ८१ ॥
वेदःस्मृतिःसदाचारःस्वस्यचाप्रियमात्मनः ॥
एतच्चतुर्विधंप्राहुःसाक्षात्धर्मस्यलक्षणं ॥ ८२ ॥
श्रुतिस्तुवेदोविज्ञेयोधर्मशास्त्रंतुवैस्मृतिः ॥
उभावपिहितौधर्मौसम्यगुक्तौमनीषिभिः ॥ ८३ ॥
⊛ इत्थंमनुस्मृतावस्तिप्रविचारयपंडित ॥

अर्थ—येवरील वाक्याचा अर्थ मागें प्रदर्शीतकेलेल्या पराशरव-

चना प्रमाणेच आहे. परंतु; सारांशकाय? या "मनुवचना" वरूनही यज्ञ हा द्वापारयुगाचा धर्म आहे, असें सिद्ध होतें. स्मृतिपेक्षा, श्रुतिवरिष्ठ आहे ह्मणून जें सांगितलें, तें खरेंच आहे परंतु, वेद, शास्त्र, सदाचार, ( सर्व लोकांस मान्य असा आचार ) आणि ज्या कर्मेकरून आपलें कल्याणहोतें अथवा जें आपणास प्रीय तें. याप्रमाणेंकरून धर्माचीं चार लक्षणें आहेत. त्यांत श्रुति ( ह्म० ) वेद, स्मृति ( ह्म० ) मन्वादिकांचीं धर्मशास्त्रें त्यांतजो धर्म सांगितला तो आचरण केल्यानें अनाचें हितहोतें असें पंडितानींसांगितलें आहे याप्रमाणें "मनुस्मृतींत सांगितलें आहे त्याचाविचारकरावा.

यन्नदृष्टंचवेदेस्तुतद्दृष्टंस्मृतिभिःशुभे ॥
उभाभ्यांयन्नदृष्टंहितत्पुराणेषुगीयते ॥
® इत्यांहेनारदमुनेर्वचनंहृदिचिंत्यतां ॥ ८४ ॥

अर्थ—आता वेदच सांगावयाचाहोता परंतु, धर्मशास्त्र, व पुराणासंगण्याचें कारण काय? असें कोणी ह्मणतील; तर असें आहे की, जें श्रुतिनें पाहिलेंनाहीं तें स्मृतींतआहे. आणि जें श्रुति स्मृतींत नाहीं तें पुराणांत आहे. एवंच तात्पर्यार्थकाय? श्रुति, स्मृति, व पुराण, या तिहींतही एकापेक्षा एकविशेष आहे असें "नारदाचें वचन आहे "तस्मात् यावितीत ही विशेष असल्याकारणानें तोप्रदर्शीत करण्याकारितां यावाक्याची येथें योजना केली. आणि धर्म ह्मटलाअसतां यालाच ह्मणतात् तस्मात धर्म अंगीकार करणारानीं केवळ एकच आधार घ्यावा.

श्रुतिस्मृतीहिविप्राणांचक्षुषीपरमेमते ॥
काणःस्तत्रैकयाहीनोद्वाभ्यामंधःप्रकीर्तितः॥८५॥

शिष्टाचारःस्मृतिर्वेदास्त्रिविधंधर्मलक्षणं ॥
इत्थंहिकर्मसित्धांतेमुनिवाक्यंविचिंत्यतां ॥८६॥

अर्थ.—कारण; श्रुति स्मृती ह्यादोहीं ब्राह्मणमात्रांचीं नेत्रें आहेत्. आणि यांतून ( श्रुतिस्मृतींतून ) जर एक नसेल तर त्यासकाणा ह्मणावा. आतां दोहीं नसतील तर त्यास अंध ह्मणावा तस्मात् ह्याजगामध्यें शिष्टाचार व श्रुति स्मृति यामकारें करून धर्माचीं मुख्य तीन लक्षणें आहेत् याप्रमाणे "कर्मसित्धांतग्रंथामध्यें "धर्माचीं लक्षणें विस्तारें करून सांगितलीं आहेत् तर ह्या कलीयुगात यज्ञ करण्याविषयीं हीं सर्व प्रमाणें काय सांगतात् तीं पाहा.

नाकृत्वाप्राणिनांहिंसांमांसमुत्पद्यतेक्वचित् ॥
नचप्राणिवधःस्वर्ग्यस्तस्मान्मांसंविवर्जयेत्॥८७॥
योऽहिंसकानिभूतानिहिनस्त्यात्मसुखेच्छया ॥
सजीवंश्चमृतश्चैवनक्वचित्सुखमेधते ॥
इत्थंस्वायंभुवेनोक्तंविस्पष्टंप्रविचार्यतां ॥ ८८ ॥

अर्थ— तीं असीकीं, प्राण्याचा वधकेल्यावांचून मांस उत्पन्न होत नसून प्राण्याचा वध केला असतां स्वर्ग प्राप्ति होत नाहीं. तस्मात् मांसाचा त्याग करावा (वधकरूनयें) आणि जो पुरुष आपणास सुख होण्याच्या इच्छेनें प्राण्याची हिंसाकरितो (पशुमारतो,) तो पुरुष जीवंतपणीं व मेल्यावर ही सुख पावत् नाहीं. असें आहे ह्मणून प्राण्याचा वध करूनयें या प्रमाणें करून "स्वायंभूमनुनें" सांगितलें आहे तें उत्तम प्रकारें करून अवलोकन करावें.

मन्त्रान्वैयोजयित्वातुइहामुत्रचकर्मसु ॥
तथाविश्वभुगिंद्रस्तुयज्ञप्रावर्तयत्प्रभुः ॥ ८९ ॥
दैवतैस्सहसहृत्यमर्वसाधनसवृतः ॥
तस्याश्वमेधेवितितेसमाजग्मुर्महर्षयः ॥ ९० ॥
यद्यद्रियात्मकादेवायज्ञभागभुजस्तुते ॥
तान्यजतितदादेवा.कल्पादिपुभवतिये ॥ ९१ ॥
अध्वर्युंप्रैपकालेतुव्युत्थिताऋपयस्तथा ॥
महर्षयश्चतान्दृष्ट्वादीनान्पशुगणास्तदा ॥ ९२ ॥
विश्वभुजतेत्वपृच्छन्कथयज्ञविधिस्तव ॥
अधर्मोत्रलवानेपहिंसाधर्मेप्सयातव ॥ ९३ ॥
नव.पशुविधिरिस्त्वष्टस्तवयज्ञेसुरोत्तम ॥
अधर्मा ऱ्मघातायप्रारब्धःपशुभिस्त्वया ॥ ९४ ॥
नायधर्मोह्यधर्मोयनहिंसाधर्मउच्यते ॥
आगमेनभवान्धर्मप्रकरोतुयदीच्छति ॥ ९५ ॥
विधिदृष्टेनयज्ञेनधर्मेणाव्यसनेनतु ॥
यज्ञबीजैःसुरश्रेष्ठत्रिवर्गपरिमोपितैः ॥

⊛ इत्थमत्स्यपुराणेपिवर्ततेवलवत्तर ॥ ३६ ॥

अर्थ– आणि याचपक्षा विषयीं दुसरीं काहीं प्रमाणें असीं आहेत् कीं पुर्वी त्रैलोक्य राजसमर्थ इद्र ऐहिक व पारत्रिक यासवकर्मांविषयीं वेदमंत्राची योजनाकरून लोकात प्रथमत यज्ञकर्मांची प्रवृत्तिकरिता झाला आणि यज्ञाचे सर्वसाधनानीयुक्त तो इद्र, स

र्वदेनतांसहवर्तमान यज्ञ करीत असतां, त्याइंद्राचे विशाल यज्ञांत- चोहींकडून मोठमोठे ऋषी आले. आणि तेदेव त्याकाळीं य- ज्ञार्थ योग्यानून तेथें आले असतां, ते प्रतिकल्याचे आरंभीं इं- द्राचें साहाय्य करणारे देव असतात् ते त्यादेवाचें यजन करतात नतर अध्वर्युनें प्रेषोच्चार करण्याचे समयीं ते सर्वमहर्षीउटले आणि आर्तस्वरानें ओरडणाऱ्या त्या पशूच्या समुदायास पाहून ते द- याळू ऋषी, त्याकाळीं त्रैलोक्यराजइंद्रास विचारूं लागले कीं, हेइंद्रा! हा तुझे यज्ञाचा विधिकसा आहे. हे देवोत्तमाइंद्रा. यातुझ्या यज्ञांत धर्माच्या इच्छेनें ही दीन पशूची हिंसा चालली आहे हा महा क्लिष्ट अधर्मआहे; तस्मात् पशु मारण्याचा हाविधि तुझे यज्ञांत आह्मास इष्टनाहीं कारण, हे इंद्रा! त्वां धर्माच्या नाशार्थ पशूमारून हा अधर्म आरंभला आहेस तर हा काहीं धर्मनसून अधर्मच आहे. कारण शास्त्रांत हिंसेस धर्म असें ह्मणत् नाहींत्. तस्मात् तूंधर्म करण्यास इच्छीत असशील तर वेदाच्या प्रमाणानें धर्माचें आचरण कर हेदेवश्रेष्ठा! ज्याधर्मात इतरांस दुःख नाहीं अशा शास्त्रविधियुक्त यज्ञाचे विधीनें धर्म, अर्थ, व काम, यांचे साधनास कारण अशा यज्ञोपयोगी धान्यांचे बीजानीं यज्ञकर. यामकारें करून "मत्स्य- पुराणांत" पूर्वी सर्व महर्षीनीं सांगितलें आहे याचाविचार करा. आणि या "मत्स्यपुराणोक्ति"वरून कलींत हिंसायज्ञ करूनये असें सिद्धहोतें आणि याचपना विषयीं व्यासवचनही आहे.

यद्घ्राणभक्षोविहितःसुरायास्तथापशोरालभनंनहिंसा॥
एवंव्यवायःप्रजयानरत्यादिमंविशुद्धंनविदुःस्वधर्मं ॥
७ इत्थंश्रीमद्भागवतपुराणोक्तंविचारयंतां ॥ ९७ ॥

अर्थ—तें असेंकीं, अवघ्राणेंकरून (घाराच्यायोगें करून) सुरे-

सुरेचें पान सांगितलें तरी यज्ञांत पशूचें आल्भन करावें (ओवाळून त्याच्याहृदयाला स्पर्शकरून सोडावा.) परंतु; नहिंसयन् ह्मणजे मारूनयें याप्रमाणें "श्रीमद्भागवतांत" सांगितलें आहे त्याचा विचार करा.

असूर्यानामतेलोकाअंधेनतमसावृताः ॥
तांस्तेप्रेत्यापिगच्छंतियेकेचात्महनोजनाः ॥
इत्थंवाजसनीयायासंहितायांविचारय ॥ ९८ ॥
अहिंसापरमोधर्मोह्यहिंसापरमंतपः
अहिंसापरमंसत्यमहिंसापरमार्जवं ॥ ९९ ॥
अहिंसापरमोयज्ञस्तथाहिसापरंश्रुतं ॥
अहिंसासर्वभूतानांयथामातायथापिता ॥
इत्यमरतीतिहासादौतत्ववद्भिर्विलोक्यतां१००॥
निहतस्यपशोर्यज्ञेस्वर्गप्राप्तिर्यदीष्यते ॥
स्वपितायजमानेनकिंतुतस्मान्नहन्यते ॥
इत्थंविष्णुपुराणस्यवचनंप्रविचार्यतां ॥ १०१ ॥
पशुश्चेन्निहतःस्वर्गंज्योतिष्टोमेगमिष्यति ॥
स्वपितायजमानेनतत्रकस्मान्नहन्यते ॥
इत्थंबृहस्पतिःप्राहसावधानेनचिंत्यतां ॥१०२॥

अर्थ–आणि आत्माची हत्या करणाऱ्या पुरुषास उत्तमगती प्राप्त न्होता ज्यालोकीं सूर्य नाहीं (अंधारानें व्यापीत जो लोक) तो त्यास प्राप्तहोतो. याप्रमाणें "वाजसनीयसंहितेंत" व "ईशावास्योपनिषदांतही" विस्तारें करून सांगितलें आहे परंतु; विस्तारभयास्तव

एकच वाक्य प्रदर्शित केलें. आतां दुसरें असे आहे कीं, हिंसे सारखा अन्य कोणताच दोष नाहीं. आणि अहिंसेसारखें पुण्य दुसरें नाहीं. पाहा ! धर्म, तपस्या, सत्य, आर्जव, यज्ञ, श्रुत, हीं सर्व अहिंसेच्या योगानेंच प्राप्त होतात तस्मात् सर्व प्राण्यास अहिंसे सारखा माता पिता दुसरा कोणींच नाहीं. तस्मात् सर्वप्रकारें-करून प्राण्याचें संरक्षण अहिंसा करिते. याप्रमाणें "इतिहासादि ग्रंथांत" सांगितलें आहे तें पाहा. आणि सांप्रत, प्रत्यक्ष पशुहिंसा करणारांस किती कर्मांचा अधिकार आहे त्याचा सिद्धांत करा. आतां यज्ञामध्यें पशु मारिला असतां त्या मारलेल्या पशूस स्वर्ग लोक प्राप्त होतो ह्मणून जें पूर्वी सांगितलें तें खरें परतु; यज्ञ करणारा जो यजमान तो आपल्या बापास कां मारीत नाहीं ? वास्तवीक पाहा! यज्ञांत पशु मारिला असतां जर त्यापशूस स्वर्ग प्राप्ति होते तर आपल्या बापासही यज्ञांत मारावा तेणें करून बापासही उत्तम गति प्राप्त होईल. याप्रमाणें "विष्णुपुराणांत" व "बृहस्पतीनेंही" सांगितलें आहे. त्याचाविचार करावा.

ॐ केवलंस्मृतिवाक्यंनश्रुतिवाक्यंचवर्तते ॥

ॐ भवतांज्ञापनार्थायकिंचिदत्रवदाम्यहं ॥ १०५ ॥

अर्थ–आतां या यज्ञाविषयीं केवळ स्मृतिवाक्यच आहे असें नाहीं, तर श्रुतींत देखील वर्जाविषयीं अनेक वचनें आहेत परतु, विस्तार भयास्तव तुमच्या ( चित्तपावनादिकांच्या ) ज्ञापनार्थ कांहीं वचने दाखवितों.

पुरुषं वेदेवाः पशुमालभंत. तस्मादालब्धान्मेध उदकामत्सोऽश्वंप्राविशत्तस्मादश्वोमेध्योऽ भवदथैन मुत्क्रांत मेधमत्यार्जत, सकिंपुरुषाभवत्तेऽश्वमालभं

त. सोऽश्वादालब्धादुदक्रामत्सगां प्राविशत्तस्मात् गौर्मेध्योभवदथैनमुत्क्रांतमेधमत्यार्जत, सगौरमृगो भवत्तेगामालभंत. सगोरालब्धादुदक्रामत्सोऽविंप्राविशत्तस्मादविर्मेध्योभवदथैनमुत्क्रांतमेधमत्यार्जत, सगवयोभवत्तेऽविमालभंत. सोऽवेरालब्धादुदक्रामत्सोऽजंप्राविशत्तस्मादजोमेध्योभवदथैनमुत्क्रांतमेधमत्यार्जत, सउष्ट्रो भवत्सोऽजेज्योक्रमामिवारमत. तस्मादेप एतेपां पशूनांप्रयुक्तमो यदजस्तेऽजमालभंत. सोऽजादालब्धादुदक्रामत्सइमांप्राविशत्तस्मादियंमेध्या भवदथैनमुत्क्रांतमेधमत्यार्जत, सशरभो भवत्त एवउत्क्रांतमेधा अमेध्याः पशवस्तस्मादेतेपां नाश्नीयात्. ॥ १०६ ॥

अर्थ—तें असी कीं, कोणेककालीं, देवानीं यज्ञाकरितां मनुष्य मारिला. त्यामारलेल्या मनुष्यात यज्ञोपयोगी जो पवित्रांश होता तो, घोड्याच्या शरीरामध्ये गेला. ह्मणून तो कुत्सित झाला. सबब मनुष्याचा त्यागकरून यज्ञार्थ घोडामारिला. नतर त्या घोड्यापासून तो पवित्रांश निघून बैलाच्या देहात गेला. ह्मणून त्याघोड्याचा त्यागकरून पवित्रांशयुक्त जो बैल त्यास यज्ञार्थ मारिला. नंतर त्यातूनही तो पवित्रांश निघून मेंढ्यात गेला ह्मणून त्या बैलाचा त्याग करून, मेंढ्यात मारिला. मग त्या मेंढ्यातून्ही तोहविर्भाग (पवित्रांश) ग च्यन न गेला. सबब त्यामेंढ्याचा त्यागकरून गवा मारिला. नंतर तोहविर्भाग (पवित्रांश) बोकडात प्रवेश करिता झाला. नतर तोगवा

अमेध्य (अपवित्र)झाल्या कारणानें गव्याचा त्यागकरून बोकडमारिला. परंतु; इतर पशूं पेक्षांबोकडांमध्यें तो अंश बहूतवेळ राहिला ह्मणून सर्व पशूंत बोकड श्रेष्ठ आहे. नंतर तोहविर्भाग ( पवित्रांश ) बोकडापासून उंटामध्यें, गेला. त्याकालीं त्या बोकडाचा त्यागकरून, उंट मारिला. त्यावेळीं तो पवित्रांश जो हविर्भाग तो पृथ्वींत गेला. त्याकालीं पृथ्वीमेध्य ( पवित्र ) झाली. पुनः तोहविर्भाग शरभांत गेला. नंतर त्याचाही त्यागकेला. याप्रमाणे सर्व पशूतून तो हविर्भाग (पवित्रांश ) निघून गेल्यामुळें सर्व पशु अमेध्य (अपवित्र) आहेत असे जाणून त्यांच्या मासानें यज्ञकरून शेषभाग भक्षण करूनयें असे " ऋग्वेदांमध्यें ऐतरेयब्राह्मण ह्मणून जो ग्रंथ " त्यांत हीं वरील वचनें स्पष्ट सांगितलीं आहेत त्याचे स्वस्थचित्तानें अवलोकन करून चिंतनकरावें. एवंच.तात्पर्यार्थकाय? प्रदर्शित केलेल्या सर्व शास्त्राधारावरून विचार केला असतां कलींत पशू हिंसाकरून यज्ञ करावा असे सिद्ध होत नाहीं. असें असून या सर्व वचनाकडे न पाहतां हे ( देशस्थादिक ) प्रत्यक्ष पशु हिंसाकरून यज्ञ करितात. तर या " माधवाच्या " कायद्याप्रमाणें सांप्रत यज्ञकरून पशु मांसाचा जो शेषभाग तो गृहण करणारांस कर्माई ह्मणावेत् काय ? यांस कर्माई ह्मणावें असें जर चित्तपावनादिकाचे मत असेल तर पूर्वी सारस्वत कोंकणे उर्फ शाण्णवी ब्राह्मणा विषयीं " स्वकपोल्ल कादंबरींतील कांहीं वचनें घेऊन जो दोष दिला त्यावर तिळां जुळी द्या आणि असेंच होईल तें जाण. तस्मात् आमच्या पक्षावर ("सारस्वतांवर") जशी दृष्टी ठेवली आहे, त्याचप्रमाणे तुमच्या पक्षावर ह्मणजे सांप्रत च्या मानानें " देशस्थादिकांवरही " दृष्टी द्या. कारण " आत्मवत्सर्वभूतानियः पश्यतिस पश्यति " असे आहे कीं प्राणि मात्रास आत्मवत् मानणारा जो पुरुष आहे तोच ज्ञानी व त्यालाच पाहणारा

असें म्हणतात्. तर हें " गीतावचन " स्मरून यावचना प्रमाणेंच उभय पक्षावर दृष्टी द्या. आतां ते " देशस्थादिक " वेदशास्त्राप्रमाणें वर्ततात् असें म्हणाल तर शास्त्रांत असें आहे कीं-

मधुपर्केचयज्ञेचपितृदैवतकर्मणि ॥
अत्रैवपशवोहिंस्यानान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ॥१०७॥
एष्वर्थेषुपशून्हिंसन्वेदतत्त्वार्थविद्द्विजः ॥
आत्मानंचपशुंचैवगमयत्युत्तमांगतिं ॥
⊛ इत्थंमनुस्मृतावस्तिसावधानंविचार्यतां ॥ १०७॥

अर्थ–मधुपर्कांत, यज्ञांत, पितृकर्मांत, (श्राद्धांत) किंवा देव कर्मांत, पशु हिंसा करावी, अन्यकर्मांत करू नये याप्रमाणें " मनुस्मृतींत " सांगितलें आहे. आणि या चार ठिकाणीं पशु हिंसा जो करितो तो उत्तम लोकास जातो व तो पशूही त्याच लोकास पावतो असें आहे. आणि यास दुसरें प्रमाण.

मातारुद्राणांदुहितावसूनांस्वसादित्यानाममृतस्यना भिः ॥प्रनुवोचंचिकितुषेजनायामागामनागामदि तिंवधिष्ठ इतिपीत्वोमुत्सृजतेत्युत्सृष्टमांसोम धुपर्कोभवतिभवतीतिश्रुतिः ॥ १०८ ॥

अर्थ.–"मातारुद्राणां०" हा मंत्र म्हणून मधुपर्कांत पशु तोडावा. म्हणजे मधुपर्क यथासांग होतो. याप्रमाणें "आश्वलाय नगृह्यसूत्रांत" सांगितलें आहे. यास दुसरें प्रमाण.

ऐणरौरववाराहशाशैर्मांसैर्यथाक्रमं ॥
मासवृद्ध्याभितृप्यंतिदत्तैरिहपितामहः ॥

॥ इत्थंहियाज्ञवल्क्यस्यस्मृतिवाक्यंविचिंत्यतां १०९
रोरवेणचतृप्यंतिमासान्पंचदशैवतु ॥
व्याघ्रसिंव्हस्यमांशेनतृप्तिर्द्वादशवार्षिकी ॥११०॥

अर्थ.—ऐण, रुरु, वराह, व्याघ्र, सिंव्ह, आणि ससा, या च्या मासानीं यथानुक्रमानें श्राद्ध करावें तेणेंकरून पितृदेवता ज्या आहेत त्या तृप्त होतात्. असें "याज्ञवल्क्यस्मृतींत" "व मनुस्मृतींत" ही विस्तारें करून सांगितलें आहे परंतु; विस्तार भयास्तव दोनच प्रमाणें दाखविलीं. त्याचा विचार करावा. आतां यावरील सर्व वचनावरून (ह०) "याज्ञवल्क्य," "आश्वलायन," आणि "मनु" या तीघाच्या वचनावरून, मधुपर्कांत, पितृयज्ञांत, व श्राद्धांत, या तीन ठिकाणीं मासानेच यज्ञ करावा असें स्पष्ट होतें. तर या तीन ठिकाणीं नसून केवळ यज्ञातच हिंसा करितात् हें कसें? तस्मात् या तुमच्या (देशस्थादिकांच्या) वर्तणुकीवरून तुह्मी शास्त्राप्रमाणें वर्तता असें सिद्ध होतें काय? सिद्ध होत् नाहीं असें ह्मणावें तर पूर्वपक्षकाराकडून येथें शंका उत्पन्न होती, ती अशी कीं,

अग्निहोत्रंगवालंभंसंन्यासंपलपैतृकं ॥
देवराच्चसुतोत्पत्तिःकलौपंचविवर्जयेत् ॥ १११ ॥
विधवायांप्रजोत्पत्तौदेवरस्यनियोजनं ॥
मांसदानंतयाश्राद्धेवानप्रस्थाश्रमस्तथा ॥११२॥
इमान्धर्मान्कलियुगेवर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥
॥ इत्थंनिर्णयसिंध्वादौनिर्णीतमवधार्यतां॥ ११३ ॥

अर्थ.—या तीन यज्ञांत पशु हिंसा करावी ह्मणून जें सांगितलें, तें खरें परंतु; याकलींत, अग्निहोत्र, गवालंभ, सन्यास, श्राद्धांत

मांस आणणें, दिरापासून, पुत्रउत्पन्नकरून घेणें, मिळूनहीं पांच कर्में कलियुगांत वर्ज्य सांगितलीं आहेत्. तसाच, वानप्रस्थाश्रम हाही वर्ज सांगितला आहे. याप्रमाणें हे वरील धर्म कलींत वर्ज करावेत् असें "निर्णयसिंध्वादिकनिबंधांत" सांगितले आहेत् तें वाचून पाहा. आणि या वचनावरून या तीन ठिकाणीं तर हिंसा वर्ज्य करावी असें सिद्ध होतें. आणि या वचनांत अग्निहोत्र आणि संन्यास हे वर्ज सांगितले ह्मणून येथें कोणी शंका घेईल, तर असें आहे कीं,

यावद्वर्णविभागोस्तियावद्वेदःप्रवर्तते ॥
संन्यासंचाग्निहोत्रंचतावत्कुर्यात्कलौयुगे ॥
⊛ इत्थंनिर्णयसिंधौहीतथोक्तंस्मृतिदर्पणे ॥ ११४ ॥

अर्थ.—या कलियुगामध्यें जावत्कालपर्यंत वर्ण संकर झाला नाहीं (निरनिराळे वर्ण आहेत्) व जावत्कालपर्यंत वेद नष्ट झाला नाहीं, तावत्कालपर्यंत, सन्यास आणि अग्निहोत्र हीदोन्हीं गृहण करावीं. असें असल्याकारणानें आलेल्या शंकेचें समाधान निर्बाधपणें करून होतें. एवंचतात्पर्यार्थ काय? या वरील वचनावरून मधुपर्कांत आणि पितृयज्ञांत कलींत हिंसा वर्ज करावी असें असल्याकारणानें येथें शंका घेण्याची जरूरी दिसत नाहीं. तें खरें परंतु; "श्रुतिस्मृतिविरोधेतु श्रुतिरेवगरीयसी." स्मृतिपेक्षां श्रुतिवरिष्ठ असल्याकारणानें धर्म आणणारानीं श्रुतिप्रमाणेंच वर्तावें ह्मणून जें पूर्वी सांगितलें त्यास विरोध येतो कारण श्रुतिही मधुपर्कांत पशु आलंभनकरावा ह्मणून सांगत असून स्मृती करूं नयें ह्मणून सांगते व त्या स्मृतिवरून करितही नाहींत तर हें न करण्याचें कारण पाहिलें असतां श्रुतिपेक्षां स्मृतिच वरिष्ठ दिसत आहे. तस्मात् पूर्वोक्त

वचनावर व्यभिचारलयेतें. आतां स्मृतिही केवळ मधुपर्काविषयीं आणि पितृयज्ञाविषयींच विरुद्ध आहे असें नाहीं तर ज्योतिष्टोमाविषयीं ही विरोधकारकच आहे. तें या खालीं प्रदर्शित केलेल्यावचनावरून पाहा ह्मणजे स्पष्ट दिसेल.

समुद्रयातुःस्वीकारःकमंडलुविदारणं ॥
द्विजानामसवर्णासुकन्यासूपयमस्तथा ॥११५॥
देवराच्चसुतोत्पत्तिर्मधुपर्केपशोर्वधः॥
मांसदानंतथाश्राद्धेवानप्रस्थाश्रमस्तथा ॥ ११६॥
दत्ताक्षतायाकन्यायाःपुनर्दानंपरस्यच ॥
दीर्घकालंब्रह्मचर्यंनरमेधाश्वमेधकौ ॥ ११७ ॥
महाप्रस्थानगमनंगोमेधश्चतथामखः ॥
इमान्धर्मान्कलियुगेवर्ज्यानाहुर्मनीषिणः॥११८॥
⊛ इत्थंबृहन्नारदीयपुराणमवलोक्यतां ॥
सौत्रामण्यादियज्ञेपिसराग्रहस्तथा ॥ ११९॥
मद्यभक्षाद्यमावाद्यागमस्यतुनमानत ॥
⊛ इत्थंनिर्णयसिंधौहिस्थितंसम्यक्‌विचार्यतां १२०॥
उद्वयापुनरुद्वाहंज्येष्टांशंगोवधःस्तथा ॥
कलौपंचनकुर्वीतभ्रातृजायांकमंडलुं ॥
⊛ इत्थमादित्यपौराणवचनंप्रविचार्यतां ॥ १२१ ॥

अर्थ.—तीं असीं कीं, समुद्रांतून गमन करणाराचा स्वीकार करूं नये कमंडलूचें विदारण, आणि द्विजानीं असवर्णातील कन्येशीं

तुमच्याच ("चित्तपावनादिकांच्याच") न्यायानरून सिद्ध होईल. आतां आपला पक्ष सिद्धकरण्याकारितां बोलल्लेल्या वचनास सत्यत आणण्याची इच्छा धराल तर तुमच्या ठिकाणीं ("चित्तपावनादि०") स्योक्ति व्यभिचार येतो त्याचें चिंतन करा. आणि वेद शास्त्रांस मान्य करून ते (देशस्थादिक, व तुळवे, हैवी, केरळी) चालतात असें जर तुमचें (चित्तपावनादि०) मत असेल तर वेदांत व शास्त्रांत ज्याज्या ठिकाणीं जीजी कृती करावी ह्मणून सांगितली ती करण्यास प्रवर्त व्हा., आणि

यःशास्त्रविधिमुत्सृज्यवर्ततेकामकारतः ॥
नससिद्धिमवाप्नोतिनसुखंनपरांगतिं ॥
तस्माच्छास्त्रंप्रमाणंतेकार्याकार्यव्यवस्थितौ १२६

अर्थ—शास्त्रोक्त विधीटाकून आपल्या इच्छे प्रमाणें वागणाऱ्या पुरुषास कार्य सिद्धि किंवा सुख अथवा उत्तमगति कधींही प्राप्त होणार नाहीं. आणि जो शास्त्राप्रमाणें वर्ततो त्यास सर्वही साधून येतें असें आहे. तस्मात् कार्या कार्य व्यवस्थेविषयीं शास्त्र प्रमाण मानून वागावें याप्रमाणें "गीतेंत" सांगितलें आहे. तर या गीतेच्या वचनाप्रमाणें, सारस्वतांविषयीं प्रदर्शित केलेला जो माधवाचा कायदा तो याकालींत (ह्म० ) पाच दाह वर्षां मागें ज्योतिष्टोमादिक यवाजपेयादिक यज्ञकरून होमशेष भक्षण केलेल्या ब्राह्मणास लागू होती किंवा नाहीं तो पाहा. कारण सारस्वत ऋषीनें, दुर्भिक्षकाळांत, देवाज्ञेवरून, सात यज्ञकरून होम शेष भक्षण केल्याबद्दल तीन कर्मे कापून घेतलीं ह्मणून जें लिहिलें, तर त्याच लिहिण्यावरून सांप्रतकाळीं दुर्भिक्ष नसून किंवा देवाज्ञादी नसून शेषभाग गृहण करणारांस बाकि राहिलेल्या तीन कर्माचातरी अधिकार आहे काय?

याचा सिद्धांत करा. आतां "देशस्थादिकांनीं" यज्ञकरून होम शेष जें पशु मांस तें भक्षण केलें असतां त्यांचीं कर्में जात नाहींत, किंवा, त्यांच्या षट्कर्मास बाधक येत नाहीं, असें जर तुमचें ( चित्पावनादिकांचें ) मत असेल तर, माझेही तुह्मांस (चित्तपावनादिकांस ) तेच उत्तर आहे असें समजा कारण.

यत्रोभयोःसमोदोषःपरिहारोपिवासमः ॥
नैकःपर्यनुयोक्तव्यस्तादृगर्थविचारणे ॥ १२७ ॥
⊛ इत्थंहितर्कभाषादौसंप्रोक्तमवधार्यतां ॥
⊛ शंकामाकुर्वतःसम्यपरिहारस्यचद्वयोः ॥ १२८ ॥

अर्थ—दोष येईल तर उभय ठिकाणीं सारखाच, येऊन जाईल तर सारखाच जाईल. असें "तर्कभाषेंतील" वचन आहे. तर या तर्क भाषेच्या वचनाप्रमाणें उभय ठिकाणीं ह्मणजे गौडांत, व द्राविडांत, ही दोषापत्ति सारखीच भासती तस्मात् "कल्याणेच्छु दिकसम्यचित्तपावनहो ! उभयठिकाणींही दोषाचा व्यापार सारखाच भासत असल्या कारणानें. यामतीच्या कुतर्क शंका करूं नका.

⊛ अस्मद्वर्गेपियादृष्टिःसात्वत्पक्षेपिदीयतां ॥
मातृवत्परदारांश्चपरद्रव्याणिलोष्ठवत् ॥ १२९ ॥
आत्मवत्सर्वभूतानियःपश्यतिसपश्यति ॥
⊛ इतिचाणाख्यनीत्युक्तेस्तद्न्मामवलोकय॥ १३० ॥

अर्थ—आणि जशी आमच्या वर्गस्थलोकांवर ( सारस्वतकोंकणेऊर्फ शाणवींब्राह्मणांवर) दृष्टी दिली आहे त्याप्रमाणें आपल्या पक्षावर ( ह्म० ) सांप्रतच्या मानावरून देशस्थादिकांवर दृष्टीद्या. कारण असें आहे कीं, दुसऱ्याचे स्त्रीस मातें प्रमाणें मानणें दुसऱ्या-

चैंधन मृत्तिकेप्रमाणें मानणें, आणि सर्व प्राणिमात्रास आत्मवत् मानणारा जो पुरुष त्यालाच पाहणारा असें ह्मणतात् याप्रमाणें "नीतिशास्त्रोक्तवचन" आहे तर त्या वचनाप्रमाणें आमच्या पक्षास दृष्टीचा कारण असें आहे कीं,

कृतेपततिसभाष्यंत्रेतायास्पर्शनेनतु ॥
द्वापरेभक्षणेतस्यकलौपततिकर्मणा ॥ १३१ ॥
कृतेतत्क्षणिकःशापस्त्रेतायादशभिर्दिनैः ॥
मासेनद्वापरेज्ञेय.कलौसवत्सरेणतुः ॥ १३२ ॥
युगेयुगेपुयेधर्मास्तेपुधर्मेपुयेद्विजाः ॥
तेषांनिंदानकर्तव्यायुगरूपाद्विजोत्तमाः ॥
❁ इत्थंपराशरवचःसावधानेनचिंत्यता ॥ १३३ ॥

अर्थ—कृतयुगामध्यें पतित पुरुषाशीं भाषण केलें असता भाषण करणारा पुरुष पतित होत होता, त्रेतायुगात पापी पुरुषाचा स्पर्श झाला ह्मणजे तो स्पर्श करणारा पतित, द्वापारात पतितान्न भक्षणानें पतित आणि याकलींत पापकरणारा पुरुषमात्र पतित होतो आणि कृतयुगात शापाचें फल शाप देण्याबरोबर प्राप्त होत होतें त्रेतायुगात शाप दिल्या दिवसापासून दाहव्यादिवशीं दिसू लागलें द्वापारात, महिन्यानें दिसूंलागलें आणि याकलींत शापदिलेल्या दिवसापासून एका वर्षानें फलदिसतें याप्रमाणें धर्मांच्या कनिष्ठ कनिष्ठ गति होत चालल्या याकारणास्तव पृथक् पृथक् युगांत द्विजहे पृथक् पृथक् धर्म आचरण करू लागले ह्मणून त्याची निंदा सर्वथा करू नयें याप्रकारें

१ पाप याविषयींतर बाहुल्हतेची जरूरीच नाहीं कारण जे विद्वान ह्मणवीतात् तेच प्रथमता आपल्या हिंदुधर्मास कटाळून जातात् मग अविद्वानाची काय कथा ?

करून "पराशराचें वचन" आहे तें पाहा नंतर शाणवीऊर्फ सारस्वत ब्राह्मणाची निंदा करण्यास प्रवृत्त व्हा.

आतां हे सर्वप्रकार "कल्याणेच्छूवर्यास" ठाउक असून "गणे शशास्त्र्याच्या" बोलण्यास सत्यत्व आणण्याच्या इच्छेनें नकळत्याचें रूप धरून तारीक २९ माहे नोवेंबर १८९९ चे जगन्मित्र नामक वर्तमानपत्रांत कांहींमजकूर प्रदर्शित केला. तो असाकीं "जर शेणवीहि ब्राह्मण असते तर, पंचद्राविडांमध्यें, गौडांमध्ये, निदान शूद्रजातीमध्यें तरी वृत्तीचीं कर्में त्यानीं चालविलीं असतीं" असें तो कल्याणेच्छू नामधारक लिहितो. तर या याच्या लिहिण्यावरून हा किती विद्वान समजावा! कारण हाच प्रथमतः ह्मणतो ते असें कीं; "शिवछत्रपतिमहाराज्यांच्या" समोर झालेला ठराव व त्यातील जी नक्कल. व त्यानकलेंतील सारांश असें स्पष्ट तो त्याच्या प्रथम पत्रांत लिहीतअसून तोच पुनः निदान गौडांत तरी वृत्ती चालविली असती! असें ह्मणतो तर या याच्याच लिहिण्यावरून "शिवछत्रपतिमहाराज्यांच्या" समोर झालेल्या ठरावाची नक्कल कल्याणेच्छूनें निलालस पाहिलीच नाहीं. इतकेंच नव्हे तर; श्रवण देखील केली नाहीं असें ह्मणण्यास कांहींच बाधक दिसत नाहीं कारण जर त्याणें ती नक्कल अवलोकन केली असती तर त्या नक्कलेंतील शेवटल्या मजकुराकडे पाहिलें नसतें काय? किंवा त्यावेळेस भूल पडली असेल तर नजाणो, किंवा द्वेषानें दुर्लक्ष केले असेल तरमात्र नकळे.—:

असो आतां ती संपूर्ण नक्कल मजपाशीं (ल०) लक्ष्मण नारायण केणी शास्त्री या० आहे परंतु विस्तार भयास्तव सर्व येथे न दाखवितां शेवटला थोडासा मजकूर "कल्याणेच्छूच्या" ज्ञापनार्थ दाखवितों आणि ही सर्व नक्कल पाहण्याची असेल तर त्यास ती दाखविली जाईल.

## श्री शिवछत्रपती महाराज यांच्या समोर झालेल्या ठरावाच्या नक्कलेंतील सारांश.

या नक्कलेच्या ठरावांत मुख्य जे पंडित होते त्यांची याद.

| श्रीक्षेत्र वाराणासीहून. | श्रीशृंगेरी मठाहून. |
|---|---|
| १ " गुणाकरपंडित " | १ " गोपालाचार्य " |
| १ " पुरुषोत्तमरामपंडित " | १ " त्र्यंबक पंडित " |
| १ " नारायणदास पंडित " | १ " वेणीराम पंडित " |
| १ " गोविंदाचार्य पंडित " | १ " श्री निवास पंडित " |
| १ " गोपिनाथ पंडित " | १ " माधवाचार्य " |
| ५ | १० ५ |

या वरील पंडितांस "घावरिव भट्ट थावले" यांचा प्रश्न. तो असा कीं, शेणवी यांस षट्कर्माचा अधिकार आहे; आणि परभांस नाहीं याचा अर्थ काय? मग वरील पंडितांनीं दोहीं स्थळींहून दशविध ब्राह्मणाच्या वंश परंपरेविषयीं सह्याद्रिखंडांत मूल्कथा आहेत म्हणून त्या शृंगेरिमठाहून आणविल्या त्यांत सविस्तर ब्राह्मणाचें आचरण व दोष तपशील येणेंप्रमाणें.

यापकारें दशविध ब्राह्मणाचें कुल आहे. यामध्यें जेष्ठगौड कारण वेदशास्त्र संपन्न श्रीवाराणशी पूर्वदिशीं विद्याजन्म तत्रस्थलीं पुराण उत्पन्न याजकरिता वडीलपणा येथे. दुसरे द्राविड हे धाकटे जेष्ठांपासून विद्याभ्यास प्राप्त यामकारें म्हणून कनिष्ठ व. पंचगौडामध्यें विचार आणि द्राविडामध्यें आचार हे दोन्ही ही पुरातन चालत आले असतात् आणि

| "पंचगौडदेश" | "द्राविडदेश" |
|---|---|
| १ मुख्यगौड | १ मुख्यद्राविड |
| १ कान्यकुब्ज | १ महाराष्ट्र. |
| १ मैथील. | १ तैलंग. |
| १ सारस्वत. | १ कर्णाटकी. |
| १ कनोज. | १ गुर्जर. |
| ५ | १० ५ |

" श्रीपरशुरामावतार" क्षत्रियकुलीं सहस्रार्जुन महाबाहुजन्म होऊन व्यभिचार वर्तणूक सर्व क्षत्रिय करूं लागले तेव्हां परशुरामानें एकवीसवेळा निःक्षत्रिय पृथ्वीकरून सुमंत पंचक क्षेत्रीं रुधिराच्या नदीमध्यें तिलोदक मातेचे आजेस्तव यज्ञकेला उपरांतीक क्षत्रियकुल सव्हार आपणापासून घडला, व ब्रह्महत्यादि पातकेंही झालीं, म्हणोन बहुत पश्चात्ताप झाला आणि पृथ्वीचे राजे आपल्या घरास आले आणि आपणास राज्य काय करावें ? आपण ब्राह्मण,तपकरीत असावें भूमीं भार उतरून स्वस्थ असावें असा विचारकरून संपूर्ण पृथ्वी ब्राह्मणास दान दिली. आणि आपणास राहवयास जागा पाहिजे ; तेव्हां समुद्रापासून १४ कोस रुंदी व ७४ गाव लांबी असी जागा घेऊन तेथें ब्राह्मणाची स्थापना केली.

पुढें मसूरीचे नदीपासून आंकलेश्वर पंचमहाल कुडाल मसूरीचे नदीपर्यंत आपणास राहण्या करितां स्थान ठेविलें. मौजे इर्यल तर्फ पेडर्णे येथें राहिले आणि अश्वमेध यज्ञास प्रारंभ करून दोषाचा नाशाव्हावा एतदर्थ साहित्यकरून यज्ञास आरंभ केला. त्या यज्ञास मुख्य गौडब्राह्मण पाहिजेत तेव्हां गौड देशांतून सारस्वतब्राह्मणात्रिवर्ग " त्रिहोत्रीपुरनामक " क्षेत्र आहे तेथून दश गोत्री आश्वलायनशाखा ऋग्वेदी आणून स्थापन केले मसूरीचे नदीपासून आंकलेश्वरपर्यंत हा देश सारस्वत ब्राह्मणास दिला. आणि सारस्वतांमध्यें मुख्य "शिवशर्मा," "विष्णुशर्मा," "देवशर्मा," त्रिगोत्री वत्स, कौंडिण्य, कौशिक, हे तीन गोत्री मुख्य ब्राह्मण, यांचे संबंधी भारद्वाजादिक सप्तगोत्री येणे प्रमाणें दशगोत्री सारस्वत ब्राह्मण यांस स्थान देऊन केळोसी, कुशस्थली, तर्फ साष्टी नजीक गोमांतक हें स्थान त्रिवर्गास देऊन मसूरेपासून आंकिलेश्वरपर्यंत बारदेस यांस दिलें फिरून पृच्छापड-

ली, तो अशीकीं, शेणवी ह्मणण्याचें कारण काय? उत्तर ब्रा ह्मणाचीं कारकुनी रोजगार करून कालक्षेप केला यास शेणवीअथ वा, पन असें ह्मणावें ही पुरातन सह्याद्रीखंडीं कथा आहे.

यावर परभाची उत्पत्ती आहे. त्यावर बाबदेव भट्ट यास वाळींत घालून पंक्तिवेगळे केल्यानर सदरील भट्टजीस संकट मायहो उन समस्तविद्वज्जनास शरण गेले. नतर त्या सभेतील विद्वानानीं आज्ञा केली कीं, श्रीक्षेत्रकाशीस जाऊन "श्रीगौडाचार्यस्वामी सारस्वत" यास शरण गेले असता ते तुह्मास मुक्त करतील असें भट्टभावले यास सागून श्रीक्षेत्रीं रवाना केले इत्यादिविषय व यापुढें आणखी थोडासा मजकूर असून नतर प डिताच्या सह्या आहेत परतु, विस्तार भयास्तव नकलेंतील सर्व विषय न घेता साराशमात्र घेतला आहे तो उत्तमप्रकारें करून अवलोकन करा कारण "कल्याणेच्छूनें" जगन्मित्रपत्रांत सारस्वत उर्फ शेणवी लेकाची काहीं निंदा लिहीली होती आता या नकलेचें अवलोकन करून त्याणें जो मजकूर लिहिला तो केवळ द्वेषानेंच लिहीला किंवा नाहीं तें पाहा आणि या चित्तपावनादिकानीं करण्याच्या द्वेषाची गणना करा. आता दुसरें असें आहे कीं "निदान शूद्रात तरी पृथिवी क र्मे चालविलीं असती" ह्मणून जें लिहिलें ते खरें परतु, शूद्रा पासून प्रतिग्रह किंवा शूद्राचें घरीं ऋत्विजपणा न चालविला ह्मणून, ब्राह्मण आपल्या कर्मापासून मुकतो असें कोणत्याही शास्त्रात नाहीं आता चित्तपावनादिकाच्या मनास शूद्राचा प्र तिग्रह आणि शूद्राचा ऋत्विजपणा न चालविला असता ब्राह्मण

---

१ सह्याद्रीखंड, यात शेणवी ह्मणण्याचें कारण या पुस्त काच्या प्रथम प्रकरणांत प्रदर्शित केलें आहे. तें पाहावें

कर्मापासून भ्रष्ट होतात असे जर वाटत असेल तर या प्रतिग्रहा विषयीं किंचित शास्त्राधार लिहितों तो अवलोकन करा. आणि तो खरा असल्यास मान्यकरून द्वेषकरण्याची बुद्धी सोडा; आणि तो खोटा असल्यास हतोळ लावून खोडून टाका.——

कश्यपोत्रिर्वसिष्ठश्चभरद्वाजोथगौतमः ॥
विश्वामित्रोजमदग्निःसाध्वीचैवाप्यरुंधती १३३॥
एतान्दृष्ट्वावृपादर्भिःप्रोवाचेदंवचःस्तदा ॥
प्रतिग्रहोब्राह्मणानांसृष्टावृत्तिरनिंदिता ॥ १३४ ॥
तस्मात्प्रतिग्रहंमत्तोगृह्णीध्वंमुनिसत्तमाः ॥
॥ ऋषयऊचुः ॥ राजप्रतिग्रहोऽस्माकंमध्वास्वादोवि
षोपमः ॥१३५॥ अग्राह्यमाणंकस्मात्त्वंकुरुषेनःप्रलोभ
नं ॥योराज्ञःप्रतिगृह्णातिलुब्धस्योच्छास्त्रवर्तिनः १३६॥
सपर्यायेणयातीमान्नरकानेकविंशतिम् ॥
प्रतिग्रहस्तुक्रियतेशूद्रादप्यंतजन्मतः ॥
⊛ इत्थंमनुस्मृतावस्तिवर्ततेपिसमुच्चये ॥ १३७ ॥

अर्थ.—तो असा कीं, कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, वसिष्ठ, आणि अरुंधति, या ऋषींप्रत पाहून वृषादर्भि राजा ह्मणतो, हे ब्राह्मणहो ! ब्राह्मणास उदरपोषण करण्याविषयीं प्रतिग्रह हा उक्त आहे. तस्मात् तुह्मी मजपासून प्रतिग्रह घेऊन उदरपोषण करावें. याप्रमाणें त्या ऋषिश्रेष्ठांनी राजाचें भाषण श्रवणकरून ते सर्व ऋषी राजाप्रत ह्मणतात हे राजा! यद्यपि प्रतिग्रह हा अमृता प्रमाणें आहे तथापि राजप्रतिग्रह हा

आह्लास विद्याप्रमाणे आहे. आणि जो लोभानें राजापासून प्रतिग्रह घेतो तो पर्यायेंकरून एकवीस नरकांप्रत जातो. आणि शूद्रापासून अथवा अत्यजापासून प्रतिग्रहघेतला असतां ही त्याचप्रमाणे (वरीलफलाप्रमाणेच.) फलआहे. याप्रमाणें "मनुस्मृतींत," व "इतिहाससमुच्चय" ग्रथांत ही सांगितलें आहे. तें पाहावें.

प्रतिग्रहसमर्थोपिप्रसंगंतत्रवर्जयेत् ॥
प्रतिग्रहेणह्यस्याशुब्राह्मंतेजःप्रशाम्यति ॥१३८॥
राजान्नंतेजआदत्तेशूद्रान्नंब्रह्मवर्चसं ॥
आयुःसुवर्णकारान्नंयशश्चर्मावकर्तिनः ॥ १३९ ॥
कारुकान्नंप्रजांहंतिबलंनिर्णेजकस्यच ॥
गणान्नंगणिकान्नंचलोकेभ्यःपरिकृंतति ॥१४०॥
यावतःसंस्पृशेदंगैर्ब्राह्मणान्शूद्रयाजकः ॥
तावतांनभवेद्दातुःफलंदानस्यपौर्तिकं ॥ १४१ ॥
वेदविद्यापिविप्रोऽस्यलोभात्कृत्वाप्रतिग्रहं ॥
विनाशंव्रजतिक्षिप्रमामपात्रमिवांभसि ॥
० इत्थंमनुस्मृतावस्तिविस्पष्टंप्रविचार्यतां ॥ १४२ ॥

अर्थ.—आणि, प्रतिग्रह करण्याचा अधिकार यद्यपि आहे तथापि प्रतिग्रहाविषयीं प्रसंगाची योजनाकरून प्रतिग्रह करावा. कारण अयोग्य प्रतिग्रहाच्या योगानें वक्ष्यमाण प्रकारहोतो. तस्मात् प्रसग वर्ज्य करावा. ह्मणजे ब्राह्मतेज शांत होईल. पाहा! असे आहे कीं, राजाचेंअन्नग्रहणकेल्यानें ते जाचा नाश होतो. शूद्रान्नग्रहणानें ब्रह्मवर्चसाचा नाश होतो. सोनाराच्या अन्नग्रहणानें आयुष्या-

चा नाश होतो. आणि चर्मकाराच्या (चांभाराच्या) अन्न गृहणानें कीर्तिचा नाश होतो याप्रमाणें आहे. आणि गणान्न (पांच दाहा) असामी एकत्र ठिकाणीं मिळून अन्न करितात तें) आणि वेश्येकडील (कलावंतिणीकडील) अन्न जे गृहणकरितात त्याचें अन्यपुण्यकर्मार्जित जे स्वर्गादिकलोक-तें सर्व नाशाप्रत पावतात ह्मणजे या दोन अन्नाच्या योगानें स्वर्गलोकापासून ही भ्रष्ट होतात् असें आहे. आणि शूद्रयाजक (शूद्राचाउपाध्याय) तो जितक्या ब्राह्मणांस आपल्या अंगानें स्पर्शकरील त्या तितक्या ब्राह्मणास दान दिलें असतां दानदेणान्या पुरुषास त्या दानापासून फल प्राप्त होत नाहीं. पहा! यद्यपि मोठा वेदवेत्ता पुरुषअसून अशा पुरुषापासून (वरीलपुरुषापासून) दान घेतलें असतां ज्याप्रमाणें चांगलें सुरेख मातीचें भांडें केलें तथापि तें भाजल्यावाचून पाण्यांत टाकिलें असतां नाशाप्रत पावतें त्याप्रमाणें त्याची (वेदवेत्यापुरुषाची) व्यवस्था होती याप्रमाणें "मनुस्मृतींत" सांगितलें आहे त्याचा विचार करावा. यास दुसरीं प्रमाणे.

अमृतंब्राह्मणस्यान्नंक्षत्रियान्नंपयःस्मृतं ॥
वैश्यस्यत्वन्नमेवान्नंशूद्रान्नंरुधिरंस्मृतं ॥ १४३ ॥
आमंशूद्रस्यशूद्रान्नंपक्वमुच्छिष्टमुच्यते ॥
तस्मादामंचपक्वंचशूद्रस्यपरिवर्जयेत् ॥ १४४ ॥
योऽसत्प्रतिग्रहग्राहीनित्यंयश्चप्रतिग्रही ॥
ग्रहसूचकदूतौचपितृकार्येषुवर्जयेत् ॥
इत्थंपराशरमुनेर्वचनंप्रविचार्यतां ॥ १४५ ॥
आवाह्यकादेवलकानाक्षत्राग्रामयाजकाः ॥

एतेब्राह्मणचांडालामहापथिकपंचमः ॥

⊛ इत्यंहिभारतेराजधर्मेप्यस्तिविलोक्यतां ॥१२६॥

तिलधेनुर्गजोवाजीप्रेतान्नमजिनंमणिः ॥

सुरभिःसूयमानाचघोराःसप्तप्रतिग्रहाः ॥ १२७॥

⊛ इतिरामायणेप्युक्तंतथाग्रंथांतरेपुच ॥

⊛ तस्मादेतत्पदार्थांश्चप्रयत्नेनविवर्जयेत् ॥ १२८॥

अर्थ.–तें असें कीं, ब्राह्मणाकडील अन्न हें अमृताप्रमाणें जा णावें. क्षत्रियाकडील दुधाप्रमाणें, वैश्याकडील, जें अन्न त्यास अन्न होच समजणारी. आणि शूद्रान्न रक्ताप्रमाणें आहे याप्रमा णें चारीवर्णाकडील अन्नें वर्णपरत्वेंकरून कनिष्ठ आहेत. तर येथें कोणी शंका घेतील ती असी कीं, आम्हीं शूद्राकडील अन्न घेत नाहीं. आमान्न घेतों. असें असल्याकारणानें आमान्नास (सि ध्यास) दोष नाहीं असें म्हणतील, तर त्या आमान्नाविषयीं प्रमाण ऐका. तें असें कीं, शूद्राकडील जें आमान्न (सिधा) त्यास शूद्रा न्न असें म्हणावें आणि पक्वान्नास्नें जें अन्न असेल तें उच्छिष्ट (उष्टें) असें जाणावें तस्मात् शूद्राकडील यादोहीं प्रकारच्या अन्नाचा त्यागकरावा. कारण यादोहीं अन्नाच्या योगानें ब्राह्मणदोषी होतो. आणि वाईट प्रतिग्रहाचे (अयोग्याकडील) ग्रहण करणारा, व नित्यच प्रतिग्रहकरून राहणारा, ग्रहसूचक (पंचांगपाहून ग्रहसांग णारा,) आणि दूतकर्मकरणारा, याप्रमाणें हे चार असामी श्राद्धक र्मांत पिनरस्थानीं योग्य नाहींत. (वर्ज्य करावे ) याप्रमाणें "वृ हत्पाराशरस्मृतींत" सांगितलें आहे तें पाहावें. आणि आवाहक देवलक, नक्षत्र व ग्रहणसांगून उपजीविकाकरणारा आणि ग्रामोपाध्याय हेचारअसामी व पांचवा महापथिक हे ब्राह्मण असून चंडाल तुल्य आहेत

याप्रमाणें "*महाभारतांतर्गतराजधर्मामध्यें*" सांगितलें आहे ते पहावें. आणि तिल, धेनु, हत्ती, घोडा, प्रेतान्न, चर्म, मणी, (रत्न) आणि उभयतोमुखी (म्ह०) गाय हे सातप्रतिग्रह घोर आहेत (भयंकरअसून नरकदेणारे) आहेत. याप्रमाणें "रामायणांत" व अन्यग्रंथांतही या (म्ह०) धरप्रदर्शित केलेल्याच प्रकारचीं अनेक वचनें आहेत त-स्मात् या सर्व पदार्थांचा घोर असल्या कारणानें प्रतिग्रह ब्राह्मणांनीं यत्नेंकरून वर्ज करावा. असें आहे. आणि असा हा घोरप्रतिग्रह ब्राह्मणांनीं अग्राह्य (घेतला नाहीं) केला म्हणून या ब्राह्मणाच्या कर्मास, किंवा त्याच्या विप्रत्वास, कांहीएक बाधक नाहीं. तस्मात् "कल्याणेच्छुवृवा"! आपण या सर्व प्रमाणाचा शोध केल्यावाचून आमच्या वर्गस्थ लोकांविषयीं (सारस्वतउर्फकोंकणे म्ह० शाणवी ब्राह्मणांविषयीं जगन्मित्रपत्रांत कुचोद्यानुरूप जो कांहीं बाणसोडला, तो अस्मदीय वर्गस्थलोकास, (सारस्वतास) लागू न होता तुमच्याच वर्गस्थलोकास (सांप्रतच्या मानावरून देशस्थादिकास) लागू होत असून शूद्रप्रतिग्रहाच्या योगानें ते सर्व देशस्थादिक शास्त्रमर्यादेवरून आपापल्या ब्राह्मणत्वानुरूप षट्कर्माधिकारत्वापासून भ्रष्ट होतात किंवा नाहीं तें प्रथमतः अवलोकन करून नंतर शेणवी उर्फसारस्वत ब्राह्मणांच्या विप्रत्वाविषयीं किंवा कर्माविषयीं सिद्धांत करण्यास प्रवर्त व्हा! आतां ब्राह्मणानीं शूद्राचेघरीं वृत्तीचीं कर्मे चालविलीं नाहींत म्हणून तो ब्राह्मण आपल्या कर्मापासून भ्रष्ट होतो असें नाहीं. किंवा शूद्राचेघरीं वृत्ती चालविली म्हणून तो ब्राह्मण कर्मार्ह होतो असें ही नाहीं आतां कांहीं लोक नूतन द्विजत्वाच्या योगानें व सत्ताधीशही होऊन गेल्या कारणानें आपली सत्ता ब्राह्मणावर चालवून त्याब्राह्मणाप्रत वेद पढून तो वेदशूद्रास पढवू लागले आणि सारस्वत पढवीत नाहींत म्हणून सारस्वत उर्फ शेणवी हीनकर्मा आहेत म्हणून जी शंका घेणें

ती केवळ अयोग्य असून दुर्वाच्य आहे. कारण, शूद्राचेघरीं वृत्ती न चालविणारे व शूद्रप्रतिग्रहही न घेणारे ओणवी ऊर्फ सारस्वतांशिवाय अनेक ब्राह्मण आहेत ह्मणून ते! ब्राह्मण नव्हे किंवा कर्मांत न्यून असें ह्मणता येत नाहीं. पाहा आतां देशस्थादिकहे! गुर्जरादिक ब्राह्मणाच्या किंवा रामानुजाच्या घरीं ऋत्विजपणादिक चालवीत नाहींत ह्मणून देशस्थादिक ब्राह्मण नव्हे असें सिद्ध होतें! तस्मात् एका ब्राह्मणानें दुसऱ्या ब्राह्मणाचेघरीं जाऊन वृत्ती चालविली नाहीं किंवा दान घेतलें नाहीं ह्मणून तो निकर्मा असें कोणत्याही शास्त्रांत नसून जगांतही नाहीं. एवंच तात्पर्यार्थकाय? शूद्रापासून किंवा चित्पावनादिकापासून प्रतिग्रह घेतला नाहीं अथवा यांचेघरीं ऋत्विजपणा चालविला नाहीं ह्मणून कोण याही ब्राह्मणाच्या ब्राह्मण त्वास किंवा षट्कर्माधिकारत्वास काहीं एक बाधक नाहीं. आता बाधकच आहे असें जर चित्पावनादिकाचें मत असेल तर जशी आमच्यापक्षावर कल्याणेच्छादिक चित्पावनानीं दृष्टी ठेविली आहे त्याच प्रमाणें त्यांनीं आपल्या पक्षावर (सांप्रतच्या मानावरून देशस्थादिकांवर) दृष्टीद्यावी—त्यावाचून केवळ सारस्वतावर दृष्टीठेऊन द्वेष करण्याविषयीं जी बुद्धी धरणें ती केवळ अयोग्य असून अनिर्वाच्य आहे. कारण ज्यास सबळ प्रमाणें सांपडत नाहींत त्यानीं अशा ह्या दुर्वाच्य शंका किंवा नूतन रचलेली कादंबरी इत्यादि विषय घेऊन भांडावें आणि जो खरा पंडित असेल तो त्या कुतर्कानें भांडण्यास कधीं प्रवृत्त होणार नाहीं एवंच या सर्व युक्तिवरून अथवा शिष्टानुभवावरून पाहिलें असतां ह्या त्वीकेचा कर्ता केवळ जाती भेद विवेकसार कर्त्याचा ज्येष्ठ बंधू असें ह्मणण्यास काहींच संशय नाहीं. कारण त्यानेंही सारस्वताविषयीं धर्मारण्य ग्रंथाचा आधार देऊन १ श्लोक लिहिला आहे तो असा कीं;

"सूर्यवंशश्चक्षत्रश्चपिताभवतियोनरः ॥"
"मातायाब्राह्मणीनारीशेणवैज्ञातिरुच्यते ॥"

अर्थ.—जोनर सूर्यवंशी क्षत्रिय पिता होतो जी माता ब्राह्मणी नारी होते असें ह्मणून पुढें असें ह्मणतो की " शेणवै ज्ञातिरुच्यते" परंतु या श्लोकांत प्रथमता जो आणि जी असें जे संबंधी शब्द आले आहेत त्यांचे दर्शक शब्द कोणते? तसेच दुसऱ्याचरणांत कर्ता कोणता? याविषयीं कांहीं तरी विचार करावयाचा होता? परंतु; तसेंतो कोठून करील. सरासरीनें क्षत्रिय ब्राह्मणी आणि शेणवै हे तीन शब्द एकत्र करण्याचा प्रयत्न केलाआहे शिवाय संस्कृताचें ज्ञान मुळींच नाही असें त्या श्लोकावरूनच सिद्ध होतें. आणि याची खात्री करून घेण्याची असेल तर याच पत्रीं दुसरा एक श्लोक आहे तो असाकीं "कैवर्तकस्य भिल्लस्य पिता भवतीयोनरः मातायागोलकीनारी पालाशज्ञातिरुच्यते" एवंच तात्पर्यार्थ पाहूं गेला असतां हे श्लोक नूतनअसून खोटे आहेत असें सर्व विद्वज्जनांच्या मनास आलें असेलच असेल. परंतु; असे हे शीघ्रकवी आपलें कवित्व महा "व्यासप्रणीत स्कंदपुराणांत" ढकलून देण्यास पाहत होते परंतु; बुद्धिचातुर्य फार झाल्याकारणानें फसले. आणि ह्या सृष्टींत हा एक विषय फार चांगला आहे तो असाकीं मोठा धूर्त आणि लबाड, लोक जो कांहीं महान व्यूह रचूं पाहतो परंतु; काकतालन्याय होऊन त्यांमध्यें त्याचे खरें स्वरूप दृष्टीस पडण्यास कांहींना कांहींतरी छिद्र राहतेंच राहते. एवंच तात्पर्यार्थ काय? "मीजातोंचांगला शेंबूट माझ्या नाकाला" याह्मणींप्रमाणें त्या श्लोककर्त्यांनें स्वरूप ज्ञान दिसतें.

वाचकहो! ह्या विवेकसारकर्त्यानें सारस्वतांविषयीं केवळ श्लोक

मात्र लिहिला आहे असें नाहीं तर त्याणें दुसरी एक मसालेदार गप्प ठोकली आहे ती पाहा, जा० वि० वें० पु० पृष्ट० ४४ त्यांत तो असें ह्मणतो कीं, "सुमारें ३०० वर्षांवर कर्नाटक प्रांतांत रामराजा राज्य करीत असतां एका शेणव्यानें संन्यास घेतला. हें त्या प्रांतांतील सन्याशानीं पाहून आपली सभा केली, तेसमयीं तेथें सुमारें २०० संन्यासी जमले होते. त्या सभेकार्ने शेणव्यास संन्यास धारणकरण्यास कांहींशास्त्राधार आहे कीं नाहीं याविषयीं वचनें काढून त्या रामराजासमोर तो निवाडा आणून शेणव्यास संन्यास घेण्यास अधिकार नसतां त्याणें तो घेतला ह्मणून १०००० होन त्या सन्यास धारण करणाऱ्या शेणव्या पांसून दंड घेऊन त्याच्या कडून सन्यास सोडविला इ० या गोष्टीचा खरेपणा दाखविण्या करितां हा संन्याशानीं काढलेला शास्त्राधाराचा कागद कोल्हापुरांत शंकराचार्यांच्या मठांत आहे. असें ह्मणतो तर याच्या ह्या लिहिण्या वरूनच हा खोटा असें सिद्ध होतें कारण असें आहे कीं. "भद्रंभद्रमितिब्रूया न्नद्रमित्येववावदेत्" कोणत्याही विषयावर लिहिणें किंवा बोलणें झाल्यास भद्र किंवा निश्चय असेल तेंच बोला. हें असें शास्त्र आहे. तर या विवेकसार कर्त्याचें लिहिणें तर केवळ सहायार्थीच भासतें त्यांत शुक्तिरजत न्यायाप्रमाणें तें ही कबूल केलें असतें परंतु; हातर त्यासभेंत २०० सन्यासी जमले होते असें ह्मणतो तर ह्या विवेक सार कर्त्यास कर्नाटक प्रांत कोणत्यादिशेस आहे? याचें ज्ञान मुळींच नाहीं असें ह्मणण्यास कांहींच बाधक दिसत नाहीं कारण सर्व कर्नाटक प्रांतांत सत्यबोध, व्यासराय, फलमार, आदमार, भिमनकट्टे, उत्तरादी, आर्कोंद, भंडारकेरी, सुब्रह्मण्यों, कण्णापूर, पुत्ते, सोंदूर, सोंदे, काणूर, पेजावर भुवनेंद्र, पूर्णप्रज्ञ. काणे, शृंगेरी, मिळून हे १९ मठ असून

गुरू शिष्यां समेत ३८ संन्यासी आहेत याशिवाय कर्नाटकांत दुसरे मीक्षाश्रमी देखील संन्यासी नाहींत तर १६२ संन्याशी विवेक सार कर्त्यानें कोठून पाठविले असतील ते असोत. तथापि तेही कबूल केलें परंतु; रामराजा समोर आणून १०००० होन दंडकरून त्याकरवीं संन्यास सोडविला असें ह्मणतो तर ह्याच्या हा खोटेपणा सर्व माझ्या प्रिय वाचकांस श्रुत होण्याकरितां खुद रामराज्याच्या गादीवर बसणारा रामराजाचा प्रपौत्र जो "बालमार्तांड त्याणें अस्मदीय वर्गस्थलोक ( सारस्वत कोंकणे ऊर्फ शाणवी ब्राह्मण ) यांचे जे " श्रीमत्सुमतींद्रतीर्थ " व " श्रीमद्भुवनेंद्रतीर्थ " श्री स्वामी यांस स्वभावें करून लिहिलेलें विनंतीपत्र पाहा.

---

१३७ नंबरेवनीं

श्रीपद्मनाभोविजयतेतमां

**स्वस्ति श्रीमन्निखिलविद्याप्सरस्सदचरीकाम्नायांत विद्यासुधादुग्धसिंधुभ्यो निरंतरब्रह्मानंदानुभवाविष्कृताशेषत्रिपयरसनिस्सारभूयेभ्योपुत्तसिद्धानुक्रोशागरिमकारितसुजनाभ्युपपत्तिकौतूहलेभ्यो निगमकल्पानोकहनिवहकुसुमरसनिर्झरविभ्रमभृद्वचः संदर्भसंहर्षितसमस्तसंख्यावत्समाजेभ्यो नैसर्गिक भक्तिभूमसंमार्जितनारायणकरुणासुलास्वादसुहितेभ्यः श्रीमद्विबुधेंद्रतीर्थश्रीपादछात्रवरश्रीमत्सुमतींद्रतीर्थश्रीपादेभ्यः—**

प्रणामांजलि पुर स्सरंवंचि महीभृदभिजन जन्मना श्री पद्मनाभ दास वंचि बालमार्तांड वर्म कुल शेखरेण प्रणीयमानेयं विज्ञापना. भवनारायण स्मरणभेषज निरस्त निश्शेष विपदामयो योष्माकीणानुकं

पादोद्द संबोधित कुमार सस्य भंजगीकिरतोपि भयात्मा नुग्रह लाभ मभिलाषुकश्चाय जन सुराभिद्धास्ने पदनभवन:अस्म कुरनिंतरा नत समस्त कल्याण प्रदान जागरूकस्य पिण्ड नदाख्य नगर मधिवसत: श्रीमद्वेंकटाचलनाथे भगवतो नारायणस्य स्थिरप्रतिष्ठादिकार्य मुद्दिश्य तिथ्याद्युपुरस्सर सादिक्षन् तत्र भगवता स्थिरप्रतिष्ठादि कारण समुचित स्थलनिर्णयार्थं तदनुगुण साहाय्य करणार्थंच अस्मदीया माघे पिप्पलनदी नगरस्थे पनिका मुखेना द्या प्रेषित चैव इत: परमपि श्रिय:पते भगवत: समाराधनादि कार्येषु कृता दराएव वर्तामहे श्लोक: श्रीवेंकटाद्रिनाथस्य करुणा कल्पवल्लरी ॥ भूयादाकल्पमस्माकं सर्वाभीष्टफलप्रदा ॥ दुर्गहायन आश्विन बहुल सप्तम्यां लिखित मिद ॥




१९५ नंबरेवनी

श्रीपद्मनाभो विजयते ॥

स्वस्ति श्रीमदखिलविद्याप्सरस्सहचरीकाम्नायांतविद्यासुधादुग्धांबुधिभ्यो निरंतरब्रह्मानंदानुभवाविष्कृतालोपनिषदरसनिस्सारभूयेभ्योपुनासिद्धानुक्षोदागरिमकारितसुजनाभ्युपपत्तिकौतूहलेभ्यो निगमकल्पानोकहनिवहकुसुमरसानिर्झरविभ्रमभृद्वच: सन्दर्भसंतर्पितसमस्तसंख्यावत्समाजेभ्यो नैसर्गिकभक्तिभूमसंमार्जितनारायणकरुणामृतास्वादसुहितेभ्य: श्रीमत्सुमतींद्रतीर्थश्रीपादछात्रवरश्रीमद्भुवनेंद्रतीर्थश्रीपादेभ्य:

प्रणामांजलि पुरस्सरं वंचि महाभिृदभिजन जन्मना श्री पद्मनाभदास वाल्मार्तांड वर्म कुल शेखरेण प्रणीयमानेयं विज्ञापना. भवनारायण स्मरणभेषज निरस्त निश्शेष विपदामयो यौष्माकीणानुकंपा दोहद संवर्धित कुशल सस्य मंजरीकइतोपि भवादृशा नुग्रहलाभ मभिलाषुकश्चायं जनः सुखमिहास्ते यदत्रभवद्भिः अस्मत्कुल निरंतरा नंत समस्त कल्याण -प्रदान जागरूकस्य श्रीमद्वेंकटाचलपते र्भगवतो नारायणस्य देवतायतन निर्मितेः समाप्तप्रायत्वादिदानीं निश्चित एवसमये प्रतिष्ठादिकार्य मुद्दिश्य प्रेषितांपत्रिकामवलोक्य महान्संतोषोजातः ॥ तत्र भवद्भिः प्रेषिताआचार्य प्रभृतयश्चात्रागताएव एतत् क्षेत्रासुपयुक्त प्रदेशस्य अनंतनारायण पुरमितिनामधेयंनिश्चित्य श्रीव्यास रघुपति प्रीत्यर्थं ऊर्णावाससारमनेकं निष्कभूषणमपि दत्वातेपिपुष्मत्सामीपे संप्रेषिताएव; श्रीवेंकटाचलपति स्वामिकार्याणिनि ष्प्रत्यूहं निर्वोढुं तत्रभवतां प्रत्येकं धुरीणत्वात् अस्मिन्निश्चित लग्नएव भगवतः प्रतिष्ठांकृत्वा अस्मन्मनोरथपूर्तिं करिष्यथेत्याशास्महे किंच देवतायतन देवपूजक वैदिकादिजननिवासोचितस्य निश्चितपूर्वस्य स्थलस्य यथोचितं दानपत्रांस्थिरीकृत्य प्रेषयितु आमात्यप्रत्याज्ञाप्रदानात् तत्पत्रमविलंबेन तत्रागमिष्यतिच- सर्वदा युष्मदनुग्रह मभ्यर्थयामः परितापिह्वामन ज्येष्टशुद्धाष्टम्यां लिखितमिदं. श्लोकः। श्री वेंकटाद्रिनाथस्यकरुणाकल्पवल्लरी ॥ भूयादाकल्पमस्माकं सर्वाभीष्टफलप्रदा ॥

श्री पद्मनाभोविजयतेतमां ॥ श्री.

१९५ नंबर रेवर्नी

## सदरील नकलेचें भाषांतर.

श्री पद्मनाभो विजयते.

या खाली त्यांचामाना.

**श्री मत्सुमतींद्रतीर्थ श्री पादस्वामींपांचे शिष्यश्रेष्ठजे श्रीमद्नु-वर्नेंद्रतीर्थ श्रीपादयांप्रत . . . . . . . . . . . . . . . . .**

राजकुलोत्पन्न श्रीपद्मनाभ याचादास जो वालमार्तांड याची प्रणाम पूर्वक विज्ञापना. आपल्या नारायण स्मरण रूप औषधानें दूर झाला आहे समस्तनिपत्तिरोग ज्याचा असा व तुमचा कृपानुरूप जो कांही दोहद ( झाडाला फुलें फळें येण्याविषयीं जो मसाला घालितात तो ) तेणेंकरून, वृद्धीमत पावलेलें जें कल्याणरूप धान्य त्याची मजरीरूप असा आणि यापुढें ही आपल्या सारख्यां पासून अनुग्रह मिळण्याची इच्छा करणारा असाजो हाजन ( आह्मीं ) येथें सुख रूप आहे विशेष. जें तुह्मीं आमच्या कुलाचें कल्याण करण्याविषयीं निरंतर जागरूक असणारा जो श्रीमद्वेंक टाचलपति भगवानारायण जो त्याचें देवालय बांधण्याचें काम समाप्त होऊन प्रतिष्ठेच्या उद्देशानें प्रेषित जें आज्ञापत्र तें अवलोकनकरून परमानंद झाला आणि तुह्मीं पाठविलेले आचार्य ही येथें आलेच आहेत. आणि त्याक्षेत्रास "अनंत नारायणपूर" हें नाम निश्चय करून "श्री व्यासरघुपते" प्रीत्यर्थ व आपणासह महावस्त्रांसमेत एक पदक व कंठी देऊन त्या आचार्यांस आपणाकडे पाठवून दिले आहेत श्रीवेंकटाचलपतीचीं कार्यें निर्विघ्नपणानें तडीस न्हेण्या-विषयीं तुमच्यामध्यें प्रत्येकाकडे मुख्यत्व आहेच. याकारितां निश्चय केलेल्याच मुहूर्तीं भगवंताची प्रतिष्ठाकरून आमचे मनोरथ पूर्ण

कराल अशी आशा आहे आणि देवालय देवपूजक तसेच वैदिकादि जन यांच्या निवासाविषयीं पूर्वी निश्चय केलेल्या स्थलाचें यथायोग्य दान पत्र लिहून पाठविण्याविषयीं आमात्यास आज्ञा केली आहे तें लवकरच आपणाकडे येईल. जेष्ठ शुद्ध ८ मीच्या दिवशी लिहिले.

श्री पद्मनाभो विजयतेतमां.




या पत्रांची अस्सलबरहुकूमनक्कल शिवयासुद्धां लक्ष्मण नारायण केणी शास्त्री यांजकडे कर्नाटकाहून आली आहे ती पाहण्याची इच्छा असेल तर लवारचाळींत ६९ नंबराचे घरी सदरील शास्त्री यांस भेटावे ह्मणजे ती दाखविली जाईल.

आतां हींविनंती पत्रें दाखविण्याचें कारण हेंचकी " विवेकसार कर्त्यानें" शाण्णवी ब्राह्मणाच्या संन्याशांस रामराजानें १०००० होन दंडकरून सन्यास सोडविला, ह्मणून जे लिहिलें ते खरोखर आहे किंवा खोटें आहे, तें याप्रदर्शित केलेल्या नक्कले वरून पाहा. आतां त्याणें तें खन्या स्वभावेंकरून लिहिलें असी कोणी शंका घेतील तर ती शंका घेणारांस माझी काहीं सूचना आहे. असें पाहा ! जर या विवेकसार कर्त्याचें लिहिणें खरे असतें तर त्याच रामराजानें त्या सारस्वत कोंकणे उर्फ शेणवी ब्राह्मणांच्या सन्याशांस श्रीपाद हे नाम देऊन महावस्त्रादिक समर्पण करून प्रणामांजलिपुट केले असतें काय ? आतां शाण्णवी उर्फ कोंकणे हे ब्राह्मण नव्हे असे जर त्या रामराजाच्या मनांत असतें तर त्या रामराजानें वैदीक या शब्दाचा उच्चार करून दानपत्रें करून दिलीं असतींकाय ? कधींच दिली नसतीं हें जातीभेद विवेकसार कर्त्यानें भद्रतें करून लक्षांत ठेवावे. कारण,

तावद्गर्जतिशास्त्राणिजंबूकाविपिनेयथा ॥
नगर्जतिमहाशाकिर्यावद्वेदातकेसरी ॥

अर्थ—असें आहेकीं जाव काल्पर्यंत सिंह गर्जना कोल्ह्यानीं ऐकिली नाहीं ताव कालपर्यंत जबूक गर्जना करतील तेंच खरें, ह्याप्रमाणें विवेक सार कर्याचें व चित्तपावनादिकार्वेही स्वरूपज्ञान दिसतें कारण जर तो विवेकसार पुस्तककर्ता खऱ्या स्वभावानें सर्वांची निंदा लिहिता, तर ता आपलें नाव काच्छपवून ठेविता ? त्यावरूनच त्याचें स्वरूप पाहा अस्तु आता या चित्तपावनानीं केवळ कादवरी मात्र रचिली असे नाहीं तर आपला दोष च्छपवून श्रेष्ठपणा दाखविण्याकरिता महान् ग्रयात सकपोल कल्पित वाक्येंकरून टकलली आहेत् तीं पाहा.

कौकणाश्चित्तपूर्णास्तेचित्तपावनसञ्ज्ञकाः ॥
ब्राह्मणेषुचसर्वेषुयतस्तेउत्तमामताः ॥
एतेषावशजाःसर्वेविज्ञेयाब्राह्मणाःखलु ॥
माध्यदिनाश्चदेशस्थागौडद्राविडगुर्जराः ॥
कर्नाटातैलगायापिचित्तपूर्णस्यवंशजाः ॥
अतश्चित्तस्यपूर्णयोनिंद्यातस्यक्षयोभवेत् ॥

अर्थ—कोंकणस्थास चित्तपावन हें नाम प्राप्त झालें आणि हेच सर्व ब्राह्मणात श्रेष्ठ असून सर्व ब्राह्मण जे आहेत ते निश्चयें करून यांचे वशज जाणावे ते कोणकोण ? असें ह्मणाल तर सागतों माध्यदिन, देशस्थ, गौड, द्राविड, गुर्जर, कर्नाटक, तैलग, हे अद्यापर्यंत चित्तपावनाचे वंशज आहेत् ह्मणून चित्तपावन सर्वांत श्रेष्ठ असल्याकारणानें चित्तपावनाची निंदा करील त्याचा कुल्क्षय होईल यापकारेंकरून "वृद्धपाराशर स्मृतीत" काहीं सकपोल कल्पित वाक्यें करून टकलून दिलीं आहेत आणि याचप्रमाणे

अनेक ग्रंथांत टकलून दिलीं असतील व गाळलीं ही असतील असें ह्मणण्यास कांहींच बाधक नाहीं- कारण स्मृतींतच ज्यापेक्षां स्वकपोल वाक्यें तर अन्यपुराणांत लिहीलीं नसतील हें कशावरून सांगावें ! वाचकहो ! या शाप्यानें हे नूतन श्लोक त्यास्मृतींत टकलूनदेतेवेळीं चित्तपावनाच्या पूर्वी ब्राह्मण होते किंवा नव्हते याचा कांहीं तरी विचार करावयाचा होता ! पण ते कोठून करतील. कारण,

मर्कटस्यमदिरापानंतन्मध्येवृश्चिकदंशन

यावचनाप्रमाणें ह्मणण्यास कांहीं संशय नाहीं. कारण आदींच वानर त्यांत मद्यप्राशन. त्या मद्यप्राशनांत जर विंचू चावला मग त्याचे पराक्रम काय विचारावयाचे ? त्याप्रमाणेंच यावरील श्लोकांचा भावार्थ दिसतो. वाचकहो ! आतां हे श्लोक पराशरानें लिहिले आहेत असें जर ह्मणावें तर, पराशरऋषी हे केवळ अज्ञानी होते असें सिध्द होऊन व्यास वाक्यांस व्यभिचारत्व प्राप्तहोतें कारण ब्राह्मणा-दशधाःप्रोक्तापंचगौडाश्चद्राविडाः याबाक्यांत केवळ गौड आणि द्राविड मिळून हे दशविध ब्राह्मणच अनादि सिध्द दिसतात्- असें असून आमंत्रणास न आल्यामुळें परशुरामानें कैवर्तकांस ( ह्म० ) कोळ्यांस ब्राह्मण्य देऊन स्मशान भूमींत पवित्र केले ह्मणून चित्तपावन असें ह्मणतात् याप्रमाणें सह्याद्रिखंडात स्पष्ट सांगितलें आहे तर त्या पराशरानें यासह्याद्रि खंडाचा विचार केल्यावांचूनच तेश्लोक या आपल्या स्मृतींत लिहिलेत काय ?

असो एवंच तात्पर्यार्थ काय ? या दुष्ट लोकानीं सारस्वत कोंकणे ऊर्फ शाणवी ब्राह्मणाची निंदा करण्या विषयीं जितके स्वकपोल कल्पित ग्रंथ दाखविले होते ते सर्व यथानुक्रमें करून सशास्त्रोक्त प्रमाणांच्या आधारा वरून निराकरण केले आहेत. आतां ते (माधवादिक) स्वकपोलकल्पित खरो खर आहेत किंवा नाहीं हें सर्व

विद्वज्जन वाचकाच्या ध्यानात येण्या करिता ते सर्व स्वकपोल कल्पित श्लोक याप्रकरणात प्रदर्शितकरून त्यास निराकरणार्ह ( योग्य ) प्रमाणेंही प्रदर्शित केलीं आहेत. तर तीं सर्व विद्वज्जन वाचकानीं एकवार अवलोकन करून यात जो काहीं सत्यासत्यतेचा विचार करणें असे ल तो सर्व वाचकानीं आपापल्या शुधात. करणानुरूप निस्पृहतेनें करून पाहिल्यावर हे चित्तपावनादिक सारस्वत ऊर्फ शाणवी ब्रा ह्मणाविषयीं केवळ द्वेषानेंच लढतात् किंवा नाहीं तें प्रयक्ष वें करून दिसण्यात येईल आता सारस्वत कोंकणे उर्फ शाणवी ब्राह्म णाची निंदा चित्तपावनादिकानीं केली ह्मणून सारस्वत निंद्य आहेत असें नाहीं कारण

नदूष्यतेमहात्मानोदुर्जनानाकटूक्तिभिः ॥
काकमुखाशुचिक्षेपैर्हीरःकिंमलिनोभवेत् ॥

अर्थ—असें आहे कीं कावळ्यानें आपल्या अपवित्र मुखें करून वारवार हिऱ्याला स्पर्श केला ह्मणून त्यास्पर्शाच्या योगानें हिरा अप वित्र होतो काय ? असें तो हीरा अपवित्र होत नाहीं तसें याचि त्तपावनानीं सारस्वताची हरएक प्रकारें करून निंदा केली ह्मणू न त्यानिंदेच्यायोगानें सारस्वत निंद्य झाले असें नाहीं कारण

निःसारस्यपदार्थस्यप्रायेणाडंबरोमहान् ॥
नसुवर्णेध्वनिस्तादृग्यादृक्कांस्येभिजायते ॥
❀ इत्थंसिद्धमभूयत्त्ववागाडंबरमातनोः ॥

अर्थ—असें आहे कीं ज्या पदार्थांत सार नाहीं तो पदार्थ बहुत करून मोठी ध्वनी करीत असतो पाहा ! स्वर्ण ही धातू सर्व धातूत श्रेष्ठ असून वाजविली असता ध्वनी देत नाहीं आता काश हें सर्व

धातूंत हलकें ( नीच ) असून वाजविण्या बरोबर त्याप्रमाणें मोठी-ध्वनी करितें कीं त्याप्रमाणे या चित्तपावनादिकांचें स्वरूप ज्ञान दिसतें-यांचें कारण उत्तरार्धांत पाहा-

इतिकेण्योपाव्हनारायणसूनुलक्ष्मणविरचिते श्री मद्द्शप्रकरणेमाधवोक्तिखंडनंनामषष्ठप्रकरणंसमाप्तं श्रीरामचंद्रायनमः ॥



अथोत्तरार्ध प्रारंभः ॥

# प्रकरण सातवें.



❁ इंद्रार्यरिसोरिमनंगतातंरामाप्रियंमाधवमच्युतंच ॥
❁ विभुंसुरेशंभवपाशमोचकंकुर्वेनतिंतंनरकाभियार्ति
❁ अथचित्पावनोत्पत्तिवर्णनाख्यंतुसप्तमं ॥
❁ कथ्यतेहिप्रकरणंसर्वग्रंथान्विचार्यच ॥ २ ॥

अर्थ.--इंद्राचे शत्रु जे दैत्य त्यांचा शत्रू मदनाचा पिता बलरामाचा कनिष्ठबंधू लक्ष्मीचा पति कधींहीच्युत (पतित) नहोणारा सर्व देवांचा ही स्वामी आणि भवसमुद्रा पासून सोडविणारा नरकासुराचा शत्रू असा प्रभुजो भगवान् कृष्ण त्यामत नमस्कार करून सर्व ग्रंथावलोकनानें चित्तपावनो त्पत्तिचें वर्णन नामक हें सातवें प्रकरण सांगतो. २

ब्राह्मणानांततोपृथ्वीदानंदत्वायथाविधि ॥
नवीनंनिर्मितंक्षेत्रंशूर्पाकारकमुत्तमं ॥ ३ ॥
वैतरण्यादक्षिणेतुसुब्रह्मण्याश्चउत्तरे ॥
सह्यात्सागरपर्यंतंशूर्पाकारंव्यवस्थितं ॥ ४ ॥
शतयोजनदीर्घंतुविस्तृतंत्रीणियोजनं ॥
भार्गवंमिलितापृथ्वीसमुद्रात्सुखहेतुना ॥ ५ ॥
क्षेत्रंजवाधिकंचासीत्सर्वतीर्थान्वितंतदा ॥
विमलंनिर्मलंचैवखादिरंतीर्थमुत्तमं ॥ ६ ॥

हरिहरेश्वरंनीर्थमुक्तेश्वरस्तथैवच ॥
वालुकेशोमहाश्रेष्ठोवाणगंगासरस्वती ॥ ८ ॥
तस्यास्तुदक्षिणेभागेकुशस्थलिरुदाहृता ॥
मठग्रामस्तथाचान्येगोमाद्रिश्चाप्युदाहृतः ॥ ७ ॥
तत्रैवस्थापितंतीर्थंगोरक्षंचकुमारिजं ॥
रामकुंडंकुडमलंचप्राचीसिद्धगुणोपमं ॥ ९ ॥
एवंक्षेत्रंमहादेविभार्गवेणविनिर्मितं ॥
तन्मध्येतुकृतोवासःपर्वतेचतुरंगके ॥ १० ॥
श्रारंयार्थंचैवयज्ञार्थमंत्रिताःसर्वब्राह्मणाः ॥
नागताऋषयःसर्वेक्रुद्धोभूद्भार्गवोमुनिः ॥ ११ ॥

अर्थ–परशुरामानें सर्व क्षत्रिय मारिल्यावर हस्तगत झालेली पृथ्वी ब्राह्मणास दान देऊन दान दिलेल्या पृथ्वीवर आपण कसें राहवें? असें मनात आणून वैतरणी नदीच्या दक्षिण भागीं आणि सुब्रह्मण्याच्या उत्तरेस शूर्पाकार (सुपासारखें) सुंदर क्षेत्र उत्पन्न केलें तें असें की, सह्याद्रीपासून समुद्रापर्यंत १४ कोस रुंद आणि चारशें कोस लांब शूर्पारक याप्रमाणे भार्गवास (परशुरामास) समुद्रापासून भूमीमिळाली. तीभूमी काशीक्षेत्रापेक्षा अधिक पवित्र झाली, कारण त्याभूमीवर परशुरामानें सर्व तीर्थे आणून स्थापिलीं. तीं असीं कीं विमल, निर्मल, खदिर, हरिहरेश्वर, मुक्तेश्वर, वालुकेश्वर, वाणगंगा, सरस्वती, तीच्या दक्षिणभागी कुशस्थली (कुढाळ) मठग्राम (माडगांव) गोमांचल, (गोमातक,) त्यागोमातकीं गोरक्ष नामक तीर्थाची स्थापना केली तसेंच रामकुंड, कुड्मल, शंकर पार्वतीप्रत ह्मणती हेपार्वती! याप्रकारेंकरून सर्व देव व तीर्थे यांणीं

युक्त असें परशुरामानें क्षेत्र निर्माण केलें. आणि त्या क्षेत्रात पर्वताच्या ठिकाणीं परशुरामानें वासकेल्या. नतर श्राद्धार्थ, व यज्ञार्थ सर्व ब्राणणास आमंत्रण केलें, परंतु ते ब्राणण आले नाहींत. नंतर तो परशुराम कोपायमान होऊन स्नानास गेला.

सूर्योदयेतुस्नानार्थंगतःसागरदर्शने ॥
चितास्थानेतुसहसाह्यागतांश्चददर्शसः ॥ १२ ॥
काजातिःकश्चधर्मश्चकस्थानेचैववासनं ॥
कथपध्वंचसंस्थाप्येकारणंतस्यविद्यते ॥ १३ ॥
॥ कैवर्तकाऊचुः ॥ ज्ञातिंपृच्छसिहेरामज्ञातिःकैवर्तकीतिच ॥ सिंधुतीरेस्तोवासोव्याधधर्मेविशारदाः १४
तेपांपष्टिकुलंश्रुत्वापवित्रमकरोत्तदा ॥
ब्राह्मण्यंचततोदत्त्वासर्वविद्यासुलक्षणं ॥ १५ ॥
चितास्थानेपवित्रत्वाच्चित्पावनउदाहृतः ॥

अर्थ—परशुरामजीतो सूर्योदयीं, सागराप्रत स्नानार्थ गेला असता त्याणें तेथे चितास्थानीं (स्मशानभूमीप्रत) अकस्मात् कांहीं पुरुष आलेले अवलोकून त्यास तो विचारिता झाला. तुमची जात काय, धर्म कोणता, व तुह्मीं कोणत्या ठिकाणीं राहता व येथें येण्याचें कारण काय ते सर्व सविस्तारें करून सांगा. याप्रमाणें "परशुरामाचें" भाषण श्रवणकरून ते सर्व कैवर्तक बोलते झाले. ते असेंकीं, हे परशुरामा ! तू आमची ज्ञाति विचारितोस तर आमची ज्ञाति कैवर्तक (कोळी) समुद्रतीरीं आह्मीं राहतों आणि आमचा व्याधधर्म ( जाळें घालून मासेवगैरे मारण्याचा ) आहे. याप्रकारेंकरून कुलांसमेत सर्व वृतांत त्या कैवर्तकांनीं ( कोळ्यानीं ) सांगितला, आणि त्या

कैवर्तकानीं सांगितलेला तो सर्ववृत्तांत "परशुरामानें" श्रवण करून त्यांचें कुरु पवित्रकेलें. आणि त्या कैवर्तकास सर्व विद्यायुक्त ब्राह्मण्यदेऊन चितास्थानीं ( स्मशानभूमींत ) पवित्र केले ह्मणून, त्या कैवर्तकांस, चित्तपावन हें नाव दिलें.

चतुर्दशगोत्रकुलंस्थापितंचातुरंगके ॥ १६ ॥
सर्वेचगौरवर्णास्तेसुनेत्राश्चसुदर्शनाः ॥
सर्वविद्यानुकूलाश्चभार्गवस्यप्रसादतः ॥ १७ ॥
धनधान्यसमृध्याश्चयूयंभवतसर्वदा ॥
यदाकदावायुष्माकंविपत्तिर्जायतेभुवि ॥ १८ ॥
तदाहूयतिमांसर्वेसमवेताःसुखाप्तये ॥
आगत्याहंतदाविप्रावःकार्यंसाधयेक्षणात् ॥ १९ ॥
इतिदत्वावरंतेभ्योजामदग्न्यःकृपानिधिः ॥
गोकर्णप्रययोरामोमहाबलदिदृक्षया ॥ २० ॥
महाबलेशंसंपूज्यविधिवद्भृगुनंदनः ॥
किंचित्कालंसचोवासगोकर्णेश्वरसंनिधौ ॥ २१ ॥
गतेतुभार्गवेरामेतत्क्षेत्रस्थाद्विजातयः ॥
धनधान्यसमृध्यार्थाःसमवेताःकदाचन ॥ २२ ॥

अर्थ—आणि त्या कैवर्तकांस, काश्यप, शांडिल्य, वासिष्ठ, विष्णुवर्धन, कौंडिण्य, नित्युंदन, भारद्वाज, गार्ग्य, कपि, जामदग्न्य, वत्स, बाभ्रव्य, कौशिक, अत्रि, इत्यादिकहीं चौदा गोत्रें व

१ चित्तपावन. सांप्रतकालपर्यंत हेंच नांव प्रख्यात आहे. परंतु ते ("कैवर्तक") यानामाचा परित्याग करण्याकरिता कोंकणस्थ आहों, असें ही ह्मणवून घेतात. २ हीं गोत्रें चित्तपावनादिकांच्या गोत्र प्रवरमंजरींतून घेतलीं आहेत.

२३

उपनामेंही देऊन चातुरंग पर्वतावर त्यांची स्थापना केली. आणि त्यास सांगितलें कीं, माझ्याप्रसादेंकरून (भार्गवाच्या) तुम्ही (कैवर्तक जे चित्तपावन) सर्व गौरवर्णेंकरून युक्त व चक्रासारखे (घारे) चांगले डोळे, चांगल्यारूपानें युक्त तसेच सर्व विद्या, धन धान्य इत्यादिक गुणेंकरून समृद्ध असे व्हाल. आणि यदा कदाचित् जर तुह्मास विपत्ति प्राप्त होईल, तर तुह्मी सर्व एकत्र होऊन, माझें चिंतन करा, ह्मण-जे तत्क्षणीं येऊन तुह्मावर आलेली विपत्ती दूर करून, तुमचें सर्व कार्य साधून देईन. याप्रकारें करून त्या परशुरामानें "नूतनकेलेल्याब्राह्मणास" वर देऊन नंतर तो "परशुराम" "महाबळेश्वराच्या दर्शनाकरितां गोकर्णक्षेत्राप्रत जाता झाला" याप्रकारेंकरून "परशुरामानें" वरदेऊन गोकर्णक्षेत्रीं गेल्यावर हे नूतन केलेले सर्व ब्राह्मण धन धान्याच्या योगानें समृद्धहोत्साते कोणीएकेसमयीं एकत्र ठिकाणीं मिळते झाले.

गतेबहुदिनेदेविस्वकार्यकृतवान्स्थितः ॥
कुबोधंचैवमादायस्वामिबुद्धिपरीक्षणात् ॥२३॥
रामवाक्यपरीक्षार्थंमंत्रयामासुरंजसा ॥
मीलितानांचयुष्माकमाहूतिर्मेयदाभवेत् ॥ २४ ॥
तदागच्छामीतिपुराभार्गवोप्युक्तवान्खलु ॥
तत्सत्यमनृतंवेतिपरीक्षांकुर्महेवयं ॥ २५ ॥
इतिसर्वेसमालोच्यरामेत्युच्चैःप्रचुक्रुशुः ॥

अर्थ.--शंकर पार्वतीप्रत सांगतात् हेदेवी ! रामानें गोकर्णेश्वरास जावून पुष्कळ दिवस गेल्यावर, ते सर्व ब्राह्मण (नूतन केलेले) कुबुद्धिधरून स्वामिबुद्धीची परिक्षा करण्याकरितां ह्मणजे परशुरामानें दिलेल्या वह्रानानुरूप वाक्याची परिक्षा करावी मह्णून ते सर्व एक

मसलत करिते झाले ती अशीकीं, तुह्मीं सर्व एकत्र मिळून ज्याका-ळीं माझें ( परशुरामाचें ) स्मरण कराल त्यासमयीं मी येऊन तुमचें संकट दूर करीन याप्रकारेंकरून परशुरामानें सांगितलें आहे तर तें त्याचें सांगणें खरें किंवा खोटें? याची परिक्षा पाहूं ह्मणून ते सर्व नूतनविप्र एकत्र होऊन हे परशुराम! या शब्देंकरून मोठयानें ओरडूं लागले.

आक्रंदितंतदातेषांश्रुत्वारामःकृपानिधिः ॥ २६ ॥
प्रादुरासीत्पुरोभागेदेवर्षिर्भार्गवस्स्वयम्॥श्रीरामउ॰
किमर्थंक्रंदितंविप्राभवद्भिर्मीलितैरिह ॥ २७ ॥
किंदुःखंभवतामद्यनाशयाम्यचिरादिहं ॥
स्कंद.उ.इतितस्यवचःश्रुत्वाप्रत्यूचुस्तेभयान्विताः२८।
नाकिंचिदपिसंप्राप्तंदुःखंत्वत्कृपयाविभो ॥
जल्पितंभवतांसत्यमनृतंवेतिशंकितैः ॥ २९ ॥
केवलंतुपरीक्षार्थंक्रंदितंमीलितैर्विभो ॥
इतितेषांवचःश्रुत्वाक्रोधसंरक्तलोचनः ॥ ३० ॥
निर्दहन्निवनेत्राभ्यामालोकयतभूसुरान् ॥
शशापतान्तदाविप्रान्जमदग्निकुमारकः ॥३१॥

अर्थ.—तेव्हां त्यांचें तें ओरडणें श्रवण करून दयासमुद्रजो परशुराम, तो त्या नूतन केलेल्या ब्राह्मणाच्या पुढ्यांत प्रगट होऊन त्यांस विचारूं लागला, हेब्राह्मणहो! तुह्मीं सर्व एकत्र होऊन माझें स्मरण जें केलें तुह्मांस कोणतें दुःख प्राप्त झालें तें मला सांगा, ह्मणजे त्या दुःखाचा मी नाश करीन. याप्रमाणें परशुरामाचें भाषण श्रवण करून तेब्राह्मण भयाभीत होत्साते परशुरामाप्रत बोलते झाले.

तें असेंकीं, हे प्रभो परशुरामा! तुझ्या कृपेच्या योगानें आह्मांस काहींच दुःख नाहीं, परंतु आह्मीं तुझें स्मरण करण्याचें कारण हेंच की, तूं जे पूर्वी आह्मास सांगितलेंस तें खरें किंवा खोटें तें पाहण्या करितांच सर्व एकत्र होऊन हाक मारिली. शिवाय काहींच दुःख नाहीं. याप्रकारें करून त्या नूतन केलेल्या ब्राह्मणा-चें भाषण श्रवण करून परशुराम क्रोधानें नेत्र आरक्त करून त्यांक-डे अवलोकन करीत होत्साता त्या नूतन सर्व ब्राह्मणास शाप देता झाला.

शापंचप्राप्यतेतस्यकुत्सिताश्वदरिद्रिणः ॥
सेवासर्वत्रकर्तारइदंनिश्चयभाषणं ॥ ३२ ॥
कन्याविक्रयकाराश्चपुण्यविक्रयकारिणः ॥
शप्त्वेत्थंभार्गवोरामोमहेंद्रंतपसेययौ ॥ ३३ ॥
गतेतुभार्गवेरामेतत्क्षेत्रस्थाद्विजातयः ॥
शापग्रस्ताःसदुःखार्ताःशूद्रप्रायास्तदाभवन३४॥
इतिहासमिमंदेवितवाग्रेकथितंमया ॥
चित्पावनस्यचोत्पत्तेरिदंचैवतुकारणं ॥ ३५ ॥
सह्याद्रेश्चतलेग्रामेचित्तपोळननामतः ॥
तत्रैवस्थापिताविप्रायावच्चंद्रदिवाकरौ ॥ ३६ ॥
⊛ इत्थंसह्याद्रिखंडस्यवचनानिनिशम्यतां ॥

अर्थ.—तो असाकीं, तुह्मीं निंद्य आणि दरिद्री व्हाल. तसेच केलेल्या पुण्याचा विक्रय करणारे कन्येचा विक्रय करणारे असे सर्व तुह्मी व्हाल. याप्रमाणें त्यासर्व नूतन केलेल्या ब्राह्मणास शाप देऊन नंतर, तो परशुराम महेंद्र पर्वतावर तपस्या करण्याकरितां जाता झाला.

याप्रमाणें शाप देऊन परशुरामानें महेंद्र पर्वतावर गेल्यानंतर त्या शूर्पारक क्षेत्रांत नूतन करून स्थापित केलेले जे ब्राह्मण ते सर्व शापग्रस्त होत्साते शूद्रप्राय होऊन दुःखानेपिडीत झाले. हेदेवी! यांप्रकारेंकरून सर्व लोकांहीं खरा वृत्तांत होता तो तुजपाशीं सांगितला. आणि सह्याद्रीच्या खाली जें जित्तपोळन ( चिपळोण ) नामक ग्राम आहे त्यामध्ये हे यावचंद्र दिवाकर आहे तोंपर्यंत राहतील. याप्रमाणें "स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रीखंडांत" सांगितलें आहे तें उत्तमप्रकारें करून अवलोकन करा. कारण, चित्तपावनास राज्य झाल्यापासून तर सह्याद्रीखंड कोणत्याहि भिक्षुकापाशीं अटळण्यांत आलें नव्हतें परंतु महत्प्रयत्नानें सह्याद्री खंडाच्या ५ प्रत्या मजकडे ( लक्ष्मण० शा० ) आल्या आहेत तर त्या पांच प्रतींतून शोधून सर्व प्रियवाचकांच्या ज्ञापनार्थ ह्या चित्तपावनांची सविस्तर उत्पत्ती दाखविली आहे. तर या व्यास वाक्यांवरून चित्तपावन लोकांच्या ब्राह्मण्याची तुलना करा.

आतां रत्नागिरी नगरांत राहणाऱ्या "कल्याणेच्छू" नामक पुरुषानें "पंचगौडांतर्गत शाणवी उर्फ सारस्वत ब्राह्मणाच्या" विमलास दूषण देण्याविषयीं, "माधवकृत शतप्रश्नकल्पलतिका" यानावांची एक स्वकपोल कल्पित कादंबरी रचून त्या कादंबरीस महान पंडितांचें नामाभिधान ठेऊन त्यांतील काहीं वाक्यांस सप्रमाणत्व देऊन तीं वाक्यें ता० २९ माहे नवेंबर १८६९चे जगन्मित्र नामक वर्तमानपत्रांत छापून प्रसिद्ध केलीं होतीं परंतु; "कल्याणेच्छूनें" त्यास्वकपोल कल्पित वाक्यांस सप्रमाणत्व देऊन सारस्वत कोंकणे उर्फ शाणवी हे तीन कर्मी ह्मणतेवेळीं त्या कादंबरींत आपल्या ज्ञाती विषयीं (चित्तपावनाविषयीं) काय वृत्तांत आहे त्याचा किंचितरी विचार करावयाचा होता! पण तो तसें कोठून करील? कारण रामापासून उत्तम शाप वन्त्रसंपादन केलें असून अशाप्रसंगीं त्यावन्त्राचाउपयोग न करील तर त्याशापाचा काय उपयोग. वाचकहो! हे चित्तपावनादिक सारस्वतांची निंदा करी-

नात हें काहीं आश्चर्य नव्हे. कारण देवोत्तम असून सर्व जगाचें पालन पोषण करणारा असा जो राम, याचित्तपावनादिकांचा कर्ता असून तशा त्या रामाची निंदा करण्यास हे मागें हटले नाहींत तर शारस्वतांचि निंदा कोठून न करें केल्यावांचून राहतील. असो हें तरी येक आश्चर्यच आहे.

आतां मी ह्मणजे या चित्तपावनाच्या निंदेनें लिहितों असें नाहीं तर त्या "कल्याणेच्छूनें" शारस्वतांच्या दूषणार्थ प्रदर्शित केलेला जो माधव तीच या चित्तपावनाविषयीं काय सांगतो तें पाहा.

सह्यस्यपार्श्वेमेविप्राःसकुटुंबाश्चतुर्दश ॥ ३७ ॥
वेदवेदांगसंपन्नाःपुत्रपौत्रादिसंयुताः ॥
रक्षितेष्वग्निहोत्रेषुइष्टापूर्तेषुचैवहि ॥ ३८ ॥
शिष्येविद्यांप्रयच्छत्सुअन्नदानादिकंतथा ॥
एवंनिवासंकुर्वत्सुअकस्माद्दैवयोगतः ॥ ३९ ॥
नीत्वासागरमध्यस्थैम्लेंच्छैर्बर्बरकादिभिः ॥
बहून्यब्दान्यतातीनितेभ्योजालाचसंततिः ॥ ४० ॥
तत्संपर्काच्चसंपातास्तद्रूपाःपुत्रपौत्रकाः ॥
उद्वाह्यतेनविधिनादंपत्यानिपरस्परं ॥ ४१ ॥
अभवन्पतिताःसर्वेसंसर्गेद्वीपवासिनः ॥
कालेनकियतारामोजातःपरशुपूर्वकः ॥ ४२ ॥
प्रतापइतिविख्यातोशककर्तातुचापरः ॥
विप्रोसौसर्वधर्मज्ञोज्ञानीपरमधार्मिकः ॥ ४३ ॥
सर्वशास्त्रेषुनिपुणःसर्ववेदप्रपाठकः ॥

प्रियकृत्सर्वलोकानांज्ञात्वाशरणमाययुः ॥ ४४ ॥
तेनाविप्रेणसर्वेषांप्रायश्चित्तंयथोदितं ॥
उपनामान्यष्टपट् (६०) स्युर्गोत्राणिभुवनानिच॥४५
दत्वैषांचित्तशुध्दिस्तुयस्मात्परशुरामतः ॥
चित्तशुध्दिःकृतातेनतस्मात्तेचित्तपावनाः ॥ ४६ ॥

अर्थ.—सह्याद्रीच्या पश्चिमेस चौदा ब्राह्मण वेदशास्त्रसंपन्न सकुटुंब पुत्र पौत्रां सहीत राहत असत. ते अग्निहोत्रें व यज्ञ कर्मेंही करीत असत, तलाव, विहीर, घाट, वगैरे धर्मार्थ बांधीत असत. शिष्यांस विद्या पढवीत असत. व अन्नदानादिक ही करीत असत. याप्रकारें करून राहत असतां दैवयोगानें अकस्मात समुद्र वासी वर्बर आदिकरून म्लेंच्छांही त्यांस (वरीलब्राह्मण क्षणविणारांस) नेले. पुष्कळ वर्षें झालीं आणि त्यांपासून (ह्म०) म्लेंच्छांपासूनच संतती झाली. आणि त्यांच्याच संपर्कामुळें पुत्र पौत्र त्यांसारखेच झाले. कर्में विधि प्रमाणें होत नसत तेणेंकरून सारे द्विपवास्यांच्या संगतीनें पतित झाले. नंतर कांहीं कालें करून परशुरामझाला. प्रताप राम ह्मणून जो शककर्ता प्रसिद्ध आहे तो निराळा. तो ब्राह्मण सर्व धर्म जाणणारा ज्ञानी मोठा धार्मिक सर्व शास्त्रांत व वेदांत निपुण असा होता. तो सर्व लोकांचे प्रिय करणारा असें जाणून पतित झालेले (चि०) त्यास शरण गेले. तेंव्हां त्याणें (परशूरामानें) सर्वांस यथोक्त प्रायश्चित देऊन ६० उपनावें व चौदागोत्रें दिलीं. परशुरामापासून त्यांच्या चित्ताची शुद्धता झाली ह्मणून ते चित्तपावन असी संज्ञा झाली.

---

१ सह्याद्रीखंडाच्या ८२ व्या अध्यायावरून पाहीलें असतां चितास्थानीं पवित्र केले ह्मणून चित्तपावनही संज्ञा प्राप्त झाली.

शाखायुग्मंचसंस्थाप्यशाकल्यांतैत्तरीयकां ॥
निषिद्धकर्मनिरतामत्स्यभक्षणतत्पराः ॥ ४७ ॥
कन्याविक्रयकाराश्चइंद्रियाणामनिग्रहात् ॥
कलभापिपालनाचकर्कलाख्याःप्रकीर्तिताः ४८॥
चित्तपावनज्ञातिस्थोभेदश्चपरिकीर्तितः ॥
त्रेतायांकुणपोत्पन्नाभूताःपरशुरामतः ॥ ४९ ॥
विप्राभुवनसंख्याश्चतत्रूप्याख्यासह्यखंडके ॥
ब्रह्मचर्येणातिष्ठेयुर्द्विजाःसर्वेत्रहून्समान् ॥ ५० ॥
ब्रह्मचर्यप्रभावेणमोक्षमार्गमवाप्नुयुः ॥
अस्मिन्कलियुगेप्राप्ताइतिमिथ्याभिवादनं ५१
इंद्रगोत्रेनृपनामान्यत्रषट्हिभवंतिच ॥
प्रतारणार्थलोकेषुकथांप्रोचुःपुरातनीं ॥ ५२ ॥
अमूलकंतुतत्सर्वंमिथ्यैवचप्रशंसनं ॥
अर्वाद्विभ्यःकुटुंबेभ्यःषष्टिसंख्यान्यवीभवन् ५३॥
अभवंश्चतदाभिन्नभिन्नस्थाननिवासिनः ॥
चित्तपावनज्ञातिस्थोभेदश्चैवतृतीयकः ॥ ५४ ॥
किलवंतस्तुविज्ञेयःसोपिनिंद्यःप्रकीर्तितः ॥
प्रवरैक्यात्सप्रवरभेदश्चैवचतुर्थकः ॥ ५५ ॥
दशाब्धिप्रमितेशाकेततःशुद्धिमवाप्नुयुः ॥
इतिश्रीमाधवीयेशतप्रश्नकल्पलतायां ॥
चित्तपावनकिलवंतसप्रवरोत्पत्तिप्रश्नोष्टमः ॥५६ ॥

अर्थ—तैतिरीयक आणि शाकल अशा दोन शाखा स्थापून चित्तशुद्धि त्याणे (ह्म०)परशुरामानें केली याकारणास्तव चित्तपावन- असी संज्ञा प्राप्त झाली आणि ते निषिद्ध कर्मे करणारे व मत्स्य मांस भक्षण करण्यांत तत्पर इंद्रियें स्वाधीन नसल्या कारणानें कन्याविक्रय करणारे असे होत. बदकें आदिकरून मधूर भाषण करणारे पक्षि पाळीत असत म्हणोन कर्कल नामातें पावले. चित्तपावन ज्ञातींतील हाएक भेद सांगितला आहे. त्रेतायुगांत परशुरामानें प्रेतांपासून चौदा ब्राह्मण उत्पन्न केले व त्यांचे वर्णन सह्याद्री खडांत आहे. ते सारे ब्राह्मण ब्रह्मचर्य व्रतानें पुष्कळवर्षे राहिले आणि ब्रह्मचर्य व्रताच्या सामर्थ्यानें मोक्षास गेले, तेच या कलियुगांत १४ गोत्रांचे व ६० कुळांचे उत्पन्न झाले हे बोलणें खोटें आहे. ठकविण्यासाठीं पुरातन ह्मणून कथा त्यांणीं सांगितली त्याला आधार नाहीं. आणि तें सर्व खोटें. जेव्हां १४ कुटुंबांपासून ६० झाली तेव्हां तीं निरनिराळ्या ठिकाणीं जावून राहिलीं. चित्तपावन ज्ञातींतील तिसरा भेद किलवंत ह्मणून जो आहे. तोही निंद्यझटला आहे. समवरांत विवाहझाल्या कारणानें समवर असा एक चौथा भेद झाला. त्यापासून (ह्म०) त्या दोषांपासून शके ११० त शुद्ध झाले. याप्रमाणे माधवकृतशतप्रश्नकल्पलतिकेंमधील, चित्तपावन, किलवंत, समवर, यांच्या उत्पत्ती विषयीं प्रश्न आठवा ८ आतां या माधवाच्या शतप्रश्न कल्पलतिकेवरून चित्तपावनाचा श्रेष्ठपणा सर्व विद्वज्जन वांचकांच्याध्यानीं आलाच असेल. आतां या लतिकेच्या कर्त्यानें चित्तपावनाचा दोष छपविण्याकरितां कशिपाह्य एक लबाडी लिहिली आहे, ती सर्व विद्वज्जनवाचकांच्या ध्यानीं येण्याकरितां येथें दाखवितों ती स्वस्थ चित्तानें अवलोकन करून पाहा. ती असी कीं, या लतिकेंतील आठव्या प्रश्नाच्या ६ व्या श्लोकावरून

असें दिसण्यांत येतें कीं कांहीं काळें करून परशुराम झाला. आणि या चित्तपावनाची शुद्धता ४१० त झाली असें तो माधव स्पष्ट लिहि-तो. तर त्यामाधवाच्या लिहिण्यावरून असी शंका उत्पन्न होती कीं, परशुरामावतार हा कृतयुगाच्या अंतीचा असून तो या चित्तपावनास प्रायःचित्त देऊन शुद्ध करण्या कारितांच ४१० दाहा मध्यें अवतार गृहण करूं लागला काय? गृहण केला असें जर ह्मणावें तर चित्तपा-वन हे रामापेक्षां पूर्वींचे असें सिद्ध होतें आतां रामा पेक्षां पुर्वींचे आ-हेत असें जर ह्मणावें! तर व्यास वाक्यांस व्यभिचारल येतें! तें असें कीं, परशुरामाने चितास्थानीं (स्मशानभूमीप्रत) आलेल्या कैवर्तकांस (कोळयांस) कुल गोत्रादिक विचारून नतर त्यांस ब्राह्मणत्व दिलें याप्रमाणें "स्कंदपुराणांतर्गत सह्याद्री खंडाच्या ८१ व्या अध्याया-त ही कथा आहे. आणि या व्यास वचनावरून परशुराम चित्तपावनापेक्षां पुर्वींचा आहे असें ह्मणण्यास कांहीं संशय नाहीं. आतां या चित्तपाव-नास दिलेल्या वर दानाप्रमाणें पुनःतो यांची शुद्धता करण्यास आला असें जर ह्मणावें तर या नूतन विप्रानीं कुबुद्धीनें त्या परशुरामाची निंदा केल्या कारणानें त्याच वेळेस शाप दिला असी कथा उघड असून तोच यांस ( चित्तपावनांस ) शुद्धकरण्याविषयीं पुनः अवतार धारण करील असें कोणत्याही विद्वानाच्या मनांत किंचितसुद्धां भास होतो काय? भास होतो, असें कदाचित् कबूल केलें असतें पण तें केव्हां जर परशुराम ४१० दाहामध्यें असता तर कदाचित् होईल. हा माधव तर ४१० मध्यें शुद्ध झाले असें ह्मणतो. तर असें पाहा! कलिचीं ४९७२ वर्षे गेलीं तर इतक्या वर्षांत परशुरामानें अवतार घेतला नसून ४१० मध्यें मात्र घेतला काय! घेतला असें जर ह्मणावें, तर त्याविषयीं ग्रंथाधार कांहींच नाहीं. एवंच याल्लोकेचा कर्ता मोठा मिथ्या कवी होता असें सिद्ध होतें. कारण यासें, व्यासादिक अनेक

महर्षी होऊन गेले परंतु; याप्रतिची रचना कोणत्याही महर्षींनीं केली नाहीं ही त्यांची मोठी चुकच ह्मटली तरी चालेल नाहीं बरें! असो आतां गणेशशास्त्र्यानें पोलीस कोर्टांत प्रतिज्ञेवर शपत घेऊन "मिस्तर सार्जंट अटकिन्सन" यांणीं पुनः तपासल्यावर त्यांचे द्वितीय प्रश्नोत्तरांत असें ह्मणतों कीं "ब्राह्मणाचे चार वर्ग असून त्यांस ब्राह्मण हीच संज्ञा आहे. दुसरे मांस मत्स्य खातात आह्मी खात नाहीं. असें ते गणेश शास्त्री सांगतात्. तर त्या गणेश-शास्त्र्याच्या व कल्याणेच्छूच्याही आपनार्य कल्याणेच्छूनें प्रदर्शित केलेल्याच लतिकेंतील एक श्लोक लिहितों तो सर्व वाचकांनीं उत्तम प्रकारें करून अवलोकन करावा. तो असा कीं,

निषिद्धकर्मनिरतामत्स्यभक्षणतत्पराः ॥
कन्याविक्रयकाराश्चइंद्रियाणामनिग्रहात् ॥५७॥
कलभाषीपालनाचकर्कलाख्याःप्रकीर्तिताः ॥

अर्थ—निषिद्धकर्म करण्यांत रत व मत्स्य मांस भक्षणकरण्यांत तत्पर इंद्रियें स्वाधीन नसल्या कारणानें कन्या विक्रय करणारे. इत्यादिक विशेषणें त्या विच्याऱ्या माधवानें या चित्तपावनास दिलीं असून आह्मीं खात नाहीं! ह्मणून सागण्याचें शास्त्रीबुवांस योग्य वाटलें काय ? किंवा त्याप्रसंगीं या वाक्याची याद राहिली नसेल नाहीं बरें ! असो आतां शास्त्रिबुवांस याद राहिली नाहीं हें कांहीं आश्चर्य नव्हे; तर कल्याणेच्छूस याद राहिली नाहीं हेंच मोठें आश्चर्य ह्मटलें पाहिजे ; कारण चित्तपावनाविषयींचा प्रश्न ८ असून सारस्वताविषयीं प्रश्न १३ वा आहे. तर आठव्या प्रश्नाचा विचार केल्यावांचून एकाएकीं ना वेळेस तेराव्या प्रश्नीं गेले तेव्हां हें मोठें आश्चर्यच होय. त्यांत सारस्वतांनीं दुर्भिक्षांत यज्ञकरून शेषभाग गृहण

केल्याबद्दल "कल्याणेच्छूनें" त्याच्या दूषणार्थ स्मृतींतील कांहीं चरण दाखविले आहेत् परंतु तो माधव या सारस्वताविषयीं इतकें तरी कबुल करितो कीं "मद्यपत्राश्चमत्स्येनब्राह्मणाश्चक्रुरन्वह" आणि या चित्तपावनादिकांविषयीं कांहींच विधि सांगत नसून केवळ स्वातात इतक्याचेंच स्पष्टीकरण करितो. तर वाचकहो! असा विचार करून पाहा! मद्यकरून खाल्यास दोष जास्ती किंवा मद्यावाचूनच खाल्यास दोष जास्ती? आतां मद्यावाचून फक्त काम्यानें करून मत्स्य खाल्यास दोष जास्ती असें जर वाचकांचें मत असेल तर या माधव वाक्याप्रमाणें चित्तपावनाच्या पक्तींस भोजन करणाऱ्या देशस्थादिकांस बाकिच्या तीन कर्मांचा तरी अधिकार आहे काय? तस्मात वाचकहो! "याकल्याणेच्छूनें" किंवा त्या गणेशशास्त्र्यानें तरी आह्मी खात नाहीं ह्मणून भर फोडतात त्याड ओरडते येर्ठी मासाधोक्तिचा कांहीं तरी विचार करावयाचा होता. पण तो विचार कोठून मेरे करील. कारण तो जर त्यावाक्याचा विचार करिता तर त्याचा पक्ष सिद्ध कोठून होईल मित्रहो! असा या दुर्वाच्य बोल्ण्यानें व प्रयत्नरात असून आह्मीं खात नाहीं ह्मटलें ह्मणून पक्ष सिद्ध होतो काय? असो आतां त्या "कल्याणेच्छूनें" गणेशशास्त्र्याच्या बोल्ण्यास सत्यत्व आणून आपला (चित्तपावनाचा) पक्ष सिद्ध करण्यास्तव, सारस्वताच्या दूषणार्थ ता० २९ माहे नोवेंबर १८६९ चे जगन्मित्र नामक वर्तमान पत्रांत याज्ञवल्क्यादिक स्मृतींतील कांहीं वाक्याचा पावचरण कांहीं अर्धा चरण व कांहीं ठिकाणीं २—२—असेंर दाखविलीं आहेत तीं असीं कीं—

मत्स्यांश्चकामतोजग्ध्वासोपवासस्त्र्यहंवसेत् ॥
जग्ध्वामासमभक्ष्यंतुसप्तरात्रंयवान्पिबेत् ॥५७॥

अर्थ—काम्यलें करून मत्स्य भक्षण केले असतां तीन उपोषणें

करावीं व सात दिवस यवभक्षण करावे ह्मणजे मत्स्य भक्षण जन्य दोष लागत नाहीं. याप्रमाणें या वचनाचा अर्थ दिसतो- तो खरा. परंतु "कल्याणेच्छूनें" हीं वरील वचनें प्रदर्शित करितें वेळीं त्यापुढील वाक्यें कां बरें सोडलीं. कारण असें आहे कीं,

पलांडुंविड्वराहंचछत्राकंग्रामकुक्कुटं ॥
लशुनंगृंजनंचैवजग्ध्वाचांद्रायणंचरेत् ॥ ५८ ॥
लशुनंगृंजनंचैवपलांडुंकवकानिच ॥
अभक्ष्याणिद्विजातीनाममेध्यप्रभवानिच ॥ ५९॥
छत्राकंविड्वराहंचलशुनंग्रामकुक्कुटं ॥
पलांडुंगृंजनंचैवमत्याजग्ध्वापतेद्विजः ॥ ६० ॥
अमत्यैतानिषड्जग्ध्वाकृच्छ्रंसांतपनंचरेत् ॥
यतिचांद्रायणंवापिशेषेषूपवसेदहः ॥
⊛ इत्थंमनुस्मृतावास्तियाज्ञवल्क्यस्मृतावपि ॥६१ ॥
⊛ तथाचअन्यग्रंथेपुसमूहोवर्ततेवहुः ॥
⊛ परंतुविस्तरभयात्स्वल्पेणैवात्रदर्शितं ॥ ६२ ॥

अर्थ—कांदा, ग्रामडुक्कर, भालांबी, कोंबडी, लसूण, गाजर, इत्यादिक पदार्थ भक्षण केले असतां चांद्रायण प्रायःश्चित्त घ्यावें. आणि हे पदार्थ द्विजांला, अमेध्य (अपवित्र) असे सांगितले असून एखादे औषधादिक उपचारें करून किंवा नकळतेपणानें भक्षण केले असतां सांतपन प्रायःश्चित घ्यावें. याप्रमाणें "मनुस्मृतींत" व

१ गाजर—याचि योग्यता रानडुकर व कोंबडी यांबरोबर आहे. आणि हे गाजर व कांदे देशस्थादिकांत क्षणभर नसतील तर चालत नाहीं. तर त्यांस विप्रत्व कोठून तें पाहा.

"याज्ञवल्क्यस्मृतींत" व अन्यग्रंथांतही अनेक वचनाचा समूह आहे परंतु विस्तार भयास्तव येथें दोनच ग्रथांतील प्रमाणें दाखविलीं आहेत. तर या प्रदर्शित केल्याप्रमाणा प्रमाणें हे सर्व पदार्थ त्यांच्या पक्षांत (व०) सांप्रतच्या मानावरून देशस्थादिकांत प्रयत्नेंकरून चालतात इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानाच्या या भागांत राहणाऱ्या ब्राह्मण मात्रांच्या घरीं शोध केला असतां सरासरीनें ९९ खडी कांदा व लसूण निघेल असें असून ते सर्व ब्राह्मण नित्य या पदार्थांच्या भक्षणानें पतित होत नाहींत काय ? आतां या भक्षणाच्या योगानें ते सर्व ब्राह्मण आपापल्या कर्मापासून भ्रष्ट होत नाहींत असें जर "कल्याणेच्छूचें" बोलणें असेल तर आम्हीही तेंच उत्तर आहे. कारण वास्तवीक रितिनें पाहिलें असतां कांदा, गाजर, लसूण, वगैरे खाणारास महान दोष सांगितला असून त्या दोषाच्या नाशार्थ प्रायःश्चित्तही आहे तें "कल्याणेच्छूच्या" बापनार्थ येथें प्रदर्शित करितों, तें स्वस्थ चित्तेंकरून पाहा.

तत्रस्वभावदुष्टलशुनगृंजनच्छत्राकविड्वाराह
ग्रामकुक्कुटपलांडूनांप्रत्येकममत्यासकृत्भक्षणे
सांतपनं ॥ अभ्यासेयतिचांद्रायणं ॥
मत्यासकृच्चेचांद्रम् ॥ अभ्यासेतदावृत्तिः ॥
अत्यंताभ्यासेसुरापानसमं ॥ प्रायश्चित्तांतेपु
नरुपनयनमेतेषुसर्वत्रामितिप्रायश्चित्तेंदुशेखरे॥६४॥

अर्थ–ते असें कीं, लसूण, कांदा, गाजर, आळंबी, घरडुक्कर, आणि कोंबडी, हे पदार्थ, अज्ञानानेंकरून एक वार भक्षण केले असतां सांतपन प्रायःश्चित्त घ्यावें, आणि पुष्कळ वेळा भक्षण केले असतां चांद्रायणप्रायःश्चित्त, मुद्दाम एकवार भक्षण केल्यास

**चांद्रायण** आणि मुद्दाम वारंवार भक्षण करणारास **चांद्रायणा**च्या आवृत्ति कराव्या, आणि फार दिवस जर अभ्यास असेल तर तें **सुरापानसम** (मद्यप्राशन केल्यासारखें समजावें) त्यास प्रायश्चित्त सांगितलेलें तें घेऊन नंतर पुनः **उपनयन** संस्कारकरावा यांप्रमाणें **"प्रायश्चित्तेंदुशेखरांतील वचन"** आहे तर या प्रायश्चित्तेंदुशेखरोक्ति प्रमाणें पूर्वोक्त जे ब्राह्मण ते क्षणेक्षणें हीं बरीच प्रायश्चित्तें घेऊन पुनरुपनयन संस्कार वगैरे करून घेत असतात काय? आता जर ते क्षणेक्षणें वर प्रदर्शित केलेल्या विधि करीत असतील तर ते खरोखर ब्राह्मण नाहीं पैसा या पदार्थांच्या अत्यंताभ्यासानें व कल्याणेष्कूनें प्रदर्शित केलेल्या प्रायश्चित्तें दुशेखरोक्तिच्या न्यायाप्रमाणें ते सर्व शूद्रप्रायच आहेत असें म्हणण्यास कांहींच बाधक नाहीं, असें असून "कल्याणेष्व्राद्धिक सभ्य चित्तपावनानीं" याज्ञवल्क्य स्मृती" तील वचन दाखवितें वेळीं या बरोबर वाक्याचा कांहींतरी विचार केला काय? त्यांत दुसरें असे आहे कीं, कल्याणेष्कूनें जो शास्त्रार्थ दाखविला तो केवळ कल्याणेष्कूलाच लागत असून यांविषयीं माधवाचें वचनही आहे तें असें कीं

निषिद्धकर्मनिरतामत्स्यभक्षणतत्पराः ॥-
कन्याविक्रयकाराश्चइंद्रियाणामनिग्रहात् ॥

अर्थ—निषिद्ध कर्म करण्यांतरत असून मत्स्य भक्षण करण्यांत तत्पर आणि इंद्रियें स्वाधीन नसल्याकारणानें कन्या विक्रय करणारे असे होत यांप्रमाणें चित्तपावनांविषयीं माधवाचें उत्तमवचन असून त्या वचनाकडे न पाहतां केवळ द्वेषानेंच वाक्यांतील आर्धा चरण दाखविला असतां त्या दोषास कल्याणेष्कू व त्याचे जातबंधू या उभयतां वांचून सारस्वत कसे योग्य होतील? असो, आता या कन्या विक्रया वरून तरी यांचें ( कन्या० ) द्विजत्व सिद्ध होतें कीं काय तें पहा

कन्याविक्रयिणोमूर्खारहःकिल्बिषकारिणः ॥
पतंतिनरकेघोरेदहंत्यासप्तमंकुलम् ॥ ६५ ॥
⊛ इत्थंयमस्यवचनंविचारयनिरंतरं ॥
विक्रीयकन्यकांगांचकृच्छ्रंसांतपनंचरेत् ॥ ६६ ॥
क्रीताद्रव्येणयानारीनसापत्नीविधीयते ॥
नसादैवेनसापित्र्येदासींतांकवयोविदुः ॥ ६७ ॥
⊛ इत्यादिकंशृणुवचःकाश्यपेनप्रभाषितं ॥
नकन्यायाःपिताविद्वान्गृह्णीयाच्छुल्कमण्वपि ६८
गृह्णंच्छुल्कंहिलोभेनस्यात्नरोपत्यविक्रयी ॥
स्त्रीधनानितुयेमोहादुपजीवंतिबांधवाः ॥ ६९ ॥
नारीयानानिवस्त्रंवातेपापायांत्यधोगतिं ॥
⊛ इत्थंमनुस्मृतावस्तिश्रवणांजलिनापिब ॥ ७० ॥
नारीविक्रयेचांद्रं कन्यापुत्रविक्रयेतद्द्विगुण ॥
मितिप्रायश्चित्तेंदुशेखरेपि ॥ ७१ ॥

**अर्थ**—तें असें कीं, कन्येचा विक्रय करणारे जेपुरुष आहेत ते मूर्ख असे समजावे. व एकांत बोरून पाप करणारे जे पुरुष तेही मुर्ख जाणावे आणि ते उभयतांही सात कुलांशीं सहीत त्या दोहीं पापाच्या योगानें मोठ्या भयंकर नरकांत पडून दग्ध होतात असें "यमाचें वचन" आहे. तसेच कन्या, आणि धेनू, यांचा विक्रय केला असतां त्या दोषाच्या नाशार्थ "सांतपन प्रायःश्चित्त घ्यावें" आणि द्रव्य देऊन विकत घेतलेली जी स्त्री (कन्या) ती पत्नी, असी ह्मणवून घेत नसून देवकार्यांत किंवा पितृकर्मांत वर्ज करावी ( ह० )

याउभय कर्मास ती उपयोग नसून ती केवळ दासीप्रमाणे आहे. आणि स्त्री विक्रय केला असतां चांद्रायण-प्रायःश्चित्त सांगितले आहे आणि कन्या अथवा पुत्र विकला असतां तद्दिगुण, ह्मणजे दोनवेळ चांद्रायण प्रायःश्चित घ्यावें. याप्रमाणे "प्रायश्चित्तेंदुशेखरांत" "मनुस्मृतींत" "कश्यपानें" व "पराशरानेंही" सांगितले आहे त्याचा स्वस्थ चित्तानें विचार करून पाहावा. तस्मात् सभ्य चित्तपावन हो! मागें प्रदर्शित केलेल्या माधवोक्तिप्रमाणें यावरील वचनोक्त दोषांस तुह्मीं (चित्तपावनादिक) योग्य असून पतित झाले आहा किंवा नाहीं याचा विचार करा.

⊛ पापभेदान्प्रवक्ष्यामितथाघोराश्चयातनाः ॥
⊛ मित्रवर्यंशृणुष्वेदंपातकंवलवत्तरं ॥ ७२ ॥
सुरापीमळमूत्रेचपिवेद्दर्पायुतंनृपः ॥
तत्रायःपिंडमादायताडयंतिचाकिंकराः ॥ ७३ ॥
पिशाचत्वमवाप्नोतितत्रस्थित्वायुगाष्टकं ॥
⊛ इत्थंहिशेषधर्मस्यवचनंशृणुसुंदरं ॥ ७४ ॥
पंक्तिभेदीवृथापाकीनित्यंब्राह्मणनिंदकः ॥
आदेशीवेदविक्रेतापंचैतेब्रह्मघातकाः ॥ ७५ ॥
ब्रह्महामद्यपस्तेनस्तथैवगुरुतल्पगः ॥
एतेमहापातकिनोयश्चतैःसहसंवसेत् ॥ ७६ ॥
अज्ञानात्तुसुरांपीत्वारेतोविण्मूत्रमेवच ॥
पुनःसंस्कारमर्हंतित्रयोवर्णाद्विजातयः ॥ ७७ ॥
⊛ इत्थंहियाज्ञवल्क्यस्यवचनानिचपश्यतां-॥

*अर्थ*—आणि पाप भेदेंकरून घोर त्या यम यातना त्या सर्व सांगतो हे मित्रवर्यादिक सभ्य चित्पावनादिकहो ! त्या *श्रवण करा.* त्या अशा कीं सुरापी (मद्यप्राशनकरणारा) जो पुरुष तोमुरा मध्यें राहून दाहा हजार वर्ष पर्यंत मलमूत्र प्राशन करितो नंतर त्या तुनबाहेर काढून तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यानें यमाचे दूत ताडन करितात याप्रकारे करून आठ युगें पर्यंत यम यातनाभोगि त्यानंतर पुन पिशाच योनी प्राप्त होती याप्रमाणे "शेषधर्मायर्वं" सांगितलें आहे आणि पंक्तिभेद करणारा, नित्य ब्राह्मणाची निंदा करणारा, आदेशी, आणि वेदविक्रयकरणारा मिळून हे पाचही नरघातकी आहेत (इ०) भलदयेपासून जें घातक लागतें कीं तें पाप या पाच असाम्यांच्या माथीं राहतें आणि ब्रह्महत्याकरणारा, मद्यप्राशनकरणारा चोर, गुरुपत्नीशीं गमन करणारा आणि याचार पुरुषाशीं सह निरंतर संग ठेवणारा जो असेल तो मिळून हे पाचही महा पातकी जाणावे आणि मद्य, रेत, विष्टा, आणि मूत्र हेचा पदार्थ ब्रह्म, क्षत्रिय, वैश्य, यांणीं अज्ञानें करून प्राशा केले असता ते प्राशन करणारास पुन संस्कार करावा याप्रमाणे "याज्ञवल्कस्मृतींत" व अन्यपुराणातही सांगितलें आहे. तर हें मद्य चित्पावनादिकात दा० या० उ० ध० त प्राशन करितात तर तें प्राशन करणारास द्विज तरी ह्मणावेत काय? आणि त्याच्याशी अन्नोदक ठेवणारास कर्मार्ह असें ह्मणावेत काय? कारण अज्ञानपणें करून मद्यप्राशन केलें असता पुन संस्कार करावा असें शास्त्र आहे तर ज्ञानें करून त्यात शास्त्री ह्मणविणारेच यापदार्थाचें गृहण करित असून त्याच्याशी हजारो ब्राह्मण अन्नोदक ऋणान सबंध ठेवितात तर त्या पतित पुरुषाच्या सासर्गानें जे तरोखर ब्राह्मण तेमात्र पतीत हेत नसतीलना? वारें! षट्कर्माधिकाऱ्यानु! याप्रमाणे ब्राह्म

ण्य संरक्षण करण्याचा किंवा सोन्याच्या शाईनें लिहून तावदानी पे-टींत ठेवण्या जोगा आहे नव्हे !!

असो आतां या प्रदर्शित केलेल्याच वचनाप्रमाणें अनेक ऋषींचीं वचनें आहेत परंतु विस्तारभयानें उदाहरणार्थ दोन तीन ग्रंथांतीलच दाखविलीं. कारण "कल्याणेच्छूनें" नागमित्र नामक वर्तमानपत्रांत असें लिहिलें होतें कीं, "शेणवी जर ब्राह्मण असते तर या स्मृति वाक्या वरून पतित झाले असते" असें तो ह्मणतो तर त्या कल्याणेच्छूच्याच त्या सुंदर बोलल्यावरून लतिकेप्रमाणें मत्स्यखाणारास व मद्यप्राशन करणारास व कन्या विक्रयादि करणाऱ्या चित्तपावनाच्या ठिकाणीं द्विजत्वतरी सिद्ध होतें काय? आणि यांच्याशीं अन्नोदक ठेवणारास कर्मीहि ह्मणवित काय? कारण सारस्वतानें दुर्भिक्षांत यज्ञकरून होमशेष भक्षण केल्याबद्दल मोठमोठे स्वकपोल कल्पित ग्रंथ काढून पूर्वा पर संबंध नपाहतां सारस्वतांची निंदा करूं लागले तर त्याच ग्रंथांतील वाक्यावरून या चित्तपावनाच्या सांसर्गानें देशादिकही पतित झालेत किंवा नाहीं? असो एवंच तात्पर्यार्थ हाच कीं

विप्रैर्भागवतीवार्तागेहेगेहेजनेजने ॥
कारिताकणलोभेनकथासारस्तथोगतः ॥

अर्थ—या श्लोकाप्रमाणें या चित्तपावन लोकांचें वर्तन दिसतें कारण पुराणिक बुवा जे आहेत ते अज्ञानी लोकांस ज्ञान प्राप्ति व्हावी एतदर्थ पुराणांतील नानाप्रकारचे धर्म सांगतात आणि पुराणिक बुवांचीं कर्मे व आचार व धर्म पाहिला असतां तो लिहून पुरेकरतांच येणार नाहीं तसे हे कल्याणेच्छू नामधारक सारस्वतांचा दोष दाखवून ते ब्राह्मण नव्हे असें सिद्ध करण्याकरितां भगिरथ प्रयत्न करितात परंतु बुद्धि चातुर्यकारच झाल्यामुळें फसले जातात. असो आतां या चित्तपावनाची उत्पत्ती व यांचे दोष व यांमध्यें चलन होण्याचीं महापातकें

पाहिली असतां चांगले भावीक शूद्रादिलोक देखील यांच्या हातून दर्भ वगैरे घेण्यास संकोच करतीलशी वाटते. कारण जर ते हिंदुधर्म चांगल्या रितीनें जाणत असतील तर- आतां चित्तपावनादिक जर ब्राह्मण नव्हेत तर त्यांस ब्राह्मणही संज्ञा प्राप्त होऊन देशस्थादिकांत कसे मिसळले जातात ह्मणून येथें कोणि शंका घेतील तर असें आहे कीं, आजकाल ह्यातीं पुष्कळ पैसा असून सत्ताधीश जर असेल तर तो शूद्र जरी असला तथापि ब्राह्मण त्या द्रव्याच्या लोभानें शूद्रास ब्राह्मण देखील करू शकतील. कारण पहा बाजीराव पेशव्यास जायत्कालपर्यंत चित्तपावन हिंच असें समजलेंनव्हतें तवपर्यंत सर्व पुराणें सारखींच होतीं आणि ज्यानेंठेस त्यास चित्तपावन हे खरोखर हिंच असें समजून आलें त्याबरोबर सह्याद्रीखंडाचा पडशाकरून ब्राह्मणा वरावर अन्नोदकव्यवहारसंबंध ठेवण्याकरितां हजारो रुपये खर्च करून एक पंगत केली. आतां ब्राह्मणांनीं पंगतजर न कराबी तर तो राजाच होता फाशीची हुकूम करील तर बिचारे ब्राह्मण व्यर्थ आपापल्या अल्पायुष्यांतच नाशास पावणार असें जाणून कांहीं ब्राह्मण यांच्याशीं ( चित्तपावना० ) पंगत करूं लागले ह्मणून त्या दिवसापासून या चित्तपावनादिकाचें महात्म्य वृद्धिंगत पाऊन ब्राह्मण ह्मणून घेऊं लागले. आतां हें खरें खोटें कशावरून समजावें ? असें ह्मणाल तर असें आहे कीं चांगले पढीक असून स्वजातीत जे देशस्थादिक ते या चित्तपावनादिकांस अद्यापपर्यंत पितृकर्मांत आमंत्रण देखील करीत नाहींत् यावरून खरेपणा समजला जातो. असें असून त्या आपल्या (चित्त०) मूळ उत्पत्तिस न पाहतां केवळ द्वेषानेंच जर हे सारस्वतांची निंदा करू लागले तर त्या द्वेषावर कोणता उपाय चालतो ! कारण माझी आई वंध्या आहे ह्या ह्मणिप्रमाणें निरर्थक वाद करणारांपाशीं बोलून तरी परिणाम आहे काय ! कधीं नाहीं.

अंतर्गतमलोदुष्टस्तीर्थस्नानशतैरपि ॥
नशुध्यतियथाभांडंसुरायादाहितंचसत् ॥
अनयोनयसंकाशोहृदयान्नापसर्पति ॥
इतीदमभवद्दुष्टंमयानानाप्रकारतः ॥

अर्थ—कारण, ज्याचे हृदयांत पाप आहे (जो दुष्ट) त्याला शतशः तीर्थ स्नान घातलें तथापी शुद्ध होत नाहीं. जसे मद्याचें भांडें अग्नींत जाळिलें असतांहि शुद्धिस पावत नाहीं कीं, तसे. या चित्तपावनादिकांच्या शांत्यर्थ नानाप्रकारें करून शिष्टानुमतानें व शास्त्ररीत्या जरी बोधित केले तथापि यांच्या हृदयापासून जो कांहीं अनय (दुष्टस्वभाव) तो जातच नाहीं कारण

नलिकागतमपिकुटिलंनभवतिसरलंशुनःपुच्छं ॥

कुत्र्याचें शेपूट वांसूच्या नळींत घातलें ह्मणून तें नीट होतें काय ! जसें तें नीट होत नाहीं की तसे या चित्तपावनास कितीजरी बोधित केले तथापि यांचें समाधान होऊन हे सारस्वतांची निंदा न करतील असें होणेंच नाहीं कारण परशुरामाचें वरदानच तसें आहे. अस्तु आतां हे सर्व प्रकार दाखविण्याचें कारण हेंच कीं, या चित्तपावनांनीं श्रेष्ठपणाचा जो झेंडा लाविला तो या सातव्या प्रकरणावरून अवलोकन करून— या चित्तपावनास द्विजतरी ह्मणण्याचा अधिकार आहे कीं काय ! याचा सिद्धांत सर्व माझे प्रीय वाचक आपापल्या शुद्धांतःकरणानें करतील अशी आशा करितों.

इतिकेण्योपाव्हनारायणसूनुलक्ष्मणविरचितेश्रीमद्दशाप्रकरणेचित्पावनोत्पत्तिवर्णनंनामसप्तमप्रकरणं समाप्तम्



# प्रकरण-आठवें.



श्रीमत्सीताजानिदशलपनारिंरघूत्तमंरामं ॥

६ नत्वाष्टमंप्रकरणंकाराष्ट्रोत्पत्तिनामकंवक्ष्ये ॥ १ ॥

अर्थ—श्रीमत्सीतापति, रावणाचाशत्रु, रघुकुलामध्यें श्रेष्ठ असा जो रामचंद्र त्यांस नमस्कार करून कराडोत्पत्ति नामक हें आठवें प्रकरणसांगतों.

महादेवविरूपाक्षभक्ताभीष्टप्रदायक ॥

कथयस्वमहादेवकाराष्ट्रब्राह्मणोद्भवं ॥ २ ॥

॥ महादेवउवाच॥ शृणुपुत्रप्रवक्ष्यामिइतिहासंपुरातनं॥

कराष्ट्रनामादेशोस्तिदशयोजनविस्तृतः ॥ ३ ॥

वेदवत्याश्चोत्तरेतुकोङनासगदक्षिणे ॥

कराष्ट्रनामादेशश्चदुष्टदेशःप्रकीर्तितः ॥ ४ ॥

सर्वलोकाश्चकठिनादुर्जनाःपापकर्मिणः ॥

तद्देशजाश्चविप्रास्तुकाराष्ट्राइतिनामतः ॥ ५ ॥

पापकर्मरतानष्टाव्यभिचारसमुद्भवाः ॥

खरस्यअस्थियोगेनरेतःक्षिप्तंविभावकं ॥ ६ ॥

तेनतेषांसमुत्पत्तिर्जातावैपापकर्मिणा ॥

तद्देशेमातृकादेवीमहादुष्टाकुरूपिणी ॥ ७ ॥

७ तस्याःपूजायदद्देचब्राह्मणोबलिर्दीयते ॥

तेपंक्तिगोत्रजानराब्रह्महत्यांकरोतिच ॥ ८ ॥

अर्थ–हेविरूपाक्षा ! भक्तांचे मनोरथ पूर्णकरणाऱ्या हेमहादेवा ! कऱ्हाडेब्राह्मणाची उत्पत्तिमलासांग. याप्रकारेंकरून स्कंदाचें भाषण ऐकिल्यावर शंकर ह्मणतो हेपुत्रा ! पूर्वीचा इतिहास सांगतो तो श्रवण कर. तो असा कीं कऱ्हाड यानांवें करून दाहा योजन विस्तिर्ण वेत्रवती नदीच्या उत्तरभागीं, आणि कोयना नदीच्या (कृष्णानदीच्या) दक्षिणभागीं दुष्ट देश असता झाला... आणि त्यादेशांत दुर्जन व पापकर्में करणारे दुष्ट हृदयानें युक्त असे लोक राहत असत. आणि त्या देशांमध्यें उत्पन्न झालेले जे ब्राह्मण त्यांस कराडे अशी सज्ञा आहे. आणि त्याकऱ्हाड देशांत राहणारे ब्राह्मण असे आहेत कीं, नित्य पापकर्म करणारे कठोर, महानष्ट, व्यभिचारें करून उत्पन्न झालेले. आणि खराच्या हाडापासून रेतपेक्षेपेंकरून विधवेच्या ठायीं उत्पन्न झालेले ह्मणून तेपाप कर्मी आणि त्यांच्या पासून जी संतति झाली ती आपल्या पित्याचें नांव पावली. आणि त्यांची कुलस्वामिणी महादुष्ट व कुरूपिणी अशी देवी आहे तिला हे (कऱ्हाडे) प्रतिवर्षी पुजेच्या वेळेस ब्राह्मणाचा बळी देत असतात ह्मणून ते पंक्तिनष्ट (पंक्तिस घेण्यास अयोग्य) व ब्रह्महत्या करणारे असे आहेत.

नकृतायेनसाहत्याकुलंतस्यक्षयंव्रजेत् ॥
एवंपुरातयादेव्याबरोदत्तोद्विजान्किल ॥ ९ ॥
तेषांसंसर्गमात्रेणसचेलंस्नानमाचरेत् ॥
तस्यदेशांतरोवायुर्नग्राह्योयोजनत्रयं ॥ १० ॥
केवलंविषमाप्नोतिपातकंअतिदुस्तरं॥स्कंदउ०॥
किंगोत्रंचकथंजातःकिंनामगृहणादपि ॥ ११ ॥

कथयस्वमहादेवसर्वमेवयथास्थितं॥स्कं०उ० ॥
पुरीशमविगोत्रंचकौशिकंवत्सहारितं ॥ १२ ॥
शांडिल्यंचैवमांडव्यंदेवराजसुदर्शनं ॥
एवंऋषिभ्यःप्राप्तानिगोत्राणितदनुग्रहात् ॥ १३ ॥
वल्लहस्यांप्रकुर्वंतिप्रतिसंवत्सरेद्वयं ॥
सर्वकर्मबहिस्थाश्चसर्वधर्मबहिष्कृताः ॥ १४ ॥
सर्वेतेनगराह्याह्यास्तेषांस्पर्शनकारयेत् ॥
तस्यादेव्याःकृतोयज्ञःसर्वत्रविजयप्रदः ॥ १५ ॥
सादेवीस्वब्रवीद्विप्रान्सर्वांसिद्धीर्ददामिवः ॥
अब्देअब्देदीयतांमांब्राह्मणश्चसुलक्षणः॥ १६ ॥
विशेषंचैवजामाताअथवाभगिनीसुतः ॥

अर्थ–आणि त्या देवीनें त्यांस (कऱ्हाड्यांस) असा वर दिला आहे कीं, जर हा बळी दिला नाहीं तर तुमचा कुलक्षय होईल. याप्रमाणें त्यांस वर दिला आहे. ह्मणून हे सर्व प्रकारानीं दुष्ट पापी असल्याकारणानें यांचा (कऱ्हाड्याचा) संसर्ग झाल्य असता सचैल स्नान करावें. फार काय सांगूं यांच्या (कऱ्हाड्यांच्या) देशावरून जो वारा येतो तो बाराकोस पर्यंत अपवित्र आहे ह्मणून गृहणकरूनये. आणि केवळ विषदान हें अत्यंत कठीण पाप आहे. याप्रमाणें शंकराचें भाषण श्रवण करून कार्तिक स्वामी ह्मणतो कीं, हे महादेवा ! याकऱ्हाडदेशांत राहणाऱ्या ब्राह्मणाचें नांव काय ? व गोत्र कोणतें न हे झाले कसे हें सर्व कृपाकरून यथास्थित सांग. याप्रमाणें स्कंदाचें भाषण श्रवणकरून शंकर ह्मण-

तो, पुरीश, अत्रि, कौशिक, वत्स, हारीत, शांडिल्य, मांडव्य, देवराज, आणि सुदर्शन, याप्रमाणें या दाहा ऋषींपासून यांना हीं गोत्रे मिळालीं आहेत. आणि हे ( कऱ्हाडे ) प्रतिवर्षी ब्रह्महत्या करीत असल्या कारणानें हे अती हीन आहेत. ह्मणून सर्व कर्मांत बहिष्कृत असून ( कर्माचा अधिकार नाहीं ) सर्व धर्मांत भ्रष्ट आहेत. आणि यांस नगरांत सर्वथा घेऊं नयें. आणि यांचा ( कऱ्हाड्यांचा ) स्पर्श देखील होऊंन देऊं नयें. आणि त्या गरदा देवीच्या वरदानाप्रमाणें यज्ञ केला असतां यांचा सर्वत्र विजय होतो. आणि त्या गरदादेवीनें यांस असें सांगितलें आहे कीं, जर तुमची ( कऱ्हाड्यांची ) सर्व सिद्धी व्हावी तर प्रतिवर्षी सुलक्षण सर्व गुणांनीं युक्त, असा ब्राह्मण मला द्यावा. त्यांत विशेषें करून जामात (जावयी) अथवा भगिनी सुत (भाचा) द्यावा. आतां हे जर नसतील तर त्यांच्या अभावीं कोणी तरी ब्राह्मण द्यावा. आणि देण्याचे वेळीं विषप्रयोग करावा. याप्रमाणें सांगितलें आहे.

तन्मध्यगास्त्रयोविप्राःपद्मयोनामधारकाः ॥ १७ ॥
पदमात्रंतुगायत्रीपारगाःकोंकणेस्थिताः ॥
श्राद्धेवामौंजीकर्मेवामांगल्येवासुकर्मसु ॥ १८ ॥
ह्यागताःपद्मयोविप्राःकार्यनाशोनसंशयः ॥
वर्जयेत्सर्वकार्येषुसर्वधर्मेषुवर्जयेत् ॥ १९ ॥
चांडालब्राह्मणाश्चैवनगृण्हीयाच्चतज्जलं ॥
सुवर्णस्तेयमित्ताश्चपेषुगणेषुच ॥
शुभकार्येषुसर्वेषुवर्जनीयाःप्रयत्नतः ॥ २० ॥
इत्थंहिमंजुळाख्यानेसह्याद्रीखंडमध्यगे ॥

ॐ व्यासेनरचितंपूर्वंतदेवप्रगटीकृतं ॥ २१ ॥

**अर्थ**–आतां हे जे कऱ्हाडे सांगितले, त्यांत तीन असामी पद्मयाना मते धारण करणारे आहेत आणि यांस हें नाम प्राप्त होण्याचे कारण हेचकीं, गायत्री पदमात्राचा पार जाणणारे आहेत. (सर्व गायत्रीची माहिती नाहीं) ह्मणून पद्मे. व हे कोकणांत राहिले. आणि हे पद्मे हव्य कव्यांत व सर्व मंगलकार्यांत जर आले असतील तर सर्व कार्यांचा नाश होतो यांत संशय नाहीं. तस्मात् यांचा सर्व कर्मांत व सर्व धर्मांत परित्याग करावा, आणि यांच्या हाताचे उदक जें आहे तें चांडाळाच्या उदकाप्रमाणे जाणून त्याग करावा. (कऱ्हाड्यांचे हातून उदक देखील घेऊं नये) आणि हे सदांसर्वकाळ स्वर्णाची चोरी करणारे आहेत व यांस ग्रामांत किंवा नगरांत अथवा शुभ कार्यांत गृहण करूं नयेत (प्रयत्नें करून वर्ज करावे.) याप्रमाणें "सह्याद्री खंडांत" व "मंगुलेश्वरमहात्म्यांत" ही व्यासानीं सांगितलें आहे. तें सर्व विद्वज्जन वाचकांच्या ज्ञापनार्थ अर्थासहीत येथें प्रगट केलें आहे, तें पाहावें आतां त्या देवीनें या कऱ्हाड्यांस याप्रकारें करून वर देण्याचें कारण काय? असें ह्मणाल तर त्याचें कारण व यांची मुळउत्पत्ति सांगतों.

पुराकुमद्वतितीरेसुमुखोनामकोद्विजः ॥
वेदवेदांगतत्वज्ञोमंत्रयणपरायणः ॥ २२ ॥
मन्मथंचिंतयामासपंचबाणधनुर्धरं ॥
तस्मात्प्रसंन्नोभगवान्मदनोरतिवल्लभः ॥ २३ ॥
वसंतोत्सवनामानंस्वकरस्थंमनोहरं ॥
जीवहीनशरीराणांजीवदातारमद्भुतं ॥ २४ ॥
सिद्धगंधर्वसाध्येषुदुर्लभःसर्ववर्णतः ॥
कंदुकंदत्तवान्रामद्विजवर्यायतोपणात् ॥ २५ ॥

अर्थ–पूर्वी कुमुद्वती नदीच्यातिरीं वेदवेदांगें जाणणारा व मंत्र वर्णांत तत्पर असा सुमुख या नांवें करून एक ब्राह्मण राहत होता तो पंच बाणाशीं सहवर्तमान धनुष्य धारण करणारा जो मदन त्याचें ध्यान करिता झाला. नंतर त्या ध्यानाच्या योगानें रतिपति भगवान्मदन जो राम तो प्रसन्न होऊन त्या सुमुख ब्राह्मणाकारणें एक सुंदर असून आपल्या करामध्यें निरंतर असणारा प्राणहीन पुरुषास प्राण देणारा आणि सिद्ध गंधर्व साध्य इत्यादिक देवगणासही दुर्लभ असा वसंतोत्सव मानक एक चंडू देताझाला.

ततश्चांतर्दधेमारःप्रहृष्टस्तापसोत्तमः ॥
प्रणिपत्यविभुंशांतंसौदर्यानंदतुंदिलं ॥ २६ ॥
कंदर्पंश्यामलंदिव्यंकोमलंभक्तवल्लभं ॥

अर्थ.–याप्रमाणें तो चेंडु त्या ब्राह्मणाच्या हातीं देऊन राम गुप्त होता झाला. तेव्हां त्या ब्राह्मणानें सर्व जगांत व्यापून असणारा, श्याम वर्णें करून युक्त कोमलांग आहे ज्याचें भक्ताभिमानी असा जो राम, त्याप्रत नमस्कार करून स्वस्थ असता झाला.

ततःसमागताकाचिद्ब्रह्मवंशसमुद्भवा ॥ २७ ॥
सानारीरूपसंपन्नायुवतीगतभर्तृका ॥
सकेशीकंबुकंठीचसमपीनपयोधरा ॥ २८ ॥
कुलटाविहुलांगिचस्फुटनाभिकृशोदरि ॥
तत्रागत्यमुनींद्रायप्रणिपत्याग्रतःस्थिता ॥ २९ ॥
तांनिरीक्ष्यमहायोगीतवपुत्रोभविष्यति ॥

अर्थ.–त्यासमयीं त्या ऋषीच्या आश्रमाप्रत ब्राह्मणवंशांत उत्पन्न झालेली तरुण, रूपवती, विधवा, सकेशा, शंखाप्रमाणें आहे कंठ

जीचा, वर्तुळाकार व पुष्ट आहेत ज्यनें जीची जारिणी स्पष्ट आहे नाभी जिची वनोदरानें युक्त अशी एक स्त्री येऊन त्या ऋषी कारणें नमस्कार करून त्याच्या समोर उभी राहती झाली. नंतर त्या ऋषीनें तीस आरंभून आशीर्वाद देता झाला. तो असाकी हे स्त्रिये ! तुला पुत्र होईल.

इत्युक्त्वापुनरालोक्यविस्मिताभूद्द्विजाग्रणी॥३०॥
ततःसापिस्मिताभूत्वापुनराहमुनीश्वरं ॥
मुनिवर्यभवद्वाक्यममोघंकिलतत्त्वतः ॥ ३१ ॥
ममपुत्रोपिचेद्दातुंगरलंकुशलोभवेत् ॥
इतिवाक्यंसमाकर्ण्यमुनिराहस्मितानन: ॥ ३२ ॥
किमर्थंगरदोभूयात्तवगर्भंकुभाषिते ॥
तद्वृत्तंममनिःशेषंवक्तुमर्हसिभामिनी ॥ ३३ ॥

अर्थ–याप्रमाणें आशीर्वाद देऊन तिजकडे पाहून आश्चर्य करूं लागला. नंतर तीही आश्चर्य युक्त होत्साती त्या ऋषीप्रत भाषण करिती झाली, तें असें कीं, हे ऋषीवर्या ! तुझें वाक्य हें अमोघ आहे तस्मात् मज पुत्र होईल परंतु गरल ( विष ) दाना विषयीं कुशल ( श्रेष्ठ ) होईल. याप्रमाणें तीचें तें भाषण ऐकून तो ऋषी किंचित हास्य मुख होत्साता ती प्रत बोलता झाला. तें असेंकीं, हे कुभाषिते ! ( वाईट भाषण करण्यांचे ) स्त्रिये कोण या कारणास्तव तुला विषद पुत्र होईल ? तो सर्व वृत्तांत मज कारणें सांग.

सापिपूर्वंतपःकृत्वागरदांशक्तिमीक्ष्यच ॥
मदीयमौरसंपुत्रंदातुंदेवीवरंवद ॥ ३४ ॥
इत्युक्तासाममस्वामिनिदेवीहास्यवतीवभौ ॥

मत्प्रीत्यैगरलंदेहितस्मात्पुत्रोभविष्यति ॥ ३५ ॥
तस्यवंशसमृद्ध्यर्थंवत्सरत्रयतःपुनः ॥
मत्प्रीतिकारकंकार्यंव्रतंयत्नप्रयत्नतः ॥ ३६ ॥
एवंमत्प्रीतिदंकार्यंत्वद्वंशस्थैर्जनैरपि ॥

अर्थ.—याप्रकारेंकरून त्या ऋषीचें भाषण श्रवण केल्यावर, ती स्त्री त्या ऋषी प्रत बोलती झाली. ते असेंकी, हे ऋषी वर्या ! पूर्वी मीं तपस्याकरून गरदा देवी पाहिली ( प्रसन्न झाली ) तेव्हा तीजपासीं पुत्र होण्याच्या इच्छेनें वर मागितला, त्याकाली ति देवी हास्यमुखी होऊन बोल्लीकीं, हे स्त्रिये ! जर तुला पुत्राची इच्छा असेल तर तू मत्प्रीत्यर्थ विषदे ह्मणजे तुला पुत्र होईल आणि पुढें त्याचा वंश वाढावा असी जर तू इच्छा करीत असतील तर तीन तीन वर्षांनीं मत्प्रीतिकारक विषदान व्रत कर. आणि याचप्रमाणें 'वंश वृध्यर्थ परंपरेनें व्रत चालावें

इत्युक्त्वामुनिशार्दूलंप्रणनामपुनःपुनः ॥
तांदृष्ट्वाविस्मितोभूत्वादेवाज्ञांहिबलीयसी ॥३७॥
इतिमत्वामुनींद्रोपिशिरसाकंपितस्तदा ॥
कंदुकंचगृहित्वाथसमीपस्थेस्वरारिस्थिते ॥ ३९ ॥
निःक्षिप्त्वापुनरादायतस्यचक्रेतुगोपनं॥
कंदुकस्पर्शमात्रेणपुमान्जातोदृढागकः ॥ ४० ॥
स्वरशब्दसमायुक्तंनिरीक्ष्यमुनीश्वरः ॥
प्रेरयामासतारंतुतेनसाकंस्थलांतरे ॥ ४१ ॥
अथप्रीत्यासंगतयोर्द्वयोरासीद्रतिस्तदा ॥

ततःपरंतुगर्भोपितयातस्माद्यृतःकिल ॥ ३२ ॥

अर्थ—याप्रमाणें बोलून ती स्त्री त्याऋषीप्रत पुनः नमस्कार करिती झाली. नंतर तो ऋषी त्या स्त्रीस पाहून आश्चर्य युक्त होऊन देवाज्ञा मोठी असून मान्य आहे असें मनांत आणून मस्तक डोलाविता झाला. नंतर तो चेंडू घेऊन समीप भागीं एक खराचे हाड होतें त्यावर टाकून पुनः तो चेंडू घेऊन गुप्त करून ठेविला. आणि त्या खराच्या हाडास त्या चेंडुचा स्पर्श होताच मोठा अंगाने सुदृढ असा पुरुष उत्पन्न झाला नंतर त्या पुरुषास खराच्या शब्दाप्रमाणें शब्द उत्पन्न झाला तो पाहून त्या स्त्रियेस सांगितले की, हेस्त्रिये ! तू या पुरुषास घेऊन एकांत स्थलीं जा आणि तुम्ही उभयतांही रति विलास करा याप्रमाणें त्या ऋषीचें वचन ऐकिल्यावर ती उभयतांही रति विलास करिती झालीं. नंतर त्या स्त्रियेच्या उदरीं त्या पुरुषापासून गर्भ उत्पन्न झाला.

पूर्णेतुनवमेमासिविधवागर्भगोलकः ॥
शिशुर्जातस्तदारभ्यखरसंभवगोलकः ॥ ३३ ॥
गरदायाश्वतुत्स्यर्थंगरलव्रतमाचरत् ॥
तस्यवंशेसमुद्भूतागरदाब्राह्मणाधमाः ॥ ३४ ॥
गोलकाइतिविख्यातानामत्रयसमन्विताः ॥
श्रौतस्मार्तपरित्याज्याविपदाब्रह्मघातकाः ॥३५॥
महापातकिनस्तेभ्योदत्तंकव्यंवृथाभवेत् ॥
आपांक्ताइतिविख्यातासर्वकर्मबहिष्कृताः ॥ ३६ ॥
इतिश्रीस्कांदेसह्याद्रिखंडेउत्तरार्धेशेषधर्मे ॥
रामशौनकसंवादेप्रथमोध्यायः ॥ ३७ ॥

अर्थ—आणि तो गर्भ राहून पूर्ण नवमास झाल्यानंतर ति विधवा प्रसूत होऊन पुत्र उत्पन्न झाला. आणि तो खरेत्याच्या योगानें उत्पन्न झाला ह्मणोन खरसमवगोलक हें नाव प्राप्त झालें. नंतर गरदादेवीच्या वराप्रमाणे गरल (विष) व्रतातें आचरण करिता झाला. आणि त्याच्या वंशामध्यें जे उत्पन्नझाले ते ब्राह्मणांत अधम असून गोलक या नामें करून प्रख्यात झाले. आणि विष प्रयोगे करून ब्रह्मघात ह्मणजे ब्राह्मणाचावधी देत असल्यामुळें श्रौत स्मार्तादिक शुभकर्मांत वर्ज करावे (शुभकर्मांत कऱ्हाड्यांस येऊ देऊं नयेत) आणि ते अपांक्त असून महापातकी असल्यामुळें, यद्यपी यांस (कऱ्हाड्यांस) हव्य कव्यांत आमंत्रण केले असतां तें सर्व व्यर्थ असे समजावें याप्रमाणें "स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रिखंडाच्यात्रेपधर्मातील प्रथमाध्यायांत सांगितलें आहे तें पाहावें. आतां मी हें कऱ्हाड्याच्या निंदेस्तव येथे प्रगट केलें, असी कोणी शंका घेतील, तर खरोखर मी हें कऱ्हाड्यांच्या निंदेस्तव प्रगट केलें नाहीं. तर या कऱ्हाड्यांनी प्रदर्शित जो श्रेष्ठपणा तो सर्व माझ्या प्रियवाचकांस श्रुत होण्यासाठींच येथे दाखविलें आहे. वाचकहो! आतां या उभय प्रकरणावरून चित्तपावनांचा आणि कऱ्हाड्यांचा श्रेष्ठपणा सर्वांच्या ध्यानांत आला असेलच. कदाचित न आल्यास याकऱ्हाड्यांविषयी कल्याणेकरूनें प्रदर्शित केल्या भाषवावरून पाहा.

क्षेत्रेपरशुरामाख्येक्षेत्रंनदीपुराभिधं ॥
ब्राह्मणाःसंतितत्क्षेत्रेश्रौतस्मार्तक्रियापराः ॥४८॥
वेदवेदांगसंपन्नाःस्वकर्मनिरताःसदा ॥
भृत्यापत्यकलत्रैश्चधनधान्यादिसंयुताः ॥ ४९ ॥
तेषांक्षेत्रेचाधिकारीद्विजःकर्माणिवैदिके ॥

ब्रह्मद्वेष्टापापकारीनिस्त्रपःपरमःशठः ॥ ५० ॥
निर्दयोव्यभिचारेणभ्रष्टोब्राह्मणवंचकः ॥
अज्ञानतश्चविप्रेषुतत्सामीप्यंसदाभवत् ॥ ५१ ॥
ततःकतिपयैर्वर्षैर्निधनंप्रापसद्विजः ॥
तस्यसामीप्यसंबंधात्ब्राह्मणांच्छरणंययुः ॥ ५२ ॥
यथापूर्वंब्राह्मणैश्चज्ञातंसर्वंबलात्कृत ॥
यथोक्तेनविधानेनप्रायश्चित्तंचतैःकृतं ॥ ५३ ॥

अर्थ–तो असा की, परशुरामनामक क्षेत्रात नदीपूर यानामाचें एक क्षेत्र आहे. त्याक्षेत्रात श्रौतस्मार्त कर्म करणारे ब्राह्मण होते. ते वेदशास्त्रसंपन्न असून ब्रह्मकर्मांत तर व वयका मुले शेतक पाहीं करून व धन धान्यें करून ही युक्त होते. आणि त्याक्षेत्रात ब्राह्मणाचा द्वेष करणारा पापी निर्लज्ज असा कोणी एक वैदिकर्माधिकारी मोठाशठ ब्राह्मण राहत होता. तो निर्दय आणि व्यभिचारें करून उत्पन्न झालेला, व ब्राह्मणास फसविणारा असा होता. आणि त्यास इतर ब्राह्मण जवळ घेतही असत. त्यावर काहीं वर्षांनीं तो ब्राह्मण मरण पावला. त्याला जवळ घेतल्यानें त्याचा सहवास त्याला घडला होता ते ब्राह्मणास शरण गेले. सर्व निरुपायानें घडलें असें ब्राह्मणानीं जाणिलें आणि त्या ब्राह्मणानीं (भ्रष्ट झालेल्यानीं) यथाविधि प्राय श्चित्त केलें.

करहाटाभिधेक्षेत्रेकृष्णातीरेगतायतः ॥
भिन्नाज्ञातिर्भवत्सावेकरहाटाभिधानतः ॥ ५४ ॥
तेषामध्येचभ्रष्टास्तेपद्ययास्त्याभवंतिच ॥ , ॥
पंक्तिभेदःपद्ययानाव्यवहारःस्तथापृथक् ॥ ५५ ॥

एकवेदाधिकारस्तुसर्वेषांचैवसर्वदा ॥ ॥
ऋग्वेदमात्रमभ्यस्यसांगोपांगंससूत्रकं ॥ ५६
पद्याख्याचैवमेवंहिऋग्वेदंसम्यगभ्यसेत् ॥ ॥
स्वस्मिन्नेवपदेवासात्तेपद्यास्तुप्रकीर्तिताः॥ ५७ ॥
करहाटेतुसत्क्षेत्रेवासात्तुकरहाटकाः ॥
एवंयेद्विविधाःप्रोक्ताःपद्याख्याःकरहाटकाः॥५८॥
तस्यसामीप्यमात्रेणकरहाहाटाभिधाःस्मृताः ॥
तस्यसामीप्यमात्रेणपद्याख्याअपरेसुताः ॥ ५९ ॥
सर्वेहिशुल्वाअभयन्कृतंयत्तेर्महत्तपः ॥
देव्याश्चाराधनंचक्रुर्दुर्गास्याद्वरदाभवत् ॥ ६० ॥
युष्मज्जातिपुमत्तुष्टैर्ब्राह्मणान्पूजयंतिसः ॥
संतत्संपत्तिसंयुक्ताःश्रेष्ठत्वंप्राप्नुवंतिते ॥ ६१ ॥
पंचेंदुनंदप्रमितेशालिवाहनजन्मतः
करहाटाश्चाभविष्यन्पट्कर्मस्वाधिकारिणः ६२ ॥
इतिश्रीमाधवकृतशतप्रश्नकल्पलतायां ॥
ज्ञातिविवेकेकरहाटपद्योत्पत्तिप्रश्नःसप्तमः ॥ ७ ॥

अर्थ—आणि कृष्णातीरीं कराड नामक क्षेत्रीं गेले (जाऊन राहिले) यामुळें करहाट (ह०) कऱ्हाडे नामक निराळी ज्ञात झाली. त्यामध्यें जे भ्रष्ट ते पद्ये नामक झाले. पद्यें अपांक्त व त्यांचा व्यवहारही निराळा. आणि त्या सर्वांना एक वेदाचा अधिकार, अंग, उपांग, सूत्रसहीत ऋग्वेदमात्र पढावा. पद्येही असेच (त्याहीं) ऋग्वेद संपूर्ण ह्मणावा. आपल्याचपदीं ह्मणजे देशीं राहिले ते पद्ये

ह्मटले. करहाटनामक चांगल्या क्षेत्रांत राहिल्यानें कऱ्हाडे झाले. पद्ये आणि कऱ्हाडे असे जे हे दोन प्रकारचे ब्राह्मण सांगितले ते हे, त्यांस जवळ घेतल्यानें एक कऱ्हाडे ह्मटले आहेत्. त्यांणीं देवी-चें आराधन केलें व दुर्गानामक देवी वर प्रदान देती झाली. तें असें कीं तुमच्या (कऱ्हाड्यांच्या) ज्ञातींतील ब्राह्मणास माझ्याप्रियर्थ जे पूजतील (बळी देतील) त्यांस सतती आणि संपत्तीही प्राप्त होऊन श्रेष्ठत्व मिळेल. शालिवाहन शके ९१९ मध्यें पट्कर्माधिकारी कऱ्हाडे झाले इति माधवशतप्रश्नकल्पलतिकेंतील जाति विवेकांतील कऱ्हाडे व पद्ये यांच्या उत्पत्तिविषयीं प्रश्न ७ वा. आतां या सातव्या प्रश्नाच्या १४ व्या आणि १५ व्या श्लोकावरून कऱ्हाड्यांचा श्रेष्ठपणा ह्मणून जो कांहीं होता तो सर्व वाचकांच्या ध्यानांत उत्तम प्रकारें करून आला असेलच असेल. कारण तो माधव ९१९ मध्यें कऱ्हाडे पट्कर्माधिकारी झाले असें ह्मणतो तर यावरून ( माधवाच्या बोलण्यावरून ) कऱ्हाडे हे ९१९ चे पूर्वी शूद्र असून यांस ( कराड्यांस ) कोणत्याही कर्माचा अधिकार न होता असें सिद्ध होतें. असें असून याच्याशीं अन्नोदक ठेवणारे जे देशस्थादिक ते याविषयीं किंचीततरी विचार करितात काय? असो आतां ते करीत नाहींत तें ठिकचआहे. परंतु कल्याणेन्द्रूनें तरी याचा विचार करावयाचा होता ! कारण लोकांचें हीत रक्षीण्याविषयीं ह्या जगांत शुद्ध असून श्रेष्ट कांहींतें कल्याणेन्द्रूच राहिले आहेत् तर तशा पुरुषानीं याप्रकारच्या महा पातकांचा नर विचार केला नाहीं तर कसें होईल? हं ह ज्याचे डोळ्यांत करांगुळी जाती त्यास वेदना होतातच होतात या ह्मणीवर गेले असतील नाहीं वरें !

विद्वज्जनपंडितहो ! अशाएकतर्फे न्याय करणारे पुरुषास कल्याणेन्द्रू हें नाव तरी शोभेल काय? अरे! विद्वत्ता नाहीं तर नाहीं

परंतु कल्याणेच्छू या नामाचा तरी साभिमान ठेवावयाचा होता ! पण तो कोठून ठेवील ! कारण ज्याचे मन ब्रह्मद्वेष करण्याकडेच आहे तो आपल्या न्युन्या धिक्याचा विचार कसा बरे ठेवील. त्यात तोही त्या कल्याणेच्छूनें ठेविला असता पण तो केव्हा जर परशुरामाने वरदान दिलें नसतें तर. हें जर येट जीकडे जाती तीकडे त्या कल्याणेच्छूला नडतें तर तो विचार करील कोठून ?

असो आता सर्व विद्वज्जन वाचकांस ग्रंथकर्त्याची विनय पूर्वक प्रार्थना हीच कीं मदर्शित केलेल्या सर्व शास्त्रार्थावरून क-न्हाड्यांचे द्विजत्व हें कोणत्या प्रकारचें आहे, हें आपापल्या निस्पृहतानुरूपशुद्धांत:करणानें अवलोकनकरून हे ( कन्हाडे आणि चित्पावन ) केवळ सारस्वतकोंकणे उर्फ शाणवी ब्राह्मणाचा द्वेषच करितात किंवा नाहीं तें या प्रकरणावरून पाहा.

इतिकेण्योपाव्हनारायणसूनुलक्ष्मणविरचिते श्रीमद्दशप्रकरणेकन्हाढोत्पत्तिकथनंनामअष्टम प्रकरणंसमाप्तिमगमत्.



# प्रकरण नववें.



॥ प्रणम्यशिरसारामत्रैलोक्याधिपतिंप्रभुं ॥
॥ देवरुखोत्पत्तिनामानवमोभागउच्यते ॥ १ ॥

अर्थ—आता त्रैलोक्याचा प्रभू भक्ताभिमानी जो राम त्याप्रत नमस्कार करून देवरुखोत्पत्ति नामक हें नवम प्रकरण सांगतों

चित्तपावनज्ञातिस्थोचित्तळेत्युपनामकः ॥
वासुदेवाभिधोविशेषनाढ्य.शालिसंयुतः ॥ १ ॥
इष्टापूर्तादिनिरतोज्ञाननिष्ठातिथिप्रियः ॥
सह्यस्यपश्चिमेभागेनिवसन्सर्वदैवहि ॥ २ ॥
देव्याश्चाराधनंचक्रेवेदतन्त्रोक्तमार्गतः ॥
ब्राह्मणाभोजितानित्यपंचभक्षादिभिस्तथा ॥ ३ ॥

अर्थ—तें असें की "वासुदेव चितळे" या नावाचा (कोणी एक) चित्तपावन ब्राह्मण धनवान होता तो यज्ञ कर्मे करण्यात व तलाव, विहिर, घाट, वगैरे धर्मार्थ बांधण्यांत तत्पर असा आणि तो ज्ञानी असून घरास आलेल्याचा सत्कार वगैरे करण्यात रत असा सह्याद्रिच्या पश्चिमेस सदा सर्वकाल राहत असत त्याणें वेदतन्त्रोक्त मार्गानें देवीची अराधना केली आणि तो अथिती आदिकरून आलेल्या ब्राह्मणास पंचपक्वान्नानी जेवूं घाली

एवंद्वादशवर्षाणिकारितपरमंतपः ॥
देव्याश्चाराधनेनैववाक्सिद्धिंप्रापसद्विजः ॥ ५ ॥

क्षेत्रेपरशुरामाख्येतडागंकृतवान्द्विजः ॥
जलहीनमहामार्गेअरण्येरौद्रभूमिषु ॥ ६ ॥
खानयित्वास्वयंविप्रोनिजद्रव्येणनित्यशः ॥
मृदउत्थारसाक्षेपमागतान्सर्ववर्णकान् ॥ ७ ॥
कारयित्वास्नेहपूर्वसामदानाभिवादनैः ॥
सत्वादिगुणसंपन्नैर्विप्रादिधनवानपि ॥ ८ ॥
तदाज्ञयाचकाराशुमृदउत्थारणंतदा ॥
मृदुत्थारःसर्वकालंमार्गगैनैवकारितः ॥ ९ ॥

अर्थ—यामकोंकरून त्या वासुदेव चितळ्यानें बारावर्षें तपश्चर्या केली, आणि देवीच्या आराधनेनें त्यास वाक्सिद्धि प्राप्त झाली. परशुराम क्षेत्रांत अरण्यांत स्मशानांत आणि ज्या रस्त्यावर उदक नाहीं तेथें तो तलाव करिता झाला. आणि स्वतांचा पैसा खर्चून (स्वार्णे) खणवावें, आणि तो सामदाम, स्नेह, आर्जव, अशाउपायानीं, आलेल्या सर्व वर्णस्थलोकांकडून माती उचलून नेवयीत असे आणि ब्राह्मण आदिकरून सर्व श्रीमंत लोक देखील मृत्तिका उचलून न्हेत असत.

देवरुखारसमंताच्चविप्रसंघस्तुचागतः
सर्वेचकरहाटावैवेदशास्त्रविशारदाः ॥
इष्टापूर्तादिकर्तारस्तर्कशास्त्रेषुकौशलः ॥
दृष्ट्वातडागंविस्तीर्णपुण्यस्त्रीभिर्नरैर्युतं ॥ ११ ॥

अर्थ—देवरुखा कडून कांहीं वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण आले ते सर्व कऱ्हाडे होते, ते यज्ञ करणारे व तलाव आदिकरून धर्मार्थ बांधणारे

आणि तर्क शास्त्रांत कुशल असे होते त्यांणीं तो पाहिला आणि तेथें चांगल्या वायका जन्मल्या.

सर्वेषांमूर्ध्निमृद्भारंपश्यन्विस्मयमाप्तवान् ॥
विप्राःप्रोचुःकिमाश्चर्यवद्ब्राह्मणसुव्रत ॥ १२ ॥
वयंसर्वेकरिष्यामःप्रत्येकंचैवमेवहि ॥
तडागान्मृदउत्थारंभवान्कुर्यात्धियत्नतः ॥ १३ ॥
श्रुत्वातद्वाक्यविस्तारंवाग्विवादमकुर्वते ॥
प्रार्थयामासतान्सर्वान्सामदानादिभिर्द्विजः १४ ॥

अर्थ—आणि या सर्वांचे शिरावर मातिची पाटी पाहून आश्चर्य पावून म्हणाले कीं हे ब्राह्मणा ! आम्ही ही प्रत्येक असेंच करूं. तळ्यांतून माती तुम्हीं प्रयत्नानें काढावी त्यांचें तें सर्व विषयासक्त भाषण ऐकून त्याची तो ब्राह्मण अनेक प्रकारें करून प्रार्थना करूं लागला.

अनादृत्यैवतद्वाक्यंशापंदत्वाद्विजान्प्रति ॥
युष्मत्पंक्तौतुभुंजीरन्वदेयुःसहवश्चये ॥ १५ ॥
सहवासंचकुर्वंतितेदारिद्र्यमवाप्नुयुः ॥
यूयंसर्वेदरिद्राःस्युस्तेजोहीनाबहिष्कृताः ॥ १६ ॥
भवेयुर्लोकनिंद्याश्चयुष्मत्संसर्गकारिणः ॥
देववत्द्विजशापात्तेदग्धाश्चापित्रहिष्कृताः ॥ १७ ॥
देवरुखप्रदेशाच्चजातास्तेदेवरूखकाः ॥
नवेंदुशक्रप्रमितेशालिवाहनजन्मतः ॥ १८ ॥
देवरुखाच्चसंजाताचित्तपावनशापतः ॥

